श्रीमदाशाधरविरचितं

# सागारधर्मामृतं

( स्वोपज्ञभव्यकुमुदचन्द्रिकासहितं )

---

भाषान्तरकार,

**कल्लप्पा भरमप्पा निटवे.**

---

परलोकवासी चिरंजीव माणिकचंद
याचे स्मरणार्थ प्रकाशक,
जोतीचंद दलुचंद पंढरपुरकर.

---

जैनेन्द्र छापखाना कोल्हापूर.
जानेवारी सन १९१५.
किंमत २ रुपये.

# सागारधर्मामृत.

पंडित आशाधर यांनीं; धर्मामृत नांवाचा मोठा ग्रन्थ लिहिला, त्यापैकीं हा सागारधर्मामृत ग्रन्थ एक प्रकरण आहे. पंडितांनीं काय काय ग्रन्थ लिहिले; हें, त्यांनींच ग्रन्थाच्या शेवटीं लिहिलें आहे व या ग्रन्थाचा कालहि लिहिला आहे. पंडितांच्या ग्रन्थांपैकीं फक्त हें सागारधर्मामृत, जिनयज्ञकल्प, नित्यमह, महाभिषेक व सहस्रनामस्तोत्र हे पांचच आज उपलब्ध आहेत. बाकीचे ग्रन्थहि वाङ्मयाच्या व प्रभावनेच्या दृष्टीनें फारच महत्त्वाचे असतील; पण आमच्या दुर्दैवानें त्यांचें दर्शन होणें दुरापास्त झालें आहे! पंडितांनीं या सागारधर्मामृतावर भव्यकुमुदचंद्रिका नांवाची एक टीका लिहिली आहे, ती या पुस्तकांत दिली आहे. त्यांनींच आणखी एक ज्ञानदीपिका नांवाची पंजिका लिहिलेली आहे; तीहि आमचेजवळ होती, तिच्यांतले बरेच उतारे टीपेंत ठिकठिकाणीं दिले आहेत. ती पंजिका स्वतंत्रच या ग्रन्थाच्या शेवटीं जोडणार होतों; पण, आमचे दुर्दैवानें सागारधर्मामृतांचें प्राचीनपुस्तक अग्नीचें भक्ष्य झालें! दुसरी प्रत आज मिळत नाहीं, त्यामुळें लिहून तयार असलेला ग्रन्थ छापण्यांत आला. सुदैवानें या ग्रंथाची पुनरावृत्ति काढण्याचा प्रसंग आल्यास, कोठून तरी ती पंजिका संपादन करून प्रसिद्ध करण्याची आशा बाळगतों.

स्वामी समन्तभद्र वगैरे प्राचीन आचार्यांनीं रत्नकरंडक वगैरे श्रावकाचाराचे बरेच ग्रन्थ लिहिले आहेत. त्यांच्या मतास अनुसरूनच हा ग्रन्थ लिहून पंडितांनीं हल्लींच्या जगावर फार मोठे उपकार करून ठेविले आहेत. कारण; रत्नकरंडक वगैरे ग्रन्थ सूत्रप्राय आहेत, त्यांच्या टीकाहि इतर विद्वानांनीं लिहिल्या आहेत, पण आह्मासारख्या मंदमतींना व्हावें तसें ज्ञान होत नाहीं. ह्मणून पंडितांनीं श्रम घेऊन हें सागारधर्मामृत स्वकृतटीकांसह सुबोध व स्पष्ट केलें इतकेंच नव्हे तर श्रावकाचारांत याच्या तोडीचा दुसरा ग्रंथ नाहीं. याचा लाभ महाराष्ट्र वाचकांना व्हावा ह्मणून पूर्वी मराठी भाषांतर व पंजिकेंतील उतारे देऊन जैनबोधक मासिकपुस्तकांतून हें अमृत पाजण्यांत आलें. त्याची रुचि आवडल्यामुळें आणखी पुष्कळ सम्यग्दृष्टि वाचकांची मागणी आल्यावरून "श्रीयुत जिनवाङ्मयजीर्णोद्धारक दोशी रावजी सखाराम सोलापूर" यांच्या प्रयत्नानें ही आवृत्ति संस्कृतटीकेसह छापली आहे. हा ग्रन्थ छापण्याचे कामीं मुख्य श्रेय "स्वस्तिश्रीलक्ष्मीसेन भट्टारक पट्टाचार्य स्वामी संस्थान मठ करवीर" यांचेकडे आहे. कारण, श्रीनींच हें अमृत प्रथम मला पाजलें व याचा सर्वत्र वर्षाव करण्याकरितां प्राचीन शुद्ध ताडपत्र ग्रन्थ आपल्या श्रीश्रुतभाण्डारांतून दिला याबद्दल मी श्रीचा अत्यन्त ऋणी आहे.

करकृतमपराधं क्षन्तुमर्हन्तु सन्तः

कोल्हापूर.<br>माघ शुद्ध ५<br>शके १८३६

भाषांतरकार,<br>कल्लप्पा भरमप्पा निटवे,<br>नांदणीकर.

# विषयानुक्रमणिका.

## अध्याय पहिला.

नमो वीतरागाय.

सटीकं

# सागारधर्मामृतम्।

श्रीवर्द्धमानमानम्य।
मन्दबुद्धिप्रबुद्धये॥
धर्मामृतोक्तसागार-।
धर्मटीकां करोम्यहम्॥ १॥
समर्थनादि यन्नात्र।
ब्रुवे व्यासभयात्क्वचित्॥
तज्ज्ञानदीपिकाख्यैत-।
पञ्जिकायां विलोक्यताम्॥ २॥

अथ चतुर्थाध्याये—सुदृग्बोधो गलद्वृत्तमोहो विषयनिःस्पृहः। हिंसादेर्विरतः कात्स्न्याद्यतिः स्याच्छ्रावकोंऽशतः। इत्युक्तम्। अतो मध्यमङ्गलविधानपूर्वकं विनेयान्प्रति सागारधर्मामृतं प्रतिपाद्यतया प्रतिजानीते—

अथ नत्वाऽर्हतोऽक्षूण-।
चरणान् श्रमणानपि॥
तद्धर्मरागिणां धर्मः॥
सागाराणां प्रणेष्यते॥ १॥

टीका—प्रणेष्यते प्रतिपादयिष्यतेऽस्माभिः। कः उक्तकर्मतापन्नः धर्मः। एकदेशविरतिलक्षणं चारित्रम्। केषां? सागाराणां

१ टीपः—प्रणयनक्रियाकर्मतापन्नः॥

वक्ष्यमाणलक्षणानां गृहस्थानाम् । किंविशिष्टानां तद्धर्मरागिणां तेषां श्रमणाना धर्मे सर्वविरतिरूपे चारित्रे रागिणां संहननादिदोषादकुर्वतामपि प्रीतिमताम् । यतिधर्मानुरागरहितानामगारिणां देशविरतेरप्यसम्यग्रूपत्वात् । सर्वविरतिलालसः खलु देशविरतिपरिणामः । किं कृत्वा प्रणेष्यते नत्वा शिरःप्रह्वीकरणादिना विशुद्धमनोनियोगेन च पूजयित्वा । कान् अर्हतस्तीर्थकरपरमदेवान् । किंविशिष्टान् अक्षूणचरणान् । अक्षूणं सम्पूर्णं सकलमोहप्रक्षयादाविर्भूतत्वेन नित्यं निर्मलं चरणं यथाख्यातचारित्रं येषां ते अक्षूणचरणास्तान् । न केवलमर्हतो नत्वा श्रमणानपि नमस्कृत्य श्राम्यन्ति बाह्यमाभ्यन्तरं च तपश्चरन्तीति श्रमणा आचार्योपाध्यायसाधवस्तान् । किंविशिष्टान्? अक्षूणचरणान् । अक्षूणं भावनाविशेषबलादनतिचारं चारित्रं क्षायोपशमिकसंयमपरिणामो येषां ते तान् । कथं अथ । अथेतिशब्दो मङ्गलार्थः अधिकारार्थो वा । इतः सागारधर्मोऽधिक्रियते इत्यर्थः ॥ १ ॥

**अर्थ— अखंड व निर्मळ चारित्र ज्यांचें आहे अशा तीर्थंकर परमदेवांस व निरतिचार चारित्र पाळणाऱ्या दिगंबर मुनींस शुद्धभावानें मंगलार्थ नमस्कार करून; मुनिधर्माच्या ठिकाणीं अनुराग बाळगणाऱ्या गृहस्थांचा धर्म ( श्रावक–धर्म ) प्रतिपादन केला जातो. आपण गृहस्थ असून मुनिधर्मांत प्रीति ठेवणारा श्रावक योग्य होय असें ग्रंथकाराचें ह्मणणें आहे.**

किंलक्षणाः सागारा इत्याह—

**आतां सागारांचें लक्षण सांगतों.**

**अनाद्यविद्यादोषोत्थ- ।**
**चतुःसञ्ज्ञाज्वरातुराः ॥**

शश्वत्स्वज्ञानविमुखाः ।
सागारा विषयोन्मुखाः ॥ २ ॥

टीका— अत्र भवन्तीति क्रियाध्याहारः। भवन्ति के सागाराः। अगारं गृहं सकलपरिग्रहोपलक्षणं । सह अगारेण वर्तन्ते इति सागाराः। एतदेव अनाद्यविद्येत्यादिविशेषणत्रयेण स्फुटयति। किंविशिष्टाः सागारा भवन्ति शश्वत्स्वज्ञानविमुखाः शश्वदनवरतं स्वज्ञाने "एगो मे सासदो आदा णाणदंसणलक्खणो। सेसा मे बाहिरा भावा सव्वे संजोगलक्खणा ॥१॥" इत्यादिपरमागमप्ररूपिते स्वात्मावबोधे विमुखाः पराङ्मुखाः। तत्र मुख्यतयाऽनुपयुक्ता इत्यर्थः। पुनः किंविशिष्टाः विषयोन्मुखाः विषयेष्विष्टेषु स्रक्कामिन्यादिष्वनिष्टेषु च दुर्भोजनदुर्व्यसनादिषु उन्मुखाः रागात् द्वेषाच्च व्यापृताः उद्युक्ताः। कुत एतदिति हेतुं प्रथमान्तत्वेन निर्दिशति। पुनः किंविशिष्टाः अनाद्यविद्यादोषोत्थचतुःसञ्ज्ञाज्वरातुराः । अविद्या अनित्याशुचिदुःखानात्मसु विपरीतख्यातिः। यस्मात्पूर्वं नास्ति स आदिः । नास्त्यादिर्यस्याः साऽनादिः। अनादिश्चासावविद्या च अनाद्यविद्या। सैव दोषो वातपित्तकफानां वैषम्यम् । उत्थानमुत्था उद्भूतिः। अनाद्यविद्यादोषादुत्था येषां ते अनाद्यविद्यादोषोत्थाः । सञ्ज्ञाः आहाराद्यभिलाषानुभवनसंस्काररूपाश्चतस्रः। तथा ज्वराः प्राकृतो वैकृतश्चेति द्वौ प्रत्येकं साध्योऽसाध्यश्चेति चत्वारः। सञ्ज्ञा एव ज्वरा मोहसन्तापरूपत्वात् सञ्ज्ञाज्वराः। चत्वारश्च ते सञ्ज्ञाज्वराश्च चतुःसञ्ज्ञाज्वराः । अनाद्यविद्यादोषोत्थाश्च ते चतुस्सञ्ज्ञाज्वराश्च अनाद्यविद्यादोषोत्थचतुःसञ्ज्ञाज्वराः। तैरातुराः कदर्थिताः। यत एवम्भूतास्ततः शश्वत्स्वज्ञानविमुखाः। अत एव च नित्यं विषयोन्मुखाः स्वपरप्रकाशात्मकत्वादात्मनो विमुखाः ॥ २ ॥

**अर्थः— सागार ह्मणजे सकळ परिग्रहांनीं युक्त असें जें**

घर तेथें वास करणारे अर्थात् प्रपंचलुब्ध जीव हे सागार होत. हे अनादिकालच्या अविद्यारूपी[1] वात-पित्त-कफांच्या दोषांपासून ज्यांची उत्पत्ति आहे अशा चार प्रकारच्या संज्ञारूपी[2] चार प्रकारच्या ज्वरांच्या[3] योगानें त्रासलेले आणि ह्मणूनच सदोदित आत्मज्ञानाविषयीं विमुख व पुष्पमाला कामिनी वगैरे विषयांच्या ठिकाणीं अनुराग ठेवणारे असे असतात.

भङ्ग्यन्तरेण तानेवाह —

पुढील श्लोकांत प्रकारांतरानें त्यांचेंच लक्षण सांगतो.

अनाद्यविद्यानुस्यूतां ।
ग्रन्थसञ्ज्ञामपासितुम् ॥
अपारयन्तः सागाराः ।
प्रायो विषयमूर्च्छिताः ॥ ३ ॥

टीका— अत्रापि भवन्तीति क्रियाध्याहारः । एवमश्रूयमाणं क्रियापदं पुरस्तादप्यध्याहार्यम् । भवन्ति के ते सागाराः । किंविशिष्टा विषयमूर्च्छिताः कामिन्यादिविषयेषु ममेदं भोग्यमहमस्य स्वामीत्येवं

---

१ अनित्य पदार्थास नित्य समजणें, अशुचि पदार्थास शुचि मानणें, दुःखास सुख मानणें आणि जे पदार्थ ( देह, कलत्र, पुत्र वगैरे ) आपले नव्हेत ते आपले समजणें याचें नांव अविद्या.

२ संज्ञा ह्मणजे एक प्रकारची ममत्वबुद्धि. संज्ञा चार प्रकारची आहे १ आहार, २ भय, ३ मैथुन आणि ४ परिग्रह.

३ ज्वर ह्मणजे अंगांत संताप वगैरे उत्पन्न करणारा एक प्रकाराचा रोग. हा चार प्रकारचा आहे. १ साध्यप्राकृत, २ असाध्यप्राकृत, ३ साध्यवैकृत, ४ असाध्यवैकृत.

ममकाराहङ्कारविकल्पपरतन्त्रतयाऽध्यवसिताः । कथं प्रायो बाहुल्येन सुदृष्टयोऽपि चारित्रावरणकर्मोदयवशादेवं पर्यवसन्नाः सम्यग्दृष्टयः । ये तु केचिज्जन्मांतराभ्यस्तरत्नत्रयानुभावात्साम्राज्यादिश्रियमप्यनुभवन्तोऽसतीनाथोपभोगन्यायेन तत्त्वज्ञानदेशसंयमप्रणिधानपरत्वेन भुञ्जाना अप्यभुञ्जानवदवभासन्ते तद्व्यभिचारप्रदर्शनार्थं प्राय इत्युच्यते । किं कुर्वन्तस्ते तथा भवन्तीत्याह अपारयन्तः अशक्नुवन्तः । किं कर्तुं अपासितुं निराकर्तुं । कां ग्रन्थसञ्ज्ञां, ग्रन्थे परिग्रहे सञ्ज्ञा ममेदमिति मूर्च्छापरिणामस्तां । किंविशिष्टां अनाद्यविद्यानुस्यूतां, अनाद्यविद्ययाऽनुस्यूता बीजाङ्कुरन्यायेन सन्तत्या प्रवर्तमाना ताम् ॥

**अर्थ—अनादि अशा अविद्येनें अनुस्यूत ह्मणजे बीजांकुरें[2] न्यायानें सतत चालत आलेला जो परिग्रहांचा अभिलाष तो नाहींसा करण्याकरितां असमर्थ असे सागार प्रायः[3]**

---

१ धात्रीबालासतीनाथपद्मिनीचलवारिवत् ।
दग्धरज्जुवदाभाति भुञ्जानोऽपि न पापभाक् ॥ १ ॥

२ बीजापासून अंकुर उत्पन्न होतो व अंकुरापासून बीज उत्पन्न होतें याला बीजांकुरन्याय ह्मणतात. त्याप्रमाणें अविद्येमुळें परिग्रहांचा अभिलाष उत्पन्न होतो व पुनः परिग्रहांच्या अभिलाषामुळें अविद्या उत्पन्न होते.

३ प्रायः या शद्बानें ग्रंथकारांनीं सागारांत विकल्प दाखविला आहे ह्मणजे कित्येक सम्यग्दृष्टि सागार चारित्रमोह-कर्मोदयामुळें विषयांच्या ठिकाणीं आसक्त असतात. आणि कित्येक सागार जन्मांतरांत अभ्यस्त अशा रत्नत्रयाच्या प्रभावामुळें जारिणी स्त्रीच्या पतीप्रमाणें साम्राज्यपदाचाहि अनुभव घेत असतात. ह्मणजे रत्नत्रयाच्या प्राप्तीमुळें चारित्र पाळून परिमित विषयांचें सेवन उदासवृत्तीनें करीत असतात.

(बहुतकरून) विषयांच्या ठिकाणीं मूर्छित झालेले असतात.

एवं सागारान् लक्षयित्वा तद्भावाभावनिदानयोरविद्याविद्ययोर्बीजोपदेशार्थमिदमाह—

ह्याप्रमाणें सागारांचें लक्षण सांगन; आतां सागारत्व असणें आणि तें नसणें ह्यांना विद्या ( सम्यक्त्व ) आणि अविद्या ( मिथ्यात्व ) हींच कारणें अनुक्रमें आहेत असें पुढील श्लोकांत सांगतों:—

नरत्वेऽपि पशूयन्ते ।
मिथ्यात्वग्रस्तचेतसः ॥
पशुत्वेऽपि नरायन्ते ।
सम्यक्त्वव्यक्तचेतनाः ॥ ४ ॥

टीका—पशूयन्ते हिताहितविवेकविकलतया पशव इवाचरन्ति। के ते मिथ्यात्वग्रस्तचेतसः मिथ्यात्वेन विपरीताभिनिवेशेन ग्रस्तमाविष्टं चेतो मनो येषां ते । क्व सति नरत्वेऽपि। नरा हि प्रायो विचारचतुरचेतसः किल प्रसिद्धास्तत्त्वेऽपि सति किं पुनस्तिर्यगादिभवे इत्यपिशब्दार्थः । एवमविद्यामूलकारणं मिथ्यादर्शनं विभाव्य विद्यामूलकारणं सम्यग्दर्शनं भावयितुमाह पशुत्वेऽपीत्यादि । नरायन्ते हिताहितविचारचतुरतया नरा इवाचरन्ति । के ते सम्यक्त्वव्यक्तचेतनाः सम्यक्त्वेन तत्त्वार्थश्रद्धानलक्षणेन सम्यग्दर्शन-

---

१ मूर्छितांचें लक्षण—

वपुर्गृहं धनं दाराः पुत्रमित्राणि शत्रवः ॥
सर्वथान्यस्वभावानि मूढः स्वानि प्रपद्यते ॥ १ ॥

अर्थः—देह, घर, धन, स्त्री, मित्र व शत्रु वगैरे हे सर्व अन्य असून यांना आपले समजणारा जो; तो मूर्छित होय.

परिणामेन व्यक्ता प्रशमसंवेगानुकम्पास्तिक्यानुभावैः प्रतीतियोग्या कृता चेतना चैतन्यसम्पद् येषां ते। क्व सति पशुत्वेऽपि, पशव-स्तिर्यञ्चस्ते चात्र सञ्ज्ञिन एव। जात्या तिर्यग्भावेऽपि सति सम्यक्त्व-माहात्म्याद्धेयोपादेयतत्त्वज्ञाः पशवोऽपि भवन्ति किं पुनर्मनुष्यादय इत्यपिशब्दार्थः।

**अर्थः—मिथ्यात्वानें ( विपरीत अभिनिवेशानें ) ज्यांचें मन घेरिलें आहे असे जीव मनुष्य असूनहि पशूप्रमाणें अर्थात् विचारशून्य होतात. आणि सम्यग्दर्शन—परिणामानें प्रशम[1], संवेग[2], अनुकंपा[3] व आस्तिक्य हे गुण ज्यांचे प्रकट झाले**

---

१ प्रशमाचें लक्षण—

रागादिषु च दोषेषु चित्तवृत्तिनिबर्हणम्॥
तं प्राहुः प्रशमं प्राज्ञाः समन्ताद्व्रतभूषणम्॥ १॥

अर्थः—राग, द्वेष वगैरे दोषांत आपलें चित्त न ठेवणें याला प्रशम ह्मणतात. हा प्रशम गुण सर्व व्रतांस भूषण आहे.

२ संवेगाचें लक्षण—

शारीरमानसागन्तुवेदनाप्रभवाद्भवात्॥
स्वप्नेन्द्रजालसंकल्पाद्भीतिः संवेग उच्यते॥ २॥

अर्थः—शारीर ( देहासंबंधी ) मानस ( मनासंबंधी ) आणि आगंतुक ( आकस्मिक ) अशा प्रकारचीं दुःखें जेथें वारंवार उत्पन्न होतात आणि ज्याची स्थिति स्वप्नाप्रमाणें किंवा इंद्रजाला-प्रमाणें अस्थिर आहे अशा संसाराला भिऊन असणें याचें नांव संवेग.

३ अनुकंपेचें लक्षण—

सत्वे सर्वत्र चित्तस्य दयार्द्रत्वं दयालवः॥

आहेत असे जीव पशु जरी असले तरी ते मनुष्यच होत. तात्पर्य, ज्याला सम्यक्त्व आहे तो ज्ञानी अर्थात् मनुष्य; आणि जो मिथ्यात्वी आहे तो अज्ञानी अर्थात् पशु होय. ह्मणजे सम्यक्त्व हें विद्येचें कारण आणि मिथ्यात्व हें अविद्येचें कारण होय.

एवं सामान्यतो मिथ्यात्वानुभावं प्रदर्श्येदानीं तस्य त्रिविधस्याप्यनुभावमुपमानैरनुभावयितुमाह—

याप्रमाणें मिथ्यात्वाचा प्रभाव सांगून, आतां त्याचेच तीन भेद, त्यांच्या प्रभावासह उपमानांनीं सांगतों.

केषाञ्चिदन्धतमसा-।
यतेऽगृहीतं ग्रहायतेऽन्येषाम् ॥
मिथ्यात्वमिह गृहीतं।
शल्यति सांशायिकमपरेषाम् ॥ ५ ॥

---

धर्मस्य परमं मूलमनुकम्पां प्रचक्षते ॥ ३ ॥

अर्थः—अनेक योनींत फिरून फिरून दुःख पावणाऱ्या प्राणिमात्रावर दया करणें याला दयाळु मुनि अनुकंपा ह्मणतात. अनुकंपा हें धर्माचें मुख्य मूळ आहे.

२ आस्तिक्याचें लक्षण—

आप्ते श्रुते व्रते तत्त्वे चित्तमस्तित्वसंयुतम् ॥
आस्तिक्यमास्तिकैरुक्तं युक्तं युक्तिधरेण वा ॥ ४ ॥

अर्थः—आप्त ह्मणजे यथार्थ उपदेश करणारा सर्वज्ञ वीतराग परमेश्वर, शास्त्र, व्रत आणि जीवादिक तत्त्वें यांच्याविषयीं जी अस्तित्वबुद्धि याचें नांव आस्तिक्य.

टीका—अन्धतमसायते घोराज्ञानविवर्तहेतुतया निबिडांधकारवदाचरति । किं तत् मिथ्यात्वं । किंविशिष्टमगृहीतं परोपदेशमन्तरेण प्रवृत्तत्वादनुपात्तं । अनादिसन्तत्या प्रवर्तमानस्तत्वारुचिरूपश्चित्परिणाम इत्यर्थः ॥ केषां तत्तथा स्यादित्याह । केषाञ्चित् एकेन्द्रियादिसञ्ज्ञिपञ्चेन्द्रियपर्यन्तानां । क इह संसारे । तथा ग्रहायते विविधाकारकारितया ग्रहवदाचरति भूतावेशवद्विवर्तत इत्यर्थः ॥ किंतत् मिथ्यात्वं । किंविशिष्टं गृहीतं परोपदेशादुपात्तमतत्त्वाभिनिवेशलक्षणं चिद्वैकृतं । केषां अन्येषां सञ्ज्ञिपञ्चेन्द्रियाणां । तथा शल्यति बहुदुःखहेतुत्वाच्छरीरान्तःप्रविष्टकाण्डादिवदाचरति । किं तत् मिथ्यात्वं किमाख्यं सांशयिकं मिथ्यात्वकर्मोदये सति ज्ञानावरणोदयविशेषवशात् किमिदं जीवादि वस्तु यथा जैनैरनेकान्तात्मकमुच्यते तथा स्यादुतस्विदन्यथेति चलिता प्रतीतिः संशयः । संशये भवं सांशयिकं क्वचिदप्राप्तनिश्चयमात्मस्वरूपं । केषां तत्तथा स्यादित्याह परेषां इन्द्राचार्यादीनाम् ॥

अर्थः—मिथ्यात्वाचे प्रकार तीन. अगृहीत, गृहीत आणि सांशयिक. अनादि संततीनें पुनः पुनः चालू असणारा तत्वाविषयीं अरुचि रूपाचा जो आत्म्याचा परिणाम तें अगृहीत मिथ्यात्व होय. हें इतरांच्या उपदेशावांचून असतें, ह्मणून याला अगृहीत ह्मणतात. इतरांच्या उपदेशानें प्राप्त झालेला अतत्वश्रद्धान रूपाचा जो बुद्धीचा विकार त्याला गृहीतमिथ्यात्व ह्मणतात. आणि मिथ्यात्व-कर्माचा उदय झाला असतांना व तशाच एक प्रकारच्या ज्ञानावरणीय कर्माचा उदय झाला असतांना त्यामुळें "जिनानें जें जीवादिक पदार्थांचें लक्षण सांगितलें आहे, तें तेंच कीं आणखी कांहीं आहे" अशा प्रकारचा जो

बुद्धीचा चलपरिणाम त्याला संशय ह्मणतात. संशयापासून जें उत्पन्न होतें तें सांशयिक होय. या संसारांत हें अगृहीत मिथ्यात्व, घोर अशा अज्ञान अवस्थेत असणाऱ्या कित्येकांस (ह्मणजे एकेंद्रिय आदिकरून संज्ञिपंचेंद्रिय वगैरे जीवांस) गाढ अंधकाराप्रमाणें दुःख देत आहे. दुसरें गृहीत मिथ्यात्व तें कित्येकांस (ह्मणजे संज्ञिपंचेंद्रिय जीवांस) दुष्ट ग्रहाप्रमाणें (पिशाचाप्रमाणें) अनेक प्रकारचे विकार करणारें आणि तिसरें सांशयिक मिथ्यात्व, तें कित्येकांस ह्मणजे श्वेतांबरमताचे इंद्राचार्यासारखे जे जीव त्यांस हृदयांत घुसलेल्या शल्याप्रमाणें दुःख देतें.

नन्वविद्यामूलमिथ्यात्वनिर्मथनसमर्थस्य सम्यक्त्वपरिणामस्य कतमा प्रादुर्भावनसामग्रीत्यनुयोगे सतीदमुच्यते—

आतां; अविद्येचें मूळ कारण जें मिथ्यात्व त्याचें निर्मूलन करण्यास समर्थ असा जो सम्यक्त्वपरिणाम तो उत्पन्न होण्याची सामग्री कोणती आहे हें सांगतों.

आसन्नभव्यताकर्म- ।
हानिसञ्ज्ञित्वशुद्धिभाक् ॥
देशनाद्यस्तमिथ्यात्वो ।
जीवः सम्यक्त्वमश्नुते ॥ ६ ॥

टीका— अश्नुते प्राप्नोति । कोऽसौ जीव आत्मा । किं तत् सम्यक्त्वं तत्त्वार्थश्रद्धानं । किंविशिष्टः सन्? आसन्नभव्यताकर्महानिसञ्ज्ञित्वशुद्धिभाक् भव्यो रत्नत्रयाविर्भावयोग्यो जीवः । आसन्नः कतिपयभवप्राप्यनिर्वाणपदः । आसन्नश्चासौ भव्यश्चासन्नभव्यस्तस्य

भाव आसन्नभव्यता । कर्महानिर्मिथ्यात्वादीनां सम्यक्त्वप्रतिबन्धककर्मणां यथासम्भवमुपशमः क्षयोपशमः क्षयो वा । सञ्ज्ञा शिक्षाक्रियालापोपदेशग्राहित्वं सञ्ज्ञाऽस्यास्तीति सञ्ज्ञी । सञ्ज्ञिनो भावः सञ्ज्ञित्वं । श्लोकः—मनोऽवष्टम्भतः शिक्षाक्रियालापोपदेशवित् । येषां ते सञ्ज्ञिनो मर्त्या वृषकीरगजादयः ॥ १ ॥ शुद्धिर्विशुद्धपरिणामः । आसन्नभव्यता च कर्महानिश्च सञ्ज्ञित्वं च शुद्धिश्चेतीतरेतरयोगे द्वन्द्वे सति ताश्चतस्रो भजते सेवते ततो नापैतीति तद्भागन्तरङ्गसम्यग्दर्शनादिभावकारणसम्पन्न इत्यर्थः। पुनः किंविशिष्टः । देशनाद्यस्तमिथ्यात्वः देशना सम्यग्गुरूपदेशः सा आदिर्यस्य जातिस्मरणाजिनप्रतिमादर्शनादेर्बहिरङ्गकारणकलापस्य स देशनादिः तेन अस्तं निराकृतमुपशमाद्यवस्थां नीतं मिथ्यात्वं दर्शनमोहाख्यं कर्म तद्धेतुको वा सर्वथैकान्ताभिनिवेशो यस्य स तथोक्तः ॥

**अर्थः—आसन्न ह्मणजे कांहीं भवांनीं ज्याला निर्वाण पद प्राप्त व्हावयाचें आहे, आणि त्यामुळें जो भव्य ह्मणजे रत्नत्रयाचें ग्रहण करण्यास योग्य झाला आहे, व ज्याच्या सम्यक्त्वप्रतिबंधक कर्मांची हानि झाली आहे ह्मणजे सम्यक्त्वाला प्रतिबंधक अशा मिथ्यात्व वगैरे सप्तप्रकृतिरूप कर्मांचा उपशम[1], क्षयोपशम[2] आणि क्षय[3] या तीहींपैकीं**

---

१ कर्म असून त्याचा उदय न होणें याला उपशम ह्मणतात. उदाहरण— पाण्यांत गाळ असला तरी त्यांत निवळीचें बीं टाकल्यास तो गाळ खालीं जाऊन असून नसल्यासारखा दिसतो.

२ कर्म असून त्याचा उदय न होणें आणि थोडा थोडा क्षय होत जाणें याला क्षयोपशम ह्मणतात. उदाहरण— अर्धे स्वच्छ असलेलें पाणी.

एक प्रकार झाला आहे, आणि ज्याला संज्ञा आहे, ज्याचे परिणाम शुद्ध आहेत, "अर्थात् हीं वर सांगितलेलीं सम्यक्त्व प्राप्त होण्याचीं अंतरंग कारणें (मुख्य सामग्री) ज्यास प्राप्त झालीं आहेत" असा असून; सद्गुरूचा उपदेश, जिनप्रतिमेचें दर्शन, पूर्वभवांचे स्मरण इत्यादि बाह्य कारणांनीं ज्याचें मिथ्यात्व नाहींसें झालें आहे, असा जो जीव त्याला सम्यक्त्व प्राप्त होतें. तात्पर्य; आसन्नभव्यता,

---

३ संपूर्णपणें कर्म नाहींसें होणें याला क्षय ह्मणतात. उदाहरण-- भांड्यांत ठेवलेलें निर्मळ पाणी.

१ मनोऽवष्टम्भतः शिक्षाक्रियालापोपदेशवित् ॥
येषां ते संज्ञिनो मर्त्या वृषकीरगजादयः ॥ १ ॥

अर्थ— शिक्षा, क्रिया, आलाप आणि उपदेश हे दृढपणानें (विस्मरण न होण्यासारखें) जाणणारें असें मन ज्यांचें असतें ते जीव संज्ञी होत. संज्ञी जीव मुख्यत्वेंकरून चार प्रकारचे आहेत. ते हे, मनुष्य, बैल, शुक आणि हत्ती. जेणेंकरून हित होईल तें करावें आणि अहित होईल तें करूं नये. अशा प्रकारचा बोध ज्या पासून होतो त्याला शिक्षा ह्मणतात. ही शिक्षा ग्रहण करण्यास मनुष्य समर्थ आहे. हात, पाय व मस्तक वगैरे हलविणें याला क्रिया ह्मणतात. ही क्रिया बैलास शिकविल्यास तो शिकूं शकतो. (उदाहरणः— नंदीबैल, घोडा इ०) श्लोक पद्य वगैरे पाठास आलाप ह्मणतात. हे आलाप शुकासारख्या जीवांस शिकविल्यास ते ह्मणूं शकतात. उपदेश ह्मणजे कांहीं खुणेचे शब्द हे शब्द हत्ती, कुत्रा वगैरे जीवास शिकविल्यास कळतात. अशा प्रकारच्या संज्ञा ज्या जीवांस आहेत त्यांना उपदेश वगैरे सामग्री मिळाल्यास सम्यक्त्व होतें.

**कर्महानि, संज्ञित्व आणि शुद्धपरिणाम ही सम्यक्त्व प्राप्त होण्याची अंतरंग (मुख्य) सामग्री होय. आणि सद्‌गुरूचा उपदेश, जिनप्रतिमादर्शन, पूर्वभवस्मरण वगैरे ही बाह्यसामग्री जाणावी.**

साम्प्रतं योऽयं सम्यक्त्वसामग्र्यां सत्यां सम्यग्गुरूपदेशोऽवश्यं-मृग्यस्तस्येदानीमत्र समुपदेष्टॄणां प्रविरलत्वानुशोचनद्वारेण दुर्लभत्वं लक्षयति---

**आतां, ह्यापैकीं उपदेश हा सद्‌गुरूवांचून प्राप्त होत नाहीं. पण, या कालीं सद्‌गुरु दुर्मिळ असल्याबद्दल खेद प्रदर्शित करतो.**

कलिप्रावृषि मिथ्यादि- ।
ङ्मेघच्छन्नासु दिक्ष्विह ॥
खद्योतवत्सुदेष्टारो ।
हि द्योतन्ते क्वचित्क्वचित् ॥ ७ ॥

टीका— द्योतन्ते प्रकाशन्ते आत्मानं दर्शयन्ति दृश्यन्ते इत्यर्थः के ते सुदेष्टारः सु शोभनं निर्बाधं सम्पूर्णं वा जीवादितत्त्वं दिशन्त्युपादिशन्तीति सुदेष्टारः सम्यग्गुरवः। क्वचित्क्वचित् क्वापि क्वापि न सर्वत्र ॥ कस्मिन् इह भरतक्षेत्रे । किंवत् खद्योतवत् ज्योतिरिङ्गणा यथा । कासु सतीषु दिक्षु सदुपदेशेषु ककुप्सु च। किंविशिष्टासु मिथ्या सर्वथैकान्त-विषयत्वादसत्या दिशो बौद्धादिवाद्युपदेशास्त एव मेघा दिशामिवाने-कान्तोपदेशनावारकत्वात् तैश्च्छन्नासु छादितासु प्रतीत्याविषयीकृतासु कदा कलिप्रावृषि कलिः दुष्षमाख्यः पञ्चमकालः स एव प्रावृड् वर्षा-कालस्तत्र । अयमर्थः यदा वर्षाकाले मेघाच्छादितासु दिक्षु सूर्यादि-प्रकाशाभावे क्वचित्क्वचित्प्रदेशे खद्योता द्योतन्ते तथेह दुःषमायां क-

चित्क्वचिदार्यदेशे सदुपदेष्टारः प्रकाशन्ते । न पुनः कृतयुगादिवद्यत्र-तत्रश्रुतकेवलिनः केवलिनो वा दृश्यन्ते इति । हि शब्देन कष्टार्थे-नान्तस्तापमभिव्यनक्ति ॥

अर्थः—या आपल्या भरत क्षेत्रांत कलिकाल ह्मणजे पंचमकाल रूपी पावसाळ्यांत मिथ्यात्वोपदेशरूपी मेघांनीं सदुपदेशरूपी दिशा झाकून टाकिल्या असतां मोक्षमार्गाचा उपदेश करणारे गुरु खद्योताप्रमाणें ( काजवा ) क्वचितच ह्मणजे कोठें तरी एखाद्या ठिकाणीं व तेंहि कधींतरी दिसून येतात. तात्पर्य, चतुर्थ कालांत जसे जिकडे पहावें तिकडे केवली, श्रुतकेवली वगैरे उपदेशकर्त्ते मोक्षमार्गाचा प्रकाश करीत विहार करणारे दिसून येत असत, तसे सूर्य या कालीं कोणी नाहींतच. पण काजव्यासारखे ह्मणजे अल्प प्रकाश करणारे जे कोणी आहेत, तेहि क्वचित्च ह्मणजे एखादे ठिकाणीं व कधींतरी आढळतात.

---

१ विद्वन्मन्यतया सदस्यतितरामुद्दण्डवाग्डम्बराः ।
शृंगारादिरसैः प्रमोदजनकं व्याख्यानमातन्वते ॥
ये ते च प्रतिसद्म सन्ति बहवो व्यामोहविस्तारिणो ।
येभ्यस्तत्परमात्मतत्वविषयं ज्ञानं तु ते दुर्लभाः ॥ १ ॥

अर्थ— आपण विद्वान् आहों असें समजून मोठा आडंबर करून सभेंत शृंगार वगैरे रसांनीं संतोष उत्पन्न होईल असें व्याख्यान देऊन लोकांस मोहांत पाडणारे उपदेशक घरोंघर आहेत. पण, ज्यांच्यापासून परमात्मतत्वाचें ज्ञान होईल असे जे उपदेशक ते मात्र दुर्लभ होत.

इह दुष्षमासमयसामर्थ्याद्देशिकवद्देश्यानामपि दर्शनमोहोदयाक्रान्तचित्ततया देशनानर्हत्वात्प्रायो भद्रका अपि पुरुषा देशनायां भूयासुरित्याशास्ते—

आतां या कलिकालाच्या सामर्थ्यामुळें उपदेशक जसे विरळा आहेत, तसेच उपदेश ऐकण्यास योग्य असे पुरुषहि विरळाच आहेत. ह्मणून आह्मी अशी आशा करितों किं,

नाथामहेऽद्य भद्राणा- ।
मप्यत्र किमु सद्दृशाम् ॥
हेम्न्यलभ्ये हि हेमाश्म- ।
लाभाय स्पृहयेन्न कः ॥ ८ ॥

टीका—नाथामहे भद्रका अपि जीवा देशनार्हा भूयासुरित्याशास्महे। के वयं । केषां भद्राणामपि । किमु किं पुनः । सद्दृशां सद्दृष्टीनां विशेषतो नाथामह इत्यर्थः । क्व अत्र क्षेत्रे । कदा अद्य अस्मिन्काले अमुमेवार्थमुत्तरार्धेन समर्थयते । हि यस्मादर्थे । को न स्पृहयेत् नाभिलषेत् । कस्मै हेमाश्मलाभाय सुवर्णोपलप्राप्त्यर्थं । क्व सति हेम्नि सुवर्णे । किंविशिष्टे अलभ्ये लब्धुमशक्ये ॥

अर्थः—या भरत क्षेत्रांत आज ह्मणजे या पंचम कालीं निदान भद्र पुरुष तरी होवोत अशी आह्मी आशा करितों. असें जर आहे तर सम्यग्दर्शनी पुरुषांची अधिकच आशा करूं. सोनें मिळत नसल्यावर सोन्याचा दगड जरी मिळाला तर त्यास कोण इच्छिणार नाहीं काय? इच्छीलच. तद्वत् सम्यक्त्वी नाहीं तर भद्र पुरुष तरी होवोत अशी आह्मी आशा करितों.

भद्रकस्य लक्षणमुक्त्वा तस्यैव द्रव्यतया देशनार्हत्वमाह—

आतां भद्रपुरुषाचें लक्षण सांगून तोच पुढें सम्यक्त्वी होण्याला योग्य असल्यामुळें उपदेशार्ह आहे असें सांगतों.

कुधर्मस्थोऽपि सद्धर्मं ।
लघुकर्मतयाऽद्विषन् ॥
भद्रः स देश्यो द्रव्यत्वा- ।
न्नाभद्रस्तद्विपर्ययात् ॥ ९ ॥

टीका— भण्यते । कोऽसौ भद्रः । किं कुर्वन् अद्विषन् द्वेषविषयमकुर्वन् । कं सद्धर्मं सन् समीचीनः प्रमाणोपपन्नो धर्मोऽभ्युदयनिःश्रेयसोपायस्तम् । कया लघुकर्मतया लघु अल्पं कर्म सद्धर्मद्वेषनिमित्तं मिथ्यात्वं यस्य सोऽयं लघुकर्मा तस्य भावस्तत्ता तया लघुकर्मतया । किंविशिष्टोऽपि कुधर्मस्थः प्रमाणबाधिते धर्मे आसक्तः । न केवलमुभयोर्मध्यस्थ इत्यपिशब्दार्थः । किं पुनरसावित्याह देश्यः धर्मे व्युत्पादनीयः । कोऽसौ स भद्रः । कस्मात् द्रव्यत्वात् आगामिसम्यक्त्वगुणयोग्यत्वात् । न पुनर्देश्यः । कोऽसावभद्रः कुधर्मस्थः सद्धर्मं गुरुकर्मतया द्विषन् । कस्मात् तद्विपर्ययात् आगामिसम्यक्त्वगुणयोग्यत्वाभावात् ॥

अर्थः—आपण कुधर्माच्या ठिकाणीं आसक्त असूनहि सद्धर्माच्या ठिकाणीं द्वेष उत्पन्न होण्यास कारण असें जें मिथ्यात्व नांवचें कर्म तें ज्याचें अल्प असल्यामुळें जो स्वर्ग मोक्ष साधण्याचा उपाय अशा सद्धर्मांत आसक्त जरी नाहीं, तरी पण त्या सद्धर्माचा द्वेष करीत नाहीं अशा पुरुषास भद्र पुरुष ह्मणतात. त्याला पुढें सम्यक्त्वगुण प्राप्त होणार ह्मणून उपदेश केला पाहिजे. आणि जो कुधर्मांत

**आसक्त असून सद्धर्माचाही द्वेष करितो आणि ह्मणूनच जो सम्यक्त्वगुण प्राप्त करून घेण्यास योग्य नाहीं असा जो तो अभद्र होय.**

इदानीमाप्तोपदेशसम्पादितशुश्रूषादिगुणः सम्यक्त्वहीनोऽपि तद्वानिव सद्भूतव्यवहारभाजां प्रतिभासते इति निदर्शनेन प्रव्यक्तीकरोति—

**आतां सम्यक्त्वहीन असूनही गुरूपदेशानें शुश्रूषा वगैरे गुण ज्याला प्राप्त झाले आहेत असा मनुष्य सम्यक्त्वीप्रमाणें सत्पुरुषांस मान्य कसा होतो हें दाखवितों.**

शलाकयेवाप्तगिराऽऽप्तसूत्र- ।
प्रवेशमार्गो मणिवच्च यः स्यात् ॥
हीनोऽपि रुच्या रुचिमत्सु तद्वद् ।
भूयादसौ सांव्यवहारिकाणाम् ॥ १० ॥

टीका— यः पुरुषः स्यात् भवेत् । किंविशिष्टः आप्तसूत्रप्रवेशमार्ग एव । चशब्दस्यात्रावधारणार्थस्य योजनात् । सूत्रं परमागमः । प्रवेशमार्गः शुश्रूषादिगुणः । सूत्रस्य प्रवेशमार्गोऽन्तस्तत्त्वपरिच्छेदनोपायः सूत्रप्रवेशमार्गः । आप्तः प्राप्तः सूत्रप्रवेशमार्गो येन स तथोक्तः । कया आप्तगिरा सद्गुरुवाचा । कयेव शलाकयेव छिद्रकरवज्रसूचिकया यथा । किंवत् मणिवत् यथा मणिः शलाकया आप्तप्रवेशामार्गः स्यात् आप्तः सूत्रस्य तन्तोः प्रवेशमार्गः छिद्रं येन स तथोक्तः । असौ भूयात् प्रतिभासेत । किंवत् तद्वत् रुचिमानिव । केषां सांव्यवहारिकाणां सुनयप्रयोक्तॄणाम् । केषु मध्ये रुचिमत्सु सद्दृष्टिषु दीप्तिमन्मणिषु च मध्ये । किं-

विशिष्टोऽपि हीनोऽपि रिक्तोऽल्पो वा । कया रुच्या शुश्रुषा दीप्त्या च । किं पुना रुचिसम्पन्न इत्यपिशब्दार्थः । एतेनाव्युत्पन्न-सम्यक्त्वानां सद्दृष्टिषु मध्ये गणनीयतोपदिष्टा । सद्दृष्टिवत्तेऽपि सतां मान्या भवन्तीति भावः ॥

अर्थः— जसा वज्राच्या सूचीनें ( सुई ) ज्याला आंत दोरीचा प्रवेश होईल असें छिद्र प्राप्त झालें आहे असा मणि कांतिहीन असला तरी तो कांतियुक्त अशा मण्यांमध्यें त्यांच्यासारखा भासतो; त्याप्रमाणें गुरूच्या उपदेशानें ज्याला तत्त्वज्ञान प्राप्त होण्यास उपाय असे जे शुश्रूषा वगैरे गुण ते प्राप्त झाले आहेत असा जो पुरुष तो सम्यक्त्वहीन असला तरी तो सत्पुरुषांस सम्यक्त्वीजनांच्यामध्यें त्यांच्यासारखा सम्यक्त्ववान् भासतो.

एवं देश्यदेशकौ व्यवस्थाप्य सागारधर्माचारिणमगारिणं लक्षयितुमाह—

आतां सागारधर्माचें आचरण करण्यास गृहस्थ कसा असावा हें सांगतो.

न्यायोपात्तधनो यजन् गुणगुरून् सद्गीस्त्रि-
वर्गं भज- । न्नन्योन्यानुगुणं तदर्हगृहिणी-
स्थानालयो ह्रीमयः ॥ युक्ताहारविहार आर्य-
समितिः प्राज्ञः कृतज्ञो वशी । शृण्वन् धर्म-
विधिं दयालुरघभीः सागारधर्मं चरेत् ॥११॥

टीका— चरेत् । तृज्वाश्चार्हे इत्यनेनार्हे सप्तमी । चरितुमर्हतीत्यर्थः । विधौ वा । यथोक्तगुणेन गृहिणा सागारधर्मश्चरितव्य

इत्यर्थः । अत्र पूर्वो भद्रक उत्तरो द्रव्यपाक्षिक इति विभागः । चरेत् अनुतिष्ठेत् । कोऽसौ न्यायोपात्तधन इत्यादिविशेषणैश्चतुर्दशभिः समस्तैर्व्यस्तैर्वा विशिष्टो गृही । कं सागारधर्ममिति वाक्यार्थः । इतो विशेषणानि व्याख्यायन्ते । न्यायोपात्तधनः स्वामिद्रोहमित्रद्रोहविश्वसितवञ्चनचौर्यादिगर्ह्यार्थोपार्जनपरिहारेणार्थोपार्जनोपायभूतः स्वस्ववर्णानुरूपः सदाचारो न्यायः तेनोपात्तमुपार्जितमात्मसात्कृतं धनं विभवो येन स तथोक्तः ॥ १ ॥ यजन् गुणगुरून् । गुणाः सदाचारसौजन्यौदार्यदाक्षिण्यस्थैर्यप्रियपूर्वकप्रथमाभिभाषणादयः स्वपरोपकारिण आत्मधर्मास्तान् पूजयन् बहुमानप्रशंसासाहाय्यकरणादिना समुल्लासयन् । तथा गुरवो मातापितरावाचार्यश्च तानपि पूजयन् त्रिसन्ध्यप्रणामकरणादिनोपचरन् । तथा गुणैर्ज्ञानसंयमादिभिर्गुरवो महान्तो गुणगुरवस्तानपि यजन् सेवाञ्जल्यासनाभ्युत्थानादिकरणगणेन मानयन् । गुणाश्च गुरवश्च गुणगुरवश्चेति विगृह्यैकशेषेण गुणगुरवस्तान् ॥ २ ॥ सद्गीः सती प्रशस्ता परावर्णवादपारुष्यादिदोषरहिता गीर्वाग्यस्यासौ सद्गीः ॥३॥ त्रिवर्गं भजन्नन्योन्यानुगुणं परस्परानुपघातकं त्रिवर्गं धर्मार्थकामान् भजन् सेवमानः ॥ ४ ॥ तदर्हगृहिणीस्थानालयः गृहिणी कौलीन्यादिगुणालङ्कृता पत्नी । स्थानं पुरग्रामादि वास्तु च । आलयो गृहं । गृहिणी च स्थानं च आलयश्च गृहिणीस्थानालयाः । तदर्हास्त्रिवर्गयोग्या गृहिणीस्थानालया यस्य सः तथोक्तः ॥ ५ ॥ ह्रीमयः लज्जाया निवृत्त इव लज्जाभूयिष्ठो वा ॥ ६ ॥ युक्ताहारविहारः युक्तौ शास्त्रविहितावाहारविहारौ भोजनविचरणे यस्य सः ॥ ७ ॥ आर्यसमितिः आर्येषु सदाचरणैकप्राणेषु । न तु कितवधूर्तविटभट्टभण्डनटादिषु । समितिः सङ्गतिर्यस्यासौ ॥ ८ ॥ प्राज्ञः ऊहापोहात्मकमतिज्ञानातिशयवान् ॥ ९ ॥ कृतज्ञः कृतं परोपकृतं

जानाति न निन्हुते ॥ १० ॥ वशी इष्टेष्वर्थेष्वनासक्त्या विरुद्धे वाऽप्रवृत्त्या स्पर्शनादीन्द्रियविकारनिरोधकोऽन्तरङ्गादिषड्वर्गनिग्रह- परश्च ॥ ११ ॥ शृण्वन् धर्मविधिं धर्मस्याभ्युदयनिश्रेयसहेतोर्विधिः युक्त्यागमाभ्यां प्रतिष्ठा तं शृण्वन् प्रत्यहमाकर्णयन् ॥ १२ ॥ दयालुः दुःखितदुःखप्रहाणेच्छालक्षणां दयां शीलयन् । धर्मस्य मूलं दयेति श्रुतेस्तामवश्यं कुर्वाणः॥ १३ ॥ अघभीः अघात्पापात् दृष्टादृष्टापायफलात्कर्मणश्चौर्यादेर्मद्यपानादेश्च बिभ्यत् पापभीरुरित्यर्थः ॥१४॥ एषा संक्षेपतो व्याख्याऽत्र कृता । विस्तरतो धर्मामृतपाञ्जि- कायां ज्ञानदीपिकासंज्ञिकायां कृता सा सर्वाऽत्र द्रष्टव्या ॥

अर्थः—१ न्यायानें द्रव्य मिळविणारा, २ सद्‌गुण व गुरु यांची पूजा करणारा, ३ सत्य व मधुर भाषण करणारा, ४ धर्म अर्थ व काम या तीन पुरुषार्थांस परस्पर विरोध न आणितां सेवणारा, ५ वरील पुरुषार्थ साधण्यास योग्य अशा नगरांत किंवा गांवांत व तेथेंहि चांगल्या घरांत कुल- वधूसह वास करणारा, ६ मर्यादेनें वागणारा, ७ योग्य आहार विहार करणारा, ८ सज्जनाची संगती करणारा, ९ विचारवान्, १० केलेले उपकार जाणणारा, ११ अंतरंग जे सहा शत्रु त्यांना स्वाधीन ठेवणारा, १२ धर्मविधि ऐकणारा, १३ दयाळु आणि १४ पापभीरु असा जो मनुष्य तो सागारधर्म चालविण्यास योग्य होय.

स्पष्टीकरण.—१ न्यायोपार्जन – स्वामिद्रोह (मालकाशीं विरोध), मित्रद्रोह, विश्वासघात, चोरी इत्यादि निंद्यकृत्यें सोडून देऊन आपापल्या जातिधर्मास अनुसरून लोकमान्य असा व्यवहार करून जें द्रव्य मिळविणें त्याला न्यायोपार्जन ह्मणतात. न्यायानें जें द्रव्य मिळविलें जातें तें इहलोकीं

व परलोकीं सुखावह होतें. कारण, आपण त्याचा पाहिजे तसा विनियोग करण्यास व आपल्या मित्रबंधु वगैरे जनांस विभाग करून देण्यास कोणत्याच प्रकारची शंका[१] येत नाहीं. चोरी वगैरे निंद्यकृत्यें करून मिळविलेलें द्रव्य वापरण्यास जसें भय असतें तसें भय यांत नाहीं. [२]अन्यायानें द्रव्य मिळविणारांस राजा शिक्षा करितो, शिवाय लोकांत अपमान होऊन आणखी पुष्कळ प्रकारची दुःखें भोगावीं लागतात. ह्मणून न्या[३]यानेंच द्रव्य मिळविलें पाहिजे. तेणेंकरून इहलोकीं सुख होतें. न्यायानें मिळविलेलें द्रव्य सत्पात्रीं देऊन व दीन लोकांवर करुणा करून तें खर्चिल्यास परलोकींहि सुख होतें. द्रव्यावांचून

---

१ सर्वत्र शुचयो धीराः सुकर्मबलगर्विताः ॥
स्वकर्मनिहितात्मानः पापाः सर्वत्र शङ्किताः ॥ १ ॥

अर्थः—आपल्या कर्तव्यांत निमग्न झालेले आणि सत्कर्माच्या बलानें पुष्ट झालेले असे धीर पुरुष सर्वाठिकाणीं स्वच्छ अंतःकरणानें वागतात. आणि पापी लोक सर्वत्र संशयितवृत्तीनें असतात.

२ अन्यायोपार्जितं वित्तं दशवर्षाणि तिष्ठति ॥
प्राप्ते त्वेकादशे वर्षे समूलं च विनश्यति ॥ २ ॥

अर्थः—अन्यायानें मिळविलेलें द्रव्य फार तर दहा वर्षें टिकतें. अकराव्या वर्षीं तें सर्व समूळ नष्ट होतें.

३ यान्ति न्यायप्रवृत्तस्य तिर्यञ्चोऽपि सहायताम् ॥
अपन्थानं तु गच्छन्तं सोदरोऽपि विमुञ्चति ॥ ३ ॥

अर्थः—न्यायानें वागणारास पशूदेखील सहाय करितात. आणि अन्यायानें वागणारास बंधूदेखील सोडून देतो.

गृहस्थधर्म चालत नाहीं ह्मणून येथें प्रथम त्याचेंच वर्णन केलें आहे. २ गुणपूजा ह्मणजे आंगीं सद्गुण धारण करणें व जे गुणी आहेत त्यांचा सन्मान करणें. सौजन्य, औदार्य, दाक्षिण्य ( दुराग्रह नसणें ) प्रियभाषण आणि सदाचार[1] हे सर्व सद्गुण होत. गुरुपूजा.— माता, पिता आणि आचार्य हे तिघे गुरु होत. माता आणि पिता यांची पूजा ह्मणजे रोज तीन वेळ त्यांना नमस्कार करणें, त्यांचा सदुपदेश ऐकणें, त्यांचे आवडते पदार्थ प्रेमानें आणून देणें, ही त्यांची पूजा[2] होय. आचार्य ह्मणजे विद्या शिकविणारा गुरु; त्यांची सेवा करणें, ते आले असतां हात जोडून उभें राहणें इत्यादि. ३ सत्य व मधुर भाषण— परनिंदा[3], अपमान, कठोरता इत्यादि दोषरहित

---

१ लोकापवादभीरुत्वं दीनाभ्युद्धरणादरः ॥
कृतज्ञता सुदाक्षिण्यं सदाचारः प्रकीर्तितः ॥ १ ॥

अर्थः—लोकापवादास भिणें, दीनांचा उद्धार करण्यांत प्रीति ठेवणें, दुसऱ्यांनीं केलेले उपकार जाणणें आणि दाक्षिण्य ठेवणें ह्मणजे कठोरपणा किंवा दुराग्रह न करणें याला सदाचार ह्मणतात.

२ यन्मातापितरौ क्लेशं सहेते सम्भवे नृणाम् ॥
न तस्य निष्कृतिः शक्या कर्त्तुं वर्षशतैरपि ॥ २ ॥

अर्थः—आपण जन्मास येतों त्या वेळीं आपले आईबाप जो क्लेश सहन करितात त्याचे उपकार फेडूं ह्मटल्यास शंभर वर्षें त्यांची सेवा केल्यानेंहि ते फिटणार नाहींत.

२ यदिच्छसि वशीकर्त्तुं जगदेकेन कर्मणा ॥
परापवादसस्येभ्यो गां चरन्तीं निवारय ॥ २ ॥

अर्थः—एकाच उपायानें सगळें जग जर वश करावें ह्मणशील

जें भाषण त्याला मधुर भाषण ह्मणतात. ४ धर्म-अर्थ-काम– ज्यापासून अभ्युदय ह्मणजे देवेंद्र–नागेंद्र--चक्रवर्ती इत्यादि पद आणि निःश्रेयस ह्मणजे मोक्षपद यांची सिद्धि होते, तो धर्म. ज्यापासून सर्व प्रकारच्या कार्यांची सिद्धि होते तो अर्थ, ह्मणजे धन. आपल्यापुढें श्रेष्ठ कोणीच नाहीं अशा प्रकारचा परस्पर अभिमान बाळगणारीं जीं इंद्रियें त्यांची जी रसाविषयीं प्रीति त्याचें नांव काम. याप्रमाणें हे जे तीन पुरुषार्थ आहेत यांना त्रिवर्ग ह्मणतात. या त्रिवर्गाचें नित्य सेवन करावें. पण त्यांपैकीं एकाच्या सेवनानें दुसऱ्याची हानी होऊं नये. ह्मणजे धर्म व अर्थ

---

तर तो उपाय हा कीं, तुझी वाणी रूपी गाय परनिंदा रूपी पीक चरत असल्यास तिला तेथून परतीव. ह्मणजे परनिंदा करूं नको.

३ परपरिभवपरिवादादात्मोत्कर्षाच्च बध्यते कर्म ॥
नीचैर्गोत्रं प्रतिभवमनेकभवकोटिदुर्मोचम् ॥ ३ ॥

अर्थः—भाषणानें दुसऱ्याचा अपमान व निंदा करणें आणि स्वतांची प्रशंसा करणें यापासून नीच गोत्रांचें कर्म बांधतें. ह्मणजे असा पापी जीव प्रतिजन्मीं नीच चांडालादि कुलांत जन्म पावतो. जन्म मरण कोटिवेळां झालें तरी त्या नीचगोत्रापासून त्याची सुटका होणें कठीण.

१ यस्य त्रिवर्गशून्यानि दिनान्यायान्ति यान्ति च ॥
स लोहकारभस्त्रेव श्वसन्नपि न जीवति ॥ १ ॥

अर्थः— धर्म, अर्थ व काम या तीन पुरुषार्थांच्या सेवनावांचून ज्याचे दिवस येतात व निघून जातात तो मनुष्य लोहाराच्या भात्याप्रमाणें श्वासोच्छ्वास करीत असूनहि मेल्याप्रमाणें होय.

यांचा सर्वथा नाश करून, विषय सुखाचा अनुभव घेऊं नये. जो केवळ कामसेवनांतच आसक्त होतो तो धर्मभ्रष्ट होतो. त्याच्या जवळचें द्रव्य सगळें नाहींसें होतें, शिवाय त्याच्या देहाची हानी होते. धर्म व काम यांचा अतिक्रम करून केवळ धनच जो मिळवितो तोहि मूर्खच होय. कारण आपण मिळविलेलें द्रव्य धर्मकृत्याकडे न खर्चिलेमुळें त्याला अन्यजन्मीं सुखाचें साधन राहिलें नाहीं व आतांहि त्याचा उपभोग न घेतल्यामुळें तें तसेंच राहून आपल्या पश्चात् दुसऱ्याच्या हवालीं होतें. आपण मात्र केवळ पापाचा अधिकारी होतो. याकरितां मनुष्यानें धर्म संभाळून व योग्य तितकें कामसेवन करून धन मिळवावें. अर्थ व काम यांचा अतिक्रम करून केवळ धर्ममार्गानें वागणें हें यतीचें कर्म आहे. गृहस्थानें धन मिळविलेंच पाहिजे. धर्माचा सर्वथा त्याग करून अर्थ व काम यांचें सेवन करूं नये. पीक पुष्कळ आलें तरी बींज न राखून ठेवणारा शेतकरी जसा कष्ट पावतो तसा पुष्कळ प्राप्ति झाली तरी त्यांतला कांहीं भाग धर्मकृत्याकडे खर्च न करणारा मनुष्य

---

१ पादमायान्निधिं कुर्यात्पादं वित्ताय खट्वयेत् ॥
धर्मोपभोगयोः पादं पादं भर्तव्यपोषणे ॥ १ ॥

अर्थः—आपल्या उत्पन्नाचे चार विभाग करावे. त्यांतून एक भाग शिलकेंत ठेवावा. दुसरा भाग भांडवलांत घालावा. तिसरा भाग धर्मकृत्यें व स्वतांकरितां खर्चावा. आणि चवथा कुटुंबपोषणाकडे खर्च करावा.

आयार्द्धं च नियुञ्जीत धर्मे समधिकं ततः ॥

पुढें दुःखी होतो. जो परलोकसंबंधी सुखास विघ्न न आणितां इहलोकींचें सुख भोगितो तो सुखी. जो द्रव्य सगळें खर्च करून केवळ धर्म व काम सेवितो तो विपत्तींत पडतो. कामसेवन न करून केवळ धर्म व अर्थ सेवणारांस गृहस्थपणा संभवत नाहीं. तादात्विक, मूलहर आणि कदर्य असे धनिकांचे तीन भेद आहेत. या तिघांच्या हातून धर्मरक्षण व कामसेवन होत नाहीं. जो पुढचा मागचा कांहींच विचार न करून मिळविलेल्या द्रव्याचा दुर्व्यय करितो तो तादात्विक होय. जो वडिलानें मिळवून ठेविलेलें द्रव्य अन्यायानें खाऊन टाकितो, तो मूलहर जाणावा. आणि स्वतांस व आपल्या सेवक लोकांसहि पुष्कळ त्रास देऊन द्रव्य मिळवून ठेवितो व कोणत्याच कामाकडे त्याचा व्यय करीत नाहीं तो कदर्य होय. या तिघांपैकीं तादात्विक आणि मूलहर या दोघांजवळचें द्रव्य खरचून गेल्यामुळें त्यांना धर्म व काम हे दोन पुरुषार्थ साधत नाहींत. त्यामुळें त्याचें कल्याण होत नाहीं. कदर्याचें द्रव्य राजा किंवा चोर वगैरे घेऊन जातात त्यामुळें तो इहपरलोकींच्या सुखास मुकतो. ह्मणून धर्म, अर्थ व काम या तीन्ही पुरुषार्थांस परस्पर बाधा न आणितां त्यांचें सेवन करावें.

---

शेषेण शेषं कुर्वीत यत्नतस्तुच्छमैहिकम् ॥ २ ॥

अर्थः—आपल्या उत्पन्नाच्या अर्ध्यापेक्षां कांहीं अधिक भाग धर्मकृत्याकडे खर्च करावा. आणि मग बाकी राहील त्यांतून कसेंहि करून प्रपंच चालवावा. कारण ऐहिकसुख हें तुच्छ आहे ह्मणून त्यांत अधिक द्रव्य खर्चूं नये.

जेंव्हां दुर्दैववशात् बाधा येते तेंव्हां उत्तरोत्तर बाधेच्या वेळीं त्याच्या पूर्वपूर्व अर्थाची बाधा दूर करावी. ह्मणजे काम नांवाच्या पुरुषार्थास जेंव्हां बाधा येते तेंव्हा धर्म व अर्थ यांचें रक्षण करावें. कारण या दोहोंपासून केंव्हांहि कामसिद्धि होण्यासारखी आहे. जेंव्हां काम व अर्थ या दोहोंस बाध येतो, तेंव्हां धर्मरक्षण करावें. कारण धर्म हें सकल पुरुषार्थांचें मूल आहे. या प्रमाणें धर्म अर्थ आणि काम या त्रिवर्गाचें सेवन करावें.

५ गृहिणी, स्थान, आलय.—जी आपल्या समानकुलांत जन्मलेली असून मातापिता, गुरु व सभ्यजन यांच्या समक्ष जिनें आपलें पाणिग्रहण केलें आहे, जी सदाचारानें चालणारी आहे अशी स्त्री गृहिणी होय. गृहिणी ह्मणजे घरची मालकीण. घरांत अशी स्त्री असली ह्मणजे धर्म,

---

१ अभ्युत्थानमुपागते गृहपतौ तद्भाषणे नम्रता ।
तत्पादार्पितदृष्टिरासनविधौ तस्योपचर्या स्वयं ॥
सुप्ते तत्र शयीत तत्प्रथमतो जह्याच्च शय्यामिति ।
प्राज्ञैः पुत्रि निवेदिताः कुलवधूसिद्धांतधर्मा इमे ॥ १ ॥

अर्थः—( सीता श्वशुरगृहीं चालली असतांना जनकराजा तिला उपदेश करितो. ) हे पुत्रि; पति आला असतांना त्याचा सन्मान राखण्याकरितां उठून उभें राहावें. आपली दृष्टि त्याच्या पायांकडे असावी. अर्थात् नम्रदृष्टि असावी. उद्धतपणानें पतीच्या तोंडाकडे पहात राहूं नये. त्याचें भाषण आपण नम्रपणें ऐकावें, शयनकालीं त्याची पदसेवा करावी. त्याला झोंप लागल्यावर आपण शयन करावें. पति उठण्याच्या पूर्वीं आपण उठावें, हे सर्व कुलवधूचे ठरलेले धर्म आहेत.

अर्थ व काम हे पुरुषार्थ चांगले साधतात. आणखी स्त्री अशी असावी कीं, तिनें पतीशीं कपटाचरण करूं नये, जावा व नणदा ह्यांशीं नम्र असावें, सासूची सेवा करावी, बंधुजनाशीं स्नेहानें असावें, सेवकावर दया करावी, सपत्नीशीं विरोध करूं नये, इत्यादि सद्गुणांनीं युक्त अशी स्त्री असावी. आपण ज्या गांवांत किंवा नगरांत राहतो, तेथें जिनमंदिर, सत्पुरुष वगैरे धर्मवृद्धीचीं साधनें असावींत. आपला प्रपंचनिर्वाह चांगला चालून द्रव्य संपादनहि होईल अशी अनुकूलता असावी. अशा गांवांत आपण आपलें घर करावें. त्या घरांत कोणत्याहि ऋतूंमध्यें आपणास त्रास न होईल अशा प्रकारें तें बांधलेलें असावें. अशा घरांत जिनप्रतिमा ठेवण्याकारितां व धर्मध्यान स्वाध्याय वगैरे करण्याकारितां एकांत व स्वतंत्र अशी जागा असावी. ६ मर्यादेनें वागणें.— मर्यादा ह्मणजे लज्जा. ह्मणजे आपलें ऐश्वर्य, वय, अवस्था, देश, काल व आपलें कुल यांला अनुसरून वेष करणें. जो लज्जावान् आहे तो आपल्या देश कुल व जातीस निंद्य असें आचरण करीत नाहीं. ७ आहार ह्मणजे भोजन. धर्मशास्त्रांत ज्या पदार्थांचा निषेध केला आहे ते पदार्थ खाऊं नयेत. शिवाय वैद्यशास्त्रास अनुसरून भोजन करावें.

---

१ यदि सत्सङ्गनिरतो भविष्यसि भविष्यसि ॥
अथ सज्ज्ञानगोष्ठीषु पतिष्यसि पतिष्यसि ॥ १ ॥

अर्थः— जर तूं सज्जनाची संगत करशील तर खरोखर चांगल्या ज्ञानांच्या गोष्टींत पडशील. ह्मणजे विचारवान् होशील.

विहार ह्मणजे आरोग्यदायक व्यायाम. आपल्या प्रकृतीस अनुकूल असा व्यायाम नित्य करावा. ८ आर्य-समिति ह्मणजे सज्जनांची संगति. मिथ्यात्वी, मायावी, व्यसनी हे सगळे दुर्जन होत. यांची संगति करूं नये. ९ प्राज्ञ ह्मणजे विचारवान्. जो विचारवान् असतो तो बलाबलाचा विचार करितो, आणि तो दीर्घदर्शी असतो, व सर्वांपेक्षां विशेष जाणतो. हें बळ चार प्रकारचें आहे. द्रव्यबळ, क्षेत्रबळ, कालबळ आणि भावबळ. हें बळ आपलें किती व दुसऱ्याचें किती याचा विचार करणें याला बलाबल विचार म्हणतात. बलाबलाचा विचार न करून कोणतेंहि काम करणारांस विपत्ति येते. आज एकादें काम करून त्यापासून पुढें म्हणजे पुष्कळ कालानें लाभ होईल किंवा तोटा होईल हें ज्याला समजतें किंवा याचा जो विचार करितो तो दीर्घदर्शी होय. वस्तूंत,

---

१ इदं फलमियं क्रिया करणमेतदेष क्रमो ।
व्ययोऽयमनुषङ्गजं फलमिदं दशैषा मम ॥
अयं सुहृदयं द्विषत्प्रयतदेशकालाविमा- ।
विति प्रतिवितर्कयन्प्रयतते बुधो नेतरः ॥ २ ॥

अर्थः—हें फळ आहे, हें उत्पन्न करण्यास अमुक क्रिया करावी लागते, त्या क्रियेचें साधन अमुक, व त्याचा क्रम असा, पण माझी दशा अमुक प्रकारची आहे, हा माझा शत्रू व हा माझा मित्र, हल्लींचा देश असा, व काल अशा प्रकारचा या सर्व गोष्टींचा विचार करून कोणतेंही काम शहाणा जो आहे तोच करितो. हें मूर्खास साधत नाहीं.

कृत्यांत व अकृत्यांत, आपल्यांत व दुसऱ्यांत विशेष अंतर काय हें ज्याला कळतें तो विशेषज्ञ. बळाबळाचा विचार, दूरदर्शीपणा आणि विशेषज्ञान हीं ज्याला आहेत तो प्राज्ञ.

१० कृतज्ञ— जो दुसऱ्यांनीं केलेले उपकार जाणतो, त्यांचें हित इच्छितो तो कृतज्ञ. जो कृतज्ञ असतो तो लोकांस प्रिय होतो. सर्व लोक पाहिजे तेंव्हां त्याला मदत करितात. ११ वशी — इष्टार्थांत फार आसक्ति न ठेवणारा, विरुद्ध अर्थांत प्रवृत्त न होणारा, पंच इंद्रियांच्या विकारांस आवरणारा व अंतरंग शत्रूंस प्रतिबंधांत ठेवणारा असा जो पुरुष तो वशी जाणावा. काम, क्रोध, लोभ, मान, मद आणि हर्ष हे सहा अन्तरंग शत्रु होत. विवाहित अगर अविवाहित अशा परस्त्रीचा अभिलाष करणें अथवा संग करणें याचें नांव काम. स्वतांच्या किंवा

---

१ प्रत्यहं प्रत्यवेक्षेत नरश्चरितमात्मनः ॥
किन्नु मे पशुभिस्तुल्यं किन्नु सत्पुरुषैरिति ॥ १ ॥

अर्थः—मनुष्यानें प्रतिदिवशीं आपल्या आचरणाचें चांगलें अवलोकन करून असा विचार करावा कीं, माझें आचरण पशूप्रमाणें आहे कीं सज्जनाप्रमाणें आहे.

२ विधित्सुरेनं तदिहात्मवश्यं । कृतज्ञतायाः समुपैहि पारम् ॥
गुणैरुपेतोऽप्यखिलैः कृतघ्नः । समस्तमुद्वेजयते हि लोकम् ।२।

अर्थः—जर तूं सगळ्या लोकांस प्रिय होऊं पाहतोस आणि त्यांना वश करून घ्यावें ह्मणतोस तर कृतज्ञ हो; कृतघ्न होऊं नको. कारण कृतघ्न जो आहे तो सर्व लोकांस त्रास देऊन अप्रिय होतो.

दुसऱ्याच्या अपायाचा विचार न करून कोप करणें याचें नांव क्रोध. सत्पात्रीं दान न देणें व निष्कारण परद्रव्य घेणें याचें नांव लोभ. गर्व करणें किंवा युक्तवचन न मानणें व इतरांस तुच्छ समजणें याचें नांव मान. कुल, बल, ऐश्वर्य, रूप व विद्या इत्यादि संपत्तीनें मस्त होणें अथवा अहंकार करणें याचें नांव मद. विनाकारण दुसऱ्यास पीडा करून व जुगार शिकार वगैरे पाप कृत्यें करून खुष होणें याला हर्ष ह्मणतात.

१२ धर्मविधि ऐकणारा[1]– अभ्युदय व निश्रेयस सुख प्राप्त होण्यास जो हेतु तो धर्म; त्याचा जो विधि ह्मणजे युक्ति व आगम यांच्या आधारानें त्याची स्थिति ह्मणजे धर्ममार्ग, तो ऐकणारा. १३ दयाळू[1]—दुःखितांचें दुःख

---

१ भव्यः किं कुशलं ममेति विमृशन्दुःखाद्भृशं भीतवान् ।
सौख्यैषी श्रवणादिबुद्धिविभवः श्रुत्वा विचार्य स्फुटम् ॥
धर्मं शर्मकरं दयागुणमयं युक्त्यागमाभ्यां स्थितिं ।
गृह्णन्धर्मकथाश्रुतावधिकृतः शास्यो निरस्ताग्रहः ॥ १ ॥

अर्थः—माझें हित कोणतें असा विचार करणारा, संसारदुःखास भिणारा, मोक्षसुखाची इच्छा करणारा, शास्त्र ऐकण्यास चतुर व तें ऐकून त्याचा चांगला विचार करून युक्ति व आगमानें सिद्ध अशा व सुखकर अशा दयाधर्माचा स्वीकार करणारा असा व दुराग्रह न करणारा इत्यादि लक्षणांनीं युक्त जो भव्य तो धर्मशास्त्र ऐकण्यास अधिकारी होय. त्याला उपदेश केला पाहिजे.

१ प्राणा यथाऽऽत्मनोऽभीष्टा भूतानामपि ते तथा ।
आत्मौपम्येन भूतानां दयां कुर्वीत मानवः ॥ १ ॥

दूर करण्याची इच्छा ज्याला आहे तो दयाळु. दया हें धर्माचे मूळ आहे. ज्याला दया नाहीं त्याला जैनधर्मानें चालण्याचा अधिकार नाहीं. शत्रु जरी असला तरी त्याच्यावर दया करावी. जो दयाळु आहे तो सर्व सद्गुणांचा निधि आहे. १४ पापभीरु–हिंसा, चोरी, लबाडी व मद्यपान वगैरे दुष्कर्मास जो भिणारा तो पापभीरु होय. याप्रमाणें चौदा गुण ज्याच्या ठिकाणी आहेत तो सागारधर्म चालविण्यास योग्य होय. सागारधर्म ह्मणजे विकलचारित्र. सकल चारित्र हें यतीला असतें.

---

अर्थः—आपले प्राण जसे आपणास आवडते आहेत तसेच सर्व जीवजंतूंसही आपआपले प्राण आवडते आहेत. ह्मणून मनुष्यानें प्राणिमात्रावर दया करावी.

श्रूयतां धर्मसर्वस्वं श्रुत्वा चैवावधार्यताम् ।
आत्मनः प्रतिकूलानि परेषां न समाचरेत् ॥ २ ॥

अर्थः—धर्मातील मुख्य सार तुह्मी ऐका; आणि ऐकून त्या प्रमाणें वर्तन करा. तो सार हाच कीं, आपणास दुःख ह्मणून जें वाटतें तें दुसऱ्यांस होऊं देऊं नका.

अवृत्तिव्याधिशोकार्तान‌नुवर्तेत शक्तितः ।
आत्मवत्सततं पश्येदपि कीटपिपीलिकाः ॥ ३ ॥

अर्थः—ज्यांना अन्न मिळत नाहीं व जे व्याधी, शोक इत्यादिकांपासून पीडित झाले आहेत अशा जीवांवर दया करून त्यांना दुःखापासून दूर करा. किडा, मुंगी वगैरे जीवांस आपल्याप्रमाणें पाहावें.

साम्प्रतं मन्दमतिविनेयानां सुखस्मृत्यर्थं सकलसागारधर्मं सङ्गृह्णाति—

**याप्रमाणें सागारधर्म चालविण्यास योग्य कोण हें सांगून आतां पूर्ण सागारधर्माचें लक्षण सांगतों.**

**सम्यक्त्वममलममला- ।**
**न्यणुगुणशिक्षाव्रतानि मरणान्ते ॥**
**सल्लेखना च विधिना ।**
**पूर्णः सागारधर्मोऽयम् ॥ १२ ॥**

टीका— भवति । अयं श्रूयमाणः । सागारधर्मः । किंविशिष्टः पूर्णः समग्रः किं किमित्याह । सम्यक्त्वं तावत्किंविशिष्टं अमलं शङ्कादिदोषरहितं । तथा अणुगुणशिक्षापूर्वाणि व्रतानि अणुगुणशिक्षाव्रतानि अणुव्रतानि गुणव्रतानि शिक्षाव्रतानि च । किंविशिष्टानि अमलानि निरतिचाराणि । न केवलं निरतिचारतत्त्वार्थश्रद्धानपूर्वाणि निरतिचाराणुव्रतादीनि किं तर्हि, मरणान्ते विधिना सल्लेखना चेत्ययं सम्पूर्णः श्रावकधर्मः । शेषविशेषणानां यथास्वमत्रैवान्तर्भावादनुक्तसमुच्चयार्थेन चशब्देन समुच्चयनाच्च । तत्र मरणमेवान्तो मरणान्तस्तद्भवमरणं नत्वावीचिमरणं । तस्य प्रतिक्षणं सर्वप्राणिषु भावात् । सल्लेखना सम्यक् लाभाद्यनपेक्षत्वेन लेखना बाह्येनाभ्यन्तरेण च तपसा कायकषायाणां कृशीकरणम् । विधिस्तु सप्तदशाध्याये वक्ष्यते ॥ (यत्प्रतिसमयमायुषः कर्मणो निषेकस्योदयपूर्विका निर्जरा भवति तदावीचिमरणम् )

**अर्थ—शंकादि दोषरहित सम्यक्त्व, व निरतिचार अशीं पांच अणुव्रतें तीन गुणव्रतें आणि च्यार शिक्षाव्रतें**

हीं पाळणें, आणि शेवटीं ह्मणजे मरणकालीं विधिपूर्वक सल्लेखना ह्मणजे समाधिमरण साधणें, अर्थात् पुत्र, मित्र, कलत्र, धन, विषयसुख इत्यादि पदार्थांविषयीं ममत्व सोडून शांतचित्तानें धर्मध्यानांतच लीन होऊन देहत्याग करणें, हा पूर्ण सागारधर्म होय. मरणकालीं विधिपूर्वक ज्यानें सल्लेखना केली त्यानें श्रावकधर्मरूपी प्रासादावर कळसच चढविला असें ह्मणावयाचें.

असँयमिनोऽपि सम्यग्दृशः कर्मक्लेशापकर्षो भवतीत्युपदेशार्थमिदमाह—

आतां अव्रती अशाहि सम्यग्दृष्टि जीवाच्या कर्मक्लेशाचा अपकर्ष होतो, हें दाखवितों.

भूरेखादिसदृक्कषायवशगो यो विश्वदृश्वाज्ञया।
हेयं वैषयिकं सुखं निजमुपादेयं त्विति श्रद्दधत्॥
चौरो मारयितुं धृतस्तलवरेणेवाऽऽत्मनिन्दादिमान्।
शर्माक्षं भजते रुजत्यपि परं नोत्तप्यते सोऽप्यघैः १३

टीका— नोत्तप्यते नोत्कृष्टं क्लिश्यते। कोऽसौ सोऽपि अविरतसम्यग्दृष्टिः। किं पुनः त्यक्तविषयसुखः सर्वात्मनैकदेशेन वा हिंसादिभ्यो विरतश्चेत्यपिशब्दार्थः। कैः कर्तृभिः अघैः पापैर्दोषैर्वा बहुभिः। यः किं करोतीत्याह। यो भजते सेवते। किंतच्छर्म सुखम्। किं विशिष्टं आक्षं अक्षेभ्य इन्द्रियेभ्य आगतं चक्षुरादिभिरिष्टरूपादीननुभवत आविर्भूतमित्यर्थः। न केवलमिन्द्रियसुखमनुभवति यो रुजत्यपि पीडयति च। कं परं स्थावरं जगमं वा भूतग्रामं। किं कुर्वन् श्रद्दधत् अभिनिविशमानः।

किं हेयं वैषयिकं सुखं निजमुपादेयमित्येव। तुरत्रावधारणार्थो भिन्नक्रमः। हेयं त्याज्यं न जातु सेव्यं। किं तत् सुखं किं विशिष्टं वैषयिकं विषयेष्विष्टकामिन्यादिष्वनुभूयमानेषु जातं। तत्सेवनस्य दुःखकारणकर्मबन्धनिबन्धनत्वात्। तथा उपादेयं रत्नत्रयोपयोगादात्मन्याविर्भावनीयं। किं तत् सुखं। किंभूतं निजं आत्मोत्थं नित्यं वा। इत्येवं रोचमानो न स्वप्नेऽप्यन्यथा। कया हेतुभूतया विश्वदृश्वाज्ञया विश्वदृश्वनः सर्वज्ञस्य आज्ञा शासनमनुल्लंघ्यं तया। नान्यथावादिनो जिना इति दृढतमप्रतिपत्त्येत्यर्थः। एतेन निश्चयसम्यग्दर्शनभाग्भवन्नित्युक्तं वेदितव्यम्। पुनः किंविशिष्टः सन् आत्मनिन्दादिमान् धिग्मामेवं प्रदीपहस्तमप्यन्धकूपे पतन्तमित्यात्मानं निन्दयन्। भगवन्कथमस्मै दुर्गतिदुःखाय घटिष्यते एवमुत्पथचारी जनोऽयमिति गुरुसाक्षिकं गर्हमाणश्च। नन्वेवंभूतो भवन्नपि कुतोऽक्षसुखं सेवते कुतश्च तदर्थं भूतग्रामं पीडयतीत्याह॥ भूरेखादिसदृक्कषायवशगो यतः भूरेखादिभिः पृथ्वीभेदादिभिः सदृशास्तुल्याः कषायाः भूरेखादिसदृक्कषायाः। दृषदवनीत्यादिसूत्रोक्तलक्षणा अप्रत्याख्यानावरणादयो द्वादश क्रोधादिविकल्पाः तेषां वशः पारतंत्र्यं तं गच्छतीति तद्वशश्चारित्रमोहोदयपरतंत्रः सन्नित्यर्थः। क इव चौर इव तस्करो यथा। किं विशिष्टः भृतोऽवरुद्धः। किं कर्तुं मारयितुं मारयिष्याम्येनमहमिति प्रतिरुद्धः। केन तलवरेण कोट्टपालेन। अयमर्थो यथा तलवरेण मारयितुमुपक्रान्तश्चौरो यद्यत्तेन खरारोहणादिकं कार्यते तत्तत्करोति तथा जीवोऽपि चारित्रमोहोदयेन यद्यदात्मनीनं भावद्रव्यहिंसादिकं कार्यते तत्तदयोग्यं जानन्नपि करोत्येव। दुर्निवारत्वात्स्वकाले विपच्यमानस्य कर्मणः। एतेन सम्यक्त्वग्रहाणात्पूर्वमबद्धायुषोऽसंयतस्यापि सम्यग्दृष्टेः सुदेवत्वसुमानुषत्वव्यतिरेकेण सकलसंसारसंहरणात् कर्म-

क्लेशापकर्षः । बद्धायुषस्तु पश्चाद्गृहीतसम्यक्त्वस्य नरकगतेरपि रत्नप्रभायां जघन्यस्थित्यैवानुभवनसम्भवात् बहुदुःखोपरमश्च प्रतिपादितः प्रतिपत्तव्यः ततः संयमलब्धिकालात्पूर्वं संसारभीरुणा भव्येन सम्यग्दर्शनाराधनायां नित्यं यतितव्यमिति विधौ पर्यवसन्नमेतत्सूत्रमधिगन्तव्यम् ॥

अर्थः— सर्वज्ञ वीतराग अन्यथा उपदेश कधींच करणार नाहीं अशा दृढनिश्चयानें त्याची आज्ञा सत्य मानून, विषयसुख हें त्याज्य आहे आणि रत्नत्रय पाळणें हा आत्मधर्म आहे अशी श्रद्धा जो ठेवितो, व तराळानें मारण्याकरितां धरलेला चोर जशी आत्मनिंदा करितो व पश्चात्ताप पावतो, तत्प्रमाणें आपण विषयसुखापासून विरत न झाल्याबद्दल आपला धिःकार करून, पुनः अप्रत्याख्यान क्रोध, मान, माया रूप कषायामुळें अर्थात् सांप्रत अनिवार्य अशा चारित्रमोहनीय कर्माच्या उदयामुळें विषयसुखाचें सेवन करितो, व हिंसादिक पंच पातकेंहि करितो अर्थात् व्रतें पाळीत नाहीं, असाहि सम्यग्दृष्टि जीव विशेष दुःख पावत नाहीं. अशा जीवास अविरत सम्यग्दृष्टि

---

१ न दुःखबीजं शुभदर्शनक्षितौ । कदाचन क्षिप्रमपि प्ररोहति ।
सदाप्यनुप्तं सुखबीजमुत्तमं । कुदर्शने तद्विपरीतमिष्यते ॥ १ ॥

अर्थः—सम्यग्दर्शनरूपी भूमींत दुःखाचें बीज पेरलें तरी तें लवकर उठत नाहीं व सुखाचें बींज पेरलें नाहीं तरी सुख उत्पन्न होतें. आणि याच्या उलट मिथ्यादर्शनरूपी भूमीचें आहे. ह्मणजे तेथें सुखाचें बींज पेरलें तरी तें उगवत नाहीं व दुःखाचें बींज पेरलें नाहीं तरी उगवतें.

ह्मणतात. अविरत सम्यग्दृष्टि जो आहे, त्याला सम्यक्त्व प्राप्त व्हावयाच्या पूर्वी जरी दुर्गतीचा बंध झाला तरी त्यास दुःखाची स्थिति फारच थोडी होते. ह्मणून ज्याला संसारयातनेची भीति आहे अशा भव्यजीवानें

---

१ णो इन्दिएसु विरदो णो जीवे थावरे तसे चावि ।
जो सद्दहइ जिणुत्तं संमाइट्ठी अविरदो सो ॥ १ ॥

अर्थः—जो इंद्रियसुखाच्या विषयापासून विरक्त झाला नाहीं आणि त्रस व स्थावर जीवांच्या वधापासूनही विरक्त झाला नाहीं पण जिनवचनावर पूर्ण श्रद्धा ठेवितो तो अविरत सम्यग्दृष्टि होय.

२ दुर्गतावायुषो बन्धात्सम्यक्त्वं यस्य जायते ॥
गतिच्छेदो न तस्यास्ति तथाप्यल्पतरा स्थितिः ॥ २ ॥

अर्थः—दुर्गतींतल्या आयुष्याचा बंध झाल्यावर ज्याला सम्यक्त्व होतें त्याच्या त्या दुर्गतीचा छेद जरी होत नाहीं, तरी तेथें फारच थोडी स्थिती होऊन दुःखहि अल्पच होतें.

३ जन्मोन्माज्यँ भजतु भवतः पादपद्मं न लभ्यं ।
तच्चेत्स्वैरं चरतु न च दुर्देवतां सेवतां सः ॥
अश्नात्यन्नं यदिह सुलभं दुर्लभं चेन्मुधाऽऽस्ते ।
क्षुद्व्यावृत्त्यै कवलयति कः कालकूटं बुभुक्षुः ॥ ३ ॥

अर्थः—हे देवा, जन्म मरणांचा नाश करावा ह्मणून ज्याची इच्छा आहे तो अलभ्य अशा तुझ्या पदकमलाची भक्ति करूं दे. तुझ्या ठायीं भक्ति तेवढी दृढ ठेऊन; तो पाहिजे तसा वागल्यास हरकत नाहीं. कारण, जो सम्यक्त्वी झाला, तो आज नाहीं कालान्तरानें तरी ज्ञानपूर्वक चारित्र पाळीलच. पण त्यानें कुदेवांची मात्र सेवा करूं नये. कारण; भुकेला मनुष्य अन्न

आपणास व्रतें पाळण्याचें सामर्थ्य नसलें तरी तोंपर्यंत सम्यग्दर्शनाच्या प्राप्तीकरितां नित्य यत्न करावा. ह्मणजे जिनेश्वर, जिनानें उपदेशिलेलें शास्त्र आणि रत्नत्रयधारी मुनि यांच्यावर भक्ति ठेवावी.

इदानीं धर्मशर्मवद्यशोऽपि मनःप्रसत्तिनिमित्तत्वात् शिष्टैरवश्यं सेव्यमित्युपदेष्टुमाह–

आतां यश हें चित्तास प्रसन्नता देणारें आहे ह्मणून त्याविषयीं थोडें सांगतों.

धर्मं यशः शर्म च सेवमानाः ।
केऽप्येकशो जन्म विदुः कृतार्थम् ॥
अन्ये द्विशो विद्म वयं त्वमोघा- ।
न्यहानि यान्ति त्रयसेवयैव ॥ १४ ॥

**टीका**— विदुः जानन्ति । के केऽपि लौकिकाः । किं तत् जन्म मनुष्यभवग्रहणम् । किंविशिष्टं कृतार्थं कृतः साधितोऽर्थः प्रयोजनं साध्यं यस्य तत् । किंकुर्वाणाः सेवमानाः कर्तव्यतानुरक्तबुध्या साधयन्तः । कं धर्मं सुकृतं । यशः कीर्तिं । शर्म सुखं । कथं एकशः एकैकं । केचिद्धर्ममात्रं केचिद्यशोमात्रं केचिच्छर्म सुखमात्रं साधयन्तो वयं प्राप्तमनुष्यजन्मफला इति मन्यन्ते । नानारुचित्वाल्लोकस्य । तथा अन्ये लोकच्छन्दानुवर्तिनः शास्त्रज्ञम्मन्याः । विदुः ।

---

खाईल तर त्याला सुख होईलच पण अन्न मिळत नाहीं ह्मणून क्षुधेची निवृत्ति करण्याकरितां जर तो कालकूट विषाचें भक्षण करील तर त्याचा परिणाम भयंकर होईल.

किं जन्म । किम्भूतं कृतार्थं । किं कुर्वाणाः धर्मं यशः शर्म च सेवमानाः । कथं द्विशः द्वे द्वे केचिद्धर्मयशसी केचिद्धर्मशर्मणी केचिद्यशःशर्मणी च साधयन्तो जन्म फलवन्मन्यन्त इत्यर्थः । तर्हि युष्माकं किं मतमित्यत्राह । तुर्विशेषे । विद्म जानीमः । के ते वयं लौकिकशास्त्रज्ञपरितोषकारिणः । कानि अहानि दिनानि अर्थान्नृजन्मसम्बन्धीनि । किं कुर्वन्ति यान्ति गच्छन्ति । किंविशिष्टानि अमोघानि सफलानि । कया त्रयसेवया धर्मयशःशर्मसाधनया न पुनरेकैकस्य द्वयोर्द्वयोर्वा निर्वर्तनयेत्येवकारार्थः । एतेनाहर्हर्यथाशक्ति धर्मादित्रयं साध्यमिति विधिः प्रत्येयः ॥

अर्थः— कित्येकांचें मत असें आहे कीं; पुण्य, यश आणि सुख यांपैकीं कोणतें तरी एक सेवन करून आयुष्याचे दिवस घालविले ह्मणजे आपण मनुष्यजन्म पावल्याचें सार्थक्य झालें. अशा समजुतीनें पुण्यच आचरितात, कित्येक सुखच सेवितात, आणि कित्येक फक्त कीर्ति मिळवितात. आणखी कित्येक असे आहेत कीं, त्यांच्यापैकीं कोणांस पुण्य व यश हीं आवडतात, कोणांस यश व सुख हीं आवडतात; आणि कित्येकांस पुण्य व सुख आवडतात. यांत तुमचें मत काय ह्मणून विचाराल तर आह्मी असें ह्मणतों कीं; पुण्य, यश व सुख हीं तीन्हीं सेवून ज्यांच्या आयुष्याचे दिवस जातात त्यांचेंच जन्म सफल होय.

एवं भावितसम्यक्त्वस्य संयतत्वसामग्रीविरहे कालादिलब्धिकाभादवश्यारोहणीयं सँयतासँयतत्वपदं निर्देष्टुमाह—

आतां; सम्यक्त्व प्राप्त झाल्यावर पुढें काळ वगैरे

**लब्धीमुळें अवश्य प्राप्त होणारें जें संयतासंयतत्व पद, तें वर्णितो.**

मूलोत्तरगुणनिष्ठा- ।
मधितिष्ठन् पञ्चगुरुपदशरण्यः ॥
दानयजनप्रधानो ।
ज्ञानसुधां श्रावकः पिपासुः स्यात् ॥१५॥

**टीका--** स्यात् भवेत् । कोऽसौ श्रावकः श्रुणोति गुर्वादिभ्यो धर्ममिति श्रावकः देशसँयतः । किं कुर्वन् अधितिष्ठन् उपयुञ्जानः । कां मूलोत्तरगुणनिष्ठां मूलानि उत्तरगुणप्ररोहणनिमित्तत्वात् सँयमार्थिभिः प्रागनुष्ठेयत्वाच्च उत्तरे मूलगुणानन्तरसेव्यत्वादुत्कृष्टत्वाच्च । मूलानि च उत्तरे च मूलोत्तरास्ते च ते गुणाश्च संयमविकल्पाः । तेषां निष्ठा निर्वाहो दृष्टफलनिरपेक्षतया निराकुलं वहन् । किम्भूतो भूत्वेत्याह । पंचगुरुपदशरण्यः पंचानां गुरूणामर्हदादीनां पदानि चरणाः शरण्यानि शरणे आर्तिहरणे स्वात्मसमर्पणे वा साधूनि योग्यानि यस्य स तथोक्तः । एवं सम्यग्दर्शनपूर्वकं देशसँयममधितिष्ठतो दानयजनाध्ययनलक्षणमाचारं कर्तव्यतया दानेत्यादिना निर्दिशति । कीदृशस्तथाभूतः श्रावकः स्यात् । दानयजनप्रधानः दानं पात्रादिदत्तिश्चतुर्धा । यजनं नित्यमहादियज्ञः पंचधा । दानं च यजनं च दानयजने प्रधाने मुख्ये यस्यासौ । वार्ता तु श्रावकस्य गौणीति प्रधानग्रहणाल्लक्षयति । किं चरिष्णुः श्रावकः स्यात् पिपासुः पातुमिच्छुः उपयोक्तुकामः । कां ज्ञानसुधां स्वपरान्तरज्ञानामृतम् ॥

**अर्थः— जो गुरूपासून मिळालेला उपदेश श्रवण करितो तो श्रावक होय. श्रावकपदाचे मूलगुण ह्मणजे**

जे अंगीं असले तर उत्तरगुण ( पूर्वीपेक्षां उत्तमगुण ) प्राप्त होतात ते, आणि उत्तरगुण ह्म० मूलगुण असल्या-शिवाय जे प्राप्त होत नाहींत ते, ह्या दोन्ही गुणांस इहलोक सुखाची इच्छा न धरून, ‘ केवळ आपलें कर्त्तव्य तें केलेंच पाहिजे अशा निश्चयानें ’ अनुभविणारा अर्थात् मूलगुण व उत्तरगुण पाळणारा, अरहंत, सिद्ध वगैरे पंचपरमेष्ठीं-च्यां[1]च पदांची भक्ति करणारा, चार प्रकारचें दा[2]न व पांच प्रकारची पूजा या दोन क्रियाच ज्याला मुख्य आहेत ह्मणजे गृहस्थांनीं अवश्य केलेच पाहिजेत असे जे कृषि वगैरे उदरनिर्वाहाचे उद्योग ते गौण समजून करणारा व दान-पूजादि क्रिया श्रेष्ठ[3] मानणारा, व ज्ञानरूपी अमृत

---

१ जो तसवहादु विरदो अविरदओ तह य थावरवहादो ॥
एक्कसमयाम्हि जीवो विरदाविरदो जिणेक्कमइ ॥ १ ॥

अर्थः—जो स्थावर जीवाची हिंसा करण्यापासून विरत झाला नाहीं व त्रसजीवांची हिंसा करीत नाहीं आणि केवळ जिनेश्वराच्या ठायींच ज्याची भक्ति आहे असा जो जीव; तो विरताविरत ह्मणजे देशविरत सम्यग्दृष्टि होय.

२ ध्यानेन शोभते योगी संयमेन तपोधनः ॥
सत्येन वचसा राजा गेही दानेन शोभते ॥ २ ॥

अर्थः—आत्मध्यानी मुनि, संयमी तपस्वी, सत्यवचनी राजा आणि सत्पात्रीं दान देणारा गृहस्थ हे विशेष शोभतात.

३ आयुःश्रीवपुरादिकं यदि भवेत्पुण्यं पुरोपार्ज्जितं ॥
स्यात्सर्वं न भवेन्न तच्च नितरामायासितेऽप्यात्मनि ॥

पान करणारा असा जो मनुष्य तो 'संयतासंयत' श्रावक होय, यालाच देशविरत ह्मणतात.

एवं पञ्चमगुणस्थानं निर्दिश्य तद्विकल्पानां भावद्रव्यात्मना-मेकादशानामुपासकपदानां मध्येऽन्यतमं विशुद्धदृष्टिर्महाव्रतपरि-पालनलालसो यथात्मशक्ति यः प्रतिपद्यते तमभिनन्दति–

याप्रमाणें पांचव्या गुणस्थानाचें वर्णन करून; आतां, या पांचव्या गुणस्थानाचे जे अकरा प्रकार ह्मणजे श्राव-काच्या ज्या अकरा प्रतिमा आहेत, त्यांपैकीं कोणत्याहि प्रतिमेचा अधिकारी होऊन सकलविरतिरूप जो यतिधर्म तो प्राप्त कधीं होईल अशी उत्कट इच्छा बाळगणाऱ्या श्रावकाचें अभिनंदन करितों.

रागादिक्षयतारतम्यविकसच्छुद्धात्मसंवित्सुख- ।
स्वादात्मस्वबहिर्बहिस्त्रसवधाद्यंहोव्यपोहात्मसु ॥

---

इत्यार्याः सुविचार्य कार्यकुशलाः कार्येऽत्र मंदोद्यमा ।
द्रागागामिभवार्थमेव सततं प्रीत्या यतन्ते तराम् ॥ ३ ॥

अर्थः—जर पूर्वजन्मीं उपार्जिलेलें पुण्य असेल तर ह्या जन्मीं पुष्कळ आयुष्य, लक्ष्मी, सुंदर व नीरोग शरीर इत्यादि सर्व सुखाचीं साधनें प्राप्त होतात. तें जर नसेल तर पाहिजे तितके यत्न करूनही सुख होत नाहीं. यासंबंधीं चांगला अनुभवानें विचार करून, कार्यचतुर असे आर्य पुरुष; इहलोकसंबंधी कार्यांत साधारण प्रयत्न करीत पुढील भवांतील सुखसामग्री-करितांच मोठ्या आवडीनें व त्वरा करून फारच खटपट करितात. अर्थात् दान–पूजा वगैरे धर्मक्रिया मुख्य मानून; कृषि, व्यापार वगैरेस गौण मानितात.

सद्दृग्दर्शनिकादिदेशविरतिस्थानेषु चैकादश- ।
स्वेकं यः श्रयते यतिव्रतरतस्तं श्रद्दधे श्रावकम् १६

टीका— श्रद्दधे साधु करोत्ययमिति प्रतिपद्येऽहम् । कं तं श्रावकं । यः किं ? यः श्रयते स्वीकुरुते । किं तत् ? एकं पदं । केषु मध्ये ? दर्शनिकादिदेशविरतिस्थानेषु । कतिषु एकादशसु वक्ष्यमाणेषु । कथम्भूतो भूत्वा ? सदृक् सम्यग्दर्शनशुद्धः । पुनः किंविशिष्टः यतिव्रतरतः यतीनामनगाराणां व्रतानि सर्वहिंसादिविरतिपरिणामास्तेषु रत आसक्तः । सर्वविरतिकलशारोपणो हि श्रावकधर्मप्रासादः । किंविशिष्टेषु भावतस्तेष्वित्याह रागादिक्षयतारतम्येत्यादि । क्षयः सर्वघातिस्पर्धकानामुदयाभावः अर्थाद्देशघातिस्पर्धकानामुदयः । तारतम्यं यथोत्तरमुत्कर्षः । रागादीनां रागद्वेषमोहानां क्षयतारतम्येन विकसन्ती आविर्भवन्ती चासौ शुद्धात्मसंविच्च निर्मलचिद्रूपानुभूतिः सैव तदुत्थं वा सुखमानन्दस्तस्य स्वादः स्वसंवित्याऽनुभवः स एवात्मा स्वरूपं येषां तानि तदात्मानि तेषु । कैवंभूतेषु अबहिरध्यात्मं । तर्हि द्रव्यतः किंरूपेष्वित्याह बहिः शरीरे वाचि मनसि च त्रसवधं आदिर्येषां स्थूलादीनां तानि त्रसवधादीनि तान्येव अंहांसि पापानि तत्फलत्वात्तेभ्यो व्यपोहो विधिपूर्वकं देवगुरुसधर्मसाक्षिकमपोहो विरतिः सैवात्मा एषां तानि तेषु । 'च' शब्दस्यात्र भिन्नक्रमस्य योजनात् ।

अर्थः—श्रावक पदवींचीं जीं दर्शनिक वगैरे ११ स्थानें आहेत; तीं अशीं आहेत कीं; त्यांत राग, द्वेष, मोह वगैरे विकारांचा उत्तरोत्तर ह्मणजे पहिल्यापेक्षां दुसऱ्यांत अधिक क्षय होऊन, त्यामुळें विकास पावणारें जें

निर्मल असें आत्मज्ञान, तोच एक प्रकारचा आनंद किंवा त्या आत्मज्ञानापासून होणारा आनंद त्याचा स्वाद ह्मणजे स्वज्ञानाचा अनुभव होतो; आणि भावहिंसा ह्मणजे हिंसारूप परिणाम व द्रव्यहिंसा ह्मणजे मनानें, कायेनें व वचनानें केली जाणारी हिंसा; व स्थूल अशी चोरी, लबाडी, परस्त्रीगमन इत्यादि पातकें यांचा त्यांत गुरुसाक्षीनें त्याग केला जातो. अशा ११ स्थानांपैकीं कोणत्याहि एका स्थानाचा स्वीकार करून जो सम्यग्दृष्टि श्रावक यतिधर्माच्या ठिकाणीं प्रीति ठेवितो त्याचें मी अभिनंदन करितों. तो धन्य होय असें समजतों.

किं लक्षणास्ते दर्शनिकादयो भवन्तीत्युद्दिशति—

आतां श्रावकांचे दर्शनिकादि अकरा भेद सांगतों.

दृष्ट्या मूलगुणाष्टकं व्रतभरं सामायिकं प्रोषधं ।
सच्चित्तान्नदिनव्यवायवनितारम्भोपधिभ्यो मतात्
उद्दिष्टादपि भोजनाच्च विरतिं प्राप्ताः क्रमात्प्राग्गुण-
प्रौढ्या दर्शनिकादयः सह भवन्त्येकादशोपासकाः

**टीका**— भवन्ति । के उपासकाः श्रावकाः । कति एकादश किन्नामानः दर्शनिकादयः दर्शनिकोऽथ व्रतिक इत्यादिना वक्ष्यमाणाः । किं विशिष्टाः सन्तः प्राप्ताः प्रतिपन्नाः । किं तत् दृष्टया मूलगुणाष्टकमित्यादि विरतिमित्यन्तं देशसंयमं । तथाहि सम्यक्त्वेन विशिष्टं मूलगुणाष्टकं प्राप्तो दर्शनिकः । स एव च व्रतभरं निरतिचाराण्यणुव्रतादीनि प्राप्तो व्रतिकः । एवमुत्तरेष्वपि सम्बन्धः कर्तव्यः । व्यवायो मैथुनम् । वनिता स्त्रीः । उपधिः परिग्रहः मतात् मदर्थं साधुकृतमनेनेदमित्यनु-

मोदितात्। मतादुद्दिष्टाच्च भोजनादपि विरतिं प्राप्तोऽनुमतविरत उद्दिष्टविरतश्च योऽनुमतमुद्दिष्टं च भोजनमपि न कुर्यात् स किमन्यत्रारम्भादौ पापकर्मण्यनुमतिं दद्यादुद्दिष्टं वा वसत्याच्छादनादिकमुपयुञ्जीतेत्यपिशब्दाल्लभ्यते । कथं ते तत्तत्पदं प्राप्ताः सह सार्धम्। कया प्राग्गुणप्रौढ्या दृष्टिमूलगुणाष्टकप्रकर्षेण सह व्रतभरं, तत्त्रयप्रकर्षेण सामायिकमित्यादियुक्त्या ते तथा भवन्तीत्यर्थः। कस्मात्तथा भवन्ति क्रमात् अनादिविषयाभ्यासासंयमभग्नमनस्कतया युगपत्तत्रासामर्थ्यात् ॥

अर्थः—सम्यग्दर्शनासह आठ मूलगुण पाळणारा जो श्रावक तो दर्शनिक होय. दर्शनिक श्रावकच जेव्हां अणुव्रतें वगैरे पाळितो तेव्हां तो व्रतिक होतो. व्रतिकच जेव्हां त्रिकाळ सामायिक करितो तेव्हां तो सामायिक या नांवाच्या तिसऱ्या प्रतिमेचा अधिकारी होतो. याप्रमाणेंच पूर्वपूर्व प्रतिमेंतील गुणांसह वरच्या वरच्या प्रतिमेचा स्वीकार करणारे जे श्रावक त्यांचे ११ भेद आहेत. ते हेः— १ दर्शनिक २ व्रतिक ३ सामायिक ४ प्रोषधोपवासी ५सचित्तत्यागी ६ दिवामैथुनत्यागी ७ ब्रह्मचारी ८ आरंभत्यागी ९ परिग्रहत्यागी १० अनुमतित्यागी [ माझ्याकरितां यानें चांगलें केलें असें ह्मणणें किंवा मानणें याला अनुमति ह्मणतात. ] ११ उद्दिष्टत्यागी. हीं जीं श्रावकांचीं ११ स्थानें केलीं आहेत, तीं एवढ्याचकरितां कीं, संसारी जीवास अनादि कालापासून विषयांचा संबंध असल्यामुळें ते एकदम सुटत नाहींत ह्मणून क्रमानें सोडण्याचा अभ्यास करण्याकरितां कल्पिलीं आहेत.

साम्प्रतं दुरितापचयनिमित्तेज्यादिधर्मकर्मसिध्द्यर्थं कृष्यादि-

षट्कर्मलक्षणां वार्तामाचरतो गृहस्थस्यावश्यंभावी सावद्यलेशः प्रायश्चित्तेन पक्षादिभिश्च निराकार्य इत्युपदेशार्थमाह–

आतां पापनिवारणार्थ नित्यपूजा वगैरे ज्या क्रिया आहेत त्यांच्या सिद्धीकरितां कृषि वगैरे षट्कर्म करून द्रव्य मिळविणाऱ्या श्रावकास जो कांहीं पापाचा लेश लागतो तो प्रायश्चित्त, पक्ष इत्यादि उपायांनीं नाहींसा करावा असा उपदेश करितो.

नित्याष्टान्हिकसच्चतुर्मुखमहः कल्पद्रुमैन्द्रध्वजा- ।
विज्याः पात्रसमाक्रियान्वयदयादत्तीस्तपःसंयमान् ॥
स्वाध्यायं च विधातुमादृतकृषीसेवावणिज्यादिकः ।
शुध्याऽऽप्तोदितया गृही मललवं पक्षादिभिश्च क्षिपेत्

टीका— क्षिपेत् निराकुर्यात् । कोऽसौ गृही गृहस्थः । कं मललवं पापलेशम् । कया शुध्या प्रायश्चित्तेन । किंविशिष्टया आप्तोदितया परावरगुरुनिरूपितया । न केवलं तया पक्षादिभिश्च पक्षचर्यासाधनैस्त्रिभिः । किंविशिष्टः सन् आदृतकृषीसेवावणिज्यादिकः आदृतानि यथास्वं प्रवर्तितानि कृषीसेवावणिज्या आदिशब्दान्मषीविद्याशिल्पानि च षडाजीवनकर्माणि येन सः आदृतकृषीसेवावणिज्यादिकः । किं कर्तुं विधातुं कर्तुं करिष्याम्यह-

---

उक्तं च आर्षे भगवज्जिनसेनपादैः ॥

महापुराणांत श्रीजिनसेन आचार्यांनीं सांगितलें आहे कीं,–

१ प्रोक्ता पूजार्हतामिज्या सा चतुर्धा सदार्चनम् ॥
चतुर्मुखमहः कल्पद्रुमश्चाष्टाह्निकोऽपि च ॥ १ ॥

मिज्यादीनि जिनागमप्रसिद्धानि पञ्च धर्मकर्माणीति अध्यवसाय। कानि तानीत्याह। नित्येत्यादि नित्यमहः अष्टान्हिकमहः सच्चतुर्मुखमहः कल्पद्रुमः कल्पवृक्षः ऐन्द्रध्वजश्चेति पञ्चार्हत्पूजा-विशेषाः इज्याः। चतुर्मुखस्य सदितिविशेषणादत्रेदानीमयमेव परमोत्कृष्टः कल्पवृक्षस्यासम्भवादिति प्रकाशयति। अत एवै-न्द्रध्वजेन सह समस्यैष निर्दिष्टः। पात्रेत्यादि समा आत्मना समाना क्रिया आधानादिका उपलक्षणान्मन्त्रव्रतादयश्च यस्यासौ समक्रियः। पात्रं च समक्रियश्च अन्वयश्च दया च पात्रसम-क्रियान्वयदयास्तदाश्रया दत्तयो दानानि तद्दत्तयस्ताः। पात्रदत्तिं समानदत्तिमन्वयदत्तिं दयादत्तिं च। तपोऽनशनादि संयमं व्रतधारणं। स्वाध्यायं श्रुतभावनाम्॥

---

अर्थः—अरहंताच्या पूजेस 'इज्या' ह्मणतात. ती चार प्रकारची आहे. नित्यमह, चतुर्मुख, कल्पवृक्ष आणि अष्टाह्निक.

तत्र नित्यमहो नाम शश्वज्जिनगृहं प्रति॥
स्वगृहान्नीयमानाऽर्चा गन्धपुष्पाक्षतादिका॥ २॥
चैत्यचैत्यालयादीनां भक्त्या निर्मापणं च यत्॥
शासनीकृत्य दानं च ग्रामादीनां सदार्चनम्॥ ३॥

अर्थः—दर दिवशीं गंध, पुष्प, अक्षता वगैरे पूजनसामग्री आपल्या घरांतून घेऊन जाऊन तेथें जिनाची पूजा करणें, याला नित्यमह ह्मणतात. जिनबिंब किंवा जिनमंदिर वगैरे नवान करवून; तेथें नित्य पूजा चालण्याकरितां गांवें वगैरे देऊन, तो खर्च निरंतर चालविणें यासहि नित्यमह ह्मणतात.

या च पूजा मुनीन्द्राणां नित्यदानानुषङ्गिणी॥
स च नित्यमहो ज्ञेयो यथा शक्त्युपकल्पितः॥ ४॥

अर्थः— १ नित्य, अष्टह्निक, चतुर्मुख, कल्पद्रुम आणि ऐंद्रध्वज ह्या पांच प्रकारच्या इज्या; २ पात्रदत्ति, समानदत्ति, अन्वयदत्ति आणि दयादत्ति हीं चार दानें; ३ तप, ४ संयम आणि ५ स्वाध्याय ह्या पांच क्रिया जिनागमांत श्रावकांकरितां सांगितल्या आहेत. त्या चालविण्याकरितां कृषी वगैरे षट्कर्म करणाऱ्या गृहस्थास

---

अर्थः—आपल्या शक्तीप्रमाणें मुनीश्वरांची पूजा करून त्यांना नित्य आहार देणें यालाहि नित्यमह ह्मणतात.

महामकुटबद्धैस्तु क्रियमाणो महामहः ॥
चतुर्मुखः स विज्ञेयः सर्वतोभद्र इत्यपि ॥ ५ ॥

अर्थः—चक्रवर्तीचे ताब्यांतील जे मकुटबद्ध राजे, त्यांच्याकडून केली जाणारी जी पूजा तिला महामह किंवा सर्वतोभद्र ह्मणतात.

दत्वा किमिच्छुकं दानं सम्राड्भिर्यः प्रवर्त्यते ॥
कल्पवृक्षमहः सोऽयं जगदाशाप्रपूरणः ॥ ६ ॥

अर्थः— तुह्मांस काय पाहिजे असें विचारून याचकांची इच्छा पूर्ण करीत चक्रवर्ती राजा जी पूजा करितो तिला कल्पवृक्ष ह्मणतात. जगाची इच्छा पूर्ण करणारा तो कल्पवृक्ष.

अष्टाह्निको महः सार्वजनिको रूढ एव सः ॥
महानैन्द्रध्वजोऽन्यस्तु सुरराजैः कृतो महः ॥ ७ ॥

अर्थः— चौथा अष्टान्हिकमह जगप्रसिद्धच आहे. शिवाय एन्द्रध्वज ह्मणून एक पांचवा मह आहे, तो देवेंद्रांकडून केला जात असतो.

पापाचा लेश लागतो. ह्मणून गुरूच्या उपदेशानें प्राय-श्चित्त घेऊन किंवा पक्ष, चर्या, साधन या तीन उपायांनीं गृहस्थानें त्या पापलेशाचा परिहार करावा. श्लोकांत चतुर्मुख पूजेला सत् हें विशेषण लाऊन त्याचीच प्रधानता

---

बलिस्नपनमित्यन्यत्रिसंध्यासेवया समम् ॥
उक्तेष्वेव विकल्पेषु ज्ञेयमन्यच्च तादृशम् ॥ ८ ॥

अर्थः—आणखी; बलिस्नपन, नित्य त्रिकाल पूजा व त्याच-प्रमाणें इतर कांहीं प्रकार पूजेचे आहेत; त्या सर्वांचा वरील पांच भेदांतच अंतर्भाव होतो.

एवंविधविधानेन या महेज्या जिनेशिनाम् ॥
विधिज्ञास्तामुशन्तीज्यां वृत्तिं प्राथमकल्पिकीम् ॥ ९ ॥

अर्थः—आतां वर सांगितल्याप्रमाणें स्वशक्त्यनुसार जिनाची जी पूजा ती श्रावकांची पहिली वृत्ति ह्मणजे पहिलें कर्तव्य होय.

वार्ता विशुद्धवृत्त्या स्यात्कृष्यादीनामनुष्ठितिः ॥
चतुर्धा वर्णिता दत्तिर्दयादानसमाऽन्वयैः ॥ १० ॥

अर्थः—शुद्ध आचरणानें कृषि वगैरे उदरनिर्वाहाचे सहा प्रकारचे उद्योग करणें याला वार्ता ह्मणतात. दयादत्ति, पात्रदत्ति, समानदत्ति आणि अन्वयदत्ति अशा भेदांनीं ‘ दान ’ चार प्रकारचें आहे.

सानुकम्पमनुग्राह्ये प्राणिवृन्देऽभयप्रदा ॥
त्रिशुध्यानुगता सेयं दयादत्तिर्मता बुधैः ॥ ११ ॥

अर्थः—अनुग्रह करण्यास योग्य अशा दीन प्राण्यांच्या समुदायावर कृपा करून; मनानें व कायेनें त्यांचें भय निवारण

दाखविली आहे; कारण हल्लींच्या काळीं कल्पवृक्ष नांवाची पूजा होऊं शकत नाहीं. ह्मणून चतुर्मुखपूजा श्रेष्ठ मानिली आहे.

---

करणें याला ' दयादत्ति ' ह्मणतात.

महातपोधनायाच्र्याप्रतिग्रहपुरःसरम् ॥
प्रदानमशनादीनां पात्रदानं तदिष्यते ॥ १२ ॥

अर्थः—उत्तम प्रकारें तप करणारे जे महातपस्वी दिगंबर मुनि, त्यांना सन्मानानें बोलावून त्यांची पूजा वगैरे करून आहार, औषध, पुस्तकें इत्यादि देणें याला ' पात्रदान ' ह्मणतात.

समानायात्मनाऽन्यस्मै क्रियामन्त्रव्रतादिभिः ॥
निस्तारकोत्तमायेह भूहेमाद्यतिसर्जनम् ॥ १३ ॥
समानदत्तिरेषा स्यात् पात्रे मध्यमतामिते ॥
समानप्रतिपत्त्यैव प्रवृत्ता श्रद्धयाऽन्विता ॥ १४ ॥

अर्थः—क्रिया, मंत्र व व्रतें इत्यादिकांनीं जो आपल्या बरोबरीचा आहे आणि संसार सागराच्या परतीरास जाण्याच्या उद्योगास जो लागलेला आहे अशा गृहस्थास जमीन, सोनें वगैरे देणें याला " समानदत्ति " ह्मणतात अथवा मध्यम पात्राला श्रद्धापूर्वक समानबुद्धीनें दान देणें याला ' समानदत्ति ' ह्मणतात.

आत्मान्वयप्रतिष्ठार्थं सूनवे यदशेषतः ॥
समं समयवित्ताभ्यां स्ववर्गस्यातिसर्जनम् ॥ १५ ॥
सैषा सकलदत्तिः स्यात् स्वाध्यायः श्रुतभावना ॥
तपोऽनशनवृत्त्यादि संयमो व्रतधारणम् ॥ १६ ॥

अर्थः—आपला वंश स्थिर राहण्याकरितां आपल्या बंधुवर्गाच्या मुलास आपला धर्म व धन हीं दोन्ही देणें याला

किमेतत्पक्षादित्रयमित्याह—

आतां पक्ष, चर्या आणि साधन या तीहींचें स्वरूप सांगतों.

**स्यान्मैत्र्याद्युपबृंहितोऽखिलवधत्यागो न हिंस्यामहं ।**
**धर्माद्यर्थमितीह पक्ष उदितं दोषं विशोध्योज्झतः ॥**
**सूनौ न्यस्य निजान्वयं गृहमथो चर्या भवेत्साधनं ।**
**त्वन्तेऽन्नेहतनूज्झनाद्विशदया ध्यात्यात्मनः शोधनम्**

**टीका—** स्यात् भवेत् । कोऽसौ पक्षः अहिंसापरिणामत्वं । किमात्मा अखिलवधत्यागः अखिलोऽनृतादिसहितो वधः प्राणातिपातः । स चेह सागारधर्मप्रक्रमात्त्रसविषय एव तस्य त्यागो वर्जनं । किंविशिष्टः मैत्र्याद्युपबृंहितो मैत्रीप्रमोदकारुण्यमाध्यस्थ्यभावनाभिरुपचितः । केन न हिंस्यामहं धर्माद्यर्थमित्येवम्प्रकारेण सङ्कल्पेन । धर्मार्थं देवतार्थं मन्त्रसिध्द्यर्थमौषधार्थमाहारार्थं वा प्राणिघातं न कुर्यामिति प्रतिज्ञाप्य । अयं हि मन्दकषायोऽपि गृहवाससेवनरतत्वेन प्रवर्तितारम्भत्वादनारम्भजामेव साङ्कल्पिकीं हिंसां परिहर्तुं शक्नोति । न पुनरारम्भानुषङ्गिणीम् । तस्या गृहिणोऽवश्यम्भावात् । क्व पक्षः स्यात् इह एतेषु पक्षादिषु मध्ये । तथा भवेत । काऽसौ चर्या दर्शनिकादारभ्यानुमतिविरतं यावदुपासकाचारः । कस्य गृहिणः । किं कुर्वतः उज्झतस्त्यजतः । किं तत् गृहं । किं कृत्वा न्यस्य स्थापयित्वा ।

---

' अन्वयदत्ति ' ह्मणतात. शास्त्राचें चिंतन करणें याला स्वाध्याय ह्मणतात. उपवास वगैरे करणें याला तप ह्मणतात. आणि व्रतें पाळणें याला संयम ह्मणतात.

कं निजान्वयं स्वं पोष्यवर्गं धनं धर्म्यं च । क्व सूनौ पुत्रे । तदसम्भवे तत्तुल्ये वंश्येऽपि । किं कृत्वा विशोध्य विधिपूर्वकं प्रायश्चित्तेन शास्त्रोक्तविधानेन निराकृत्य । कं दोषं हिंसादिकं । किंविशिष्टमुदितं कृष्यादिद्वारेणोत्पन्नं । कथमथो पक्षसँस्कारानन्तरं वैराग्यपरिणामे प्रत्यहमारोहति सतीत्यर्थः । तथा भवेत् । किं तत् साधनं । किं शोधनं शुद्धी रागादिदोषापनयनं । कस्य आत्मनः चिद्रूपस्य । कया ध्यात्या ध्यानेन । किं विशिष्टया विशदया शुद्धया । कस्मात् अन्नेहतनूज्झनात् अन्नं चाहारः ईहश्च शरीरचेष्टा तनुश्च शरीरमन्नेहतनवस्तासामुज्झनं नियतकालं यावज्जीवं च यथोचितं परित्यागस्तस्मात् । क्व अन्ते गृहत्यागावसाने मरणे चासन्ने । तुशब्दादुदितं दोषं विशोध्येत्यनुवृत्यात्रापि योज्यम्

अर्थ—मैत्री[1], प्रमोद[2], कारुण्य[3] व माध्यस्थ[4] या चार गुणांच्या योगें करून वाढलेला जो सर्व प्रकारच्या हिंसेचा त्याग ह्मणजे धर्म, आहार, औषध, देवता, मंत्र वगैरे कोणत्याहि कारणानें मी त्रस जीवांचा वध; चोरी;

---

१ प्राणिमात्रावर दया करून त्यांची विपत्ति दूर करणें याला मैत्री ह्मणतात. अथवा कोणाशीं वैर न करणें यालाहि मैत्री ह्मणतात.

२ गुणानें आपल्यापेक्षां जे श्रेष्ठ आहेत त्यांना पाहून खुष होणें व त्यांचा मत्सर न करणें याला प्रमोद ह्मणतात.

३ संकटांत असलेल्या जीवावर करुणा करणें याला कारुण्य ह्मणतात.

४ जे मिथ्यादृष्टि आहेत त्यांच्याशीं द्वेषानें व वैरभावानेंहि न वागणें याला माध्यस्थ्य ह्मणतात.

लबाडी वगैरे करणार नाहीं अर्थात् परपीडा करणार नाहीं अशा प्रकारचा जो मनाचा अहिंसा परिणामरूप भाव, त्याला पक्ष ह्मणतात. वनांत राहण्याची इच्छा मनांत ठेवून तोंपर्यंत घर सोडण्यास अभ्यास करणाऱ्या श्रावकानें आपल्या पुत्रावर किंवा पुत्र नसल्यास पुत्रासारख्यावर प्रपंचभार ठेऊन दर्शनिकापासून अनुमतित्यागापर्यंत समग्र जो आचार तो मधून मधून कांहीं दोष घडत असल्यास तो प्रायश्चित्तानें शुद्ध करीत पाळणें याला 'चर्या' ह्मणतात. आणि शेवटीं ह्मणजे मरण कालीं आहार, शरीर इत्यादिकांवरील ममत्व सोडून निर्मल अशा ध्यानानें आत्म्यास शुद्ध करणें ह्मणजे रागद्वेष परिणाम सोडणें याला 'साधन' ह्मणतात.

इदानीं पक्षादिकल्पनाद्वारेण कृतावतारान् श्रावकस्य त्रीन् प्रकारानुद्दिश्य संक्षेपेण लक्षयन्नाह—

आतां पक्ष वगैरे यांच्या कल्पनेच्या द्वारें श्रवकांचे तीन भेद संक्षेपांत सांगतों.

पाक्षिकादिभिदा त्रेधा श्रावकस्तत्र पाक्षिकः ॥
तध्दर्मगृह्यस्तन्निष्ठो नैष्ठिकः साधकः स्वयुक् ॥ २० ॥

टीका—भवति । कोऽसौ श्रावकः । कतिधा त्रेधा त्रिविधः । कया पाक्षिकादिभिदा पक्षेण चरति दीव्यति जयति वा । पाक्षिकः आदिर्यस्यासौ पाक्षिकादिः । पाक्षिको नैष्ठिकः साधकश्चेति स एव तेन वा भिद् भेदो विकल्पकथनं पाक्षिकादिभिद् तया । तानेव लक्षणतो दर्शयति तत्रेत्यादि । तत्र तस्यां पाक्षिकादिभिदि ।

भवति । कोऽसौ पाक्षिकः । किंरूपः तध्दर्मगृह्यः तस्य श्रावकस्य धर्मे एकदेशाहिंसाविरतिरूपं व्रतं गृह्यं पक्षः प्रतिज्ञाविषयो यस्यासौ प्रारब्धदेशसंयमः श्रावकधर्मस्वीकारपर इत्यर्थः । तथा भवति कोऽसौ नैष्ठिकः निष्ठया चरति तत्र वा भवः । किंविशिष्टः तन्निष्ठः तत्र तध्दर्मनिष्ठा निर्वहणं यस्यासौ घटमानदेशसंयमो निरतिचारश्रावकधर्मनिर्वाहपर इत्यर्थः । तथा भवति कोऽसौ साधकः समाधिमरणं साधयतीति साधकः । किंविशिष्टः स्वयुक् स्वस्मिन्नात्मानि युक् समाधिर्यस्यासौ निष्पन्नदेशसंयम आत्मध्यानतत्पर इति भद्रम् ॥

अर्थ—पाक्षिक, नैष्ठिक व साधक असे श्रावकाचे तीन भेद आहेत. सम्यग्दर्शनपूर्वक एकदेश ह्मणजे थोडें थोडें चारित्र पाळण्याची प्रतिज्ञा करून त्याप्रमाणें वागणारा जो श्रावक तो पाक्षिक ह्मणावा. अतिचारांनीं रहित श्रावकाचीं सगळीं व्रतें पाळणारा जो श्रावक तो नैष्ठिक होय. आणि समाधिमरण साधणारा जो श्रावक; तो साधक समजावा. तात्पर्यः— श्रावकाच्या ज्या अकरा प्रतिमा आहेत, त्यांपैकीं आरंभापासून निदान एक किंवा एकापेक्षां कांहीं अधिक प्रतिमांच्या नियमाप्रमाणें वागणारा जो, तो पाक्षिक. सगळ्या प्रतिमांच्या नियमानें वागणारा तो नैष्ठिक, आणि सकलसंन्यासानें मरण साधणारा जो श्रावक तो साधक होय. ॥ इति भद्रम् ॥

इत्याशाधरविरचितायां स्वोपज्ञधर्मामृतसागारधर्मदीपिकायां
भव्यकुमुदचंद्रिकासञ्ज्ञायामादितो दशमः
प्रक्रमाच्च प्रथमोऽध्यायः ॥

अध्याय पहिला समाप्त.

## ॥ अथ द्वितीयोऽध्यायः ॥

एवं सागारधर्मं सूचयित्वा पाक्षिकाचारं प्रपञ्चयितुकामः प्रथमं तावद्यादृशस्य भव्यस्य सागारधर्माभ्युपगमो धर्माचार्यैरभ्यनुज्ञायते तादृशं तं दर्शयन्नाह—

**पहिल्या अध्यायांत सागारधर्माचें दिग्दर्शन करून; आतां पाक्षिक, नैष्ठिक आणि साधक या तीघांपैकीं प्रथमचा जो पाक्षिक श्रावक त्याचा आचार सविस्तर सांगण्याची इच्छा करून; प्रथम कोणत्या भव्य पुरुषानें गृहस्थधर्म स्वीकारण्यास आपली संमति आहे हें सांगतात.**

त्याज्यानजस्रं विषयान् पश्यतोऽपि जिनाज्ञया ॥
मोहात्त्यक्तुमशक्तस्य गृहिधर्मोऽनुमन्यते ॥ १ ॥

टीका— अनुमन्यते क्रियतामित्यनुज्ञायते धर्माचार्यैः । कोऽसौ गृहिधर्मः । कस्य अशक्तस्य असमर्थस्य । किं कर्तुं त्यक्तुं । कान् विषयान् इष्टकामिन्यादीन् । कस्मात् मोहात् प्रत्याख्यानावरणलक्षणचारित्रमोहोदयोद्रेकात् । किं कुर्वतोऽपि पश्यतोऽपि प्रतिपद्यमानस्य न पुनरनन्तानुबन्धिरागादिपरतंत्रवत्सेव्यतयाऽभ्युपगच्छत इत्यपिशब्दार्थः । कान् विषयान् किंविशिष्टान् त्याज्यान् असेव्यान् । कथमजस्रं शश्वत् । कया जिनाज्ञया वीतरागसर्वज्ञानुल्लंघ्यशासनेन सम्यग्दर्शनशुद्धस्य सत इत्यर्थः । इदमत्र तात्पर्यं एकदेशविरतिमहं करिष्यामीति प्रतिपद्यमानो गृही सूरिभिरोमित्यनुज्ञायते । एतेन स्थावरवधानुमतिदोषानुषंगोऽप्याचार्याणां परिहृतो भवति ॥

अर्थ— सर्वज्ञ वीतराग जो जिनेश्वर त्याची आज्ञा अशी आहे कीं, 'विषय हे सर्वकाळीं त्याज्य आहेत.' ही जिनाज्ञा जाणत असूनही अर्थात् जो सम्यग्दृष्टि असूनहि चारित्रमोह कर्माच्या उदयामुळें विषयाला टाकण्यास असमर्थ आहे, त्या श्रावकानें गृहस्थधर्म स्वीकारावा अशी आचार्यांची संमति आहे.

या ठिकाणीं असा एक प्रश्न उद्भवतो कीं— "गृहस्थ धर्मांत त्रसजीवांचा वध जरी होत नाहीं तरी स्थावर जीवांचा वध होणारच. तेंव्हा, आचार्यांनीं, गृहस्थधर्म स्वीकारण्याबद्दल जी संमति दिली ती युक्त नव्हे. कारण, स्थावरजीवांचा वध करण्यास अनुमति दिल्याचा दोष आचार्यांस लागू होतो. याचें समाधान असें आहे कीं,—

ज्या अर्थीं सर्वप्रकारची हिंसा करणारा जीव सम्यग्दृष्टि होऊन श्रावकधर्माचा स्वीकार करून केवळ अशक्तपणामुळें[1] योग्य तितकेच विषय सेवन करण्यास प्रवृत्त झाला, त्याअर्थीं तो पूर्वीपेक्षां पुष्कळ बरा; असें ह्मणण्यांत आचार्यांनीं स्थावर जीवांची हिंसा करण्यास आपली

---

१ विषयविषमाशनोत्थितमोहज्वरजनिततीव्रतृष्णस्य ॥
निःशक्तिकस्य भवतः प्रायः पेयाद्युपक्रमः श्रेयान् ॥ १ ॥

अर्थ— विषयरूपी विषम अन्नाच्या सेवनानें उत्पन्न झालेला जो मोहज्वर त्याच्या योगानें होणारी जी तीव्र तृष्णा ( विषय सेवनाची तीव्र तहान—आशा ) ती ज्याला झाल्यामुळें जो अशक्त झाला आहे अशा जीवानें प्रायः पेय ह्मणजे योग्य तितका विषय सेविल्यास फारसें बिघडणार नाहीं.

संमति दिली असें सिद्ध होत नाहीं. तेंव्हा, वर जो "आचार्यांची संमति आहे" असा अर्थ आह्मीं लिहिला आहे, त्याचें तात्पर्य येवढेंच कीं,- सर्वप्रकारची हिंसा करणाऱ्यापेक्षां, जिनाच्या वचनावर श्रद्धा ठेवून अर्थात् सम्यग्दृष्टि होऊन अशक्तपणामुळेंच आणि तेंहि फक्त स्थावर जीवांचीच हिंसा करणारा भव्यजीव आह्मांस चांगला वाटतो. असा भावार्थ आहे.

अधुना पाक्षिकं दर्शनविशुद्धिमध्यासीनमहिंसासिद्ध्यर्थं मद्यादिविरतौ नियुंक्ते—

आतां, सम्यग्दर्शनानें शुद्ध अशा पाक्षिक श्रावकास मद्य वगैरेचा त्याग करण्याकरितां सांगतात. अथवा, श्रावकाचे आठ मूलगुण सांगतात.

तत्रादौ श्रद्दधज्जैनीमाज्ञां हिंसामपासितुम् ।
मद्यमांसमधून्युज्झेत्पञ्चक्षीरिफलानि च ॥ २ ॥

टीका—उज्झेत् त्यजेत् । कोऽसौ देशसंयमोन्मुखो गृही । कानि मद्यमांसमधूनि । न केवलमेतानि पञ्चक्षीरिफलानि च क्षीरिणां पिप्पलादीनां पञ्चानां फलानि । च-शब्दान्नवनीतरात्रिभुक्त्यगालितपानीयादिकमप्युत्सृजेदित्यनुक्तं समुच्चितं व्रतयाति । किं कर्तुं अपासितुं त्यक्तुं । कां हिंसां भावतो मद्यादिविषयरागरूपां

---

१ सर्वविनाशी जीवस्त्रसहननं त्याज्यते यतो जैनैः ॥
स्थावरहननानुमतिस्ततः कृता तैः कथं भवति ॥ २ ॥

अर्थ— सर्वप्रकारची हिंसा करणारा जीव जर आचार्यांनीं त्रसजीवांच्या वधापासून सोडविला, तर त्यांनीं स्थावर जीवांची हिंसा करण्यास आपली संमति दिली असें कांहीं होणार नाहीं.

द्रव्यतश्च तद्गतप्राणिप्राणव्यपरोपणलक्षणाम् । किं कुर्वन् श्रद्दधत् । कां आज्ञां । किंविशिष्टां जैनीं जिनागममित्यर्थः । क आदौ प्रथमतः । क तत्र गृहिधर्मे । एतेनेदमुक्तं भवति तादृग्जिनाज्ञाश्रद्धानेनैव मद्यादिविरतिं कुर्वन् देशव्रती स्यात् न कुलधर्मादिबुध्द्या ॥

अर्थ— गृहस्थ धर्मात प्रथम जिनाच्या आज्ञेवर श्रद्धा ठेवून श्रावकानें हिंसेचा त्याग करण्याकरितां मद्य, मांस, मधु आणि पिप्पल वगैरे पांच प्रकारच्या क्षीरवृक्षांचीं फळें ( ज्या वृक्षापासून दूध-चीक निघतें त्या वृक्षास क्षीरवृक्ष ( उदुंबर ) ह्मणतात. ) ह्यांचा त्याग करावा. याप्रमाणें आठ प्रकारच्या वस्तूंचा त्याग करणें यालाच आठ मूलगुण पाळणें ह्मणतात. श्लोकांत शेवटीं 'च' हें पद आहे त्यावरून असा अर्थ घ्यावयाचा कीं, श्रावकानें नवनीत ( लोणी ) रात्रिभोजन, अगालित जल हीं सुद्धां सोडिलीं पाहिजेत 'आपण ज्या कुलांत जन्मलों त्याप्रमाणें आपला आचार असावा' अशा बुद्धीनें न पाळितां 'जिनाची आज्ञा आपण पाळणें हें आपलें कर्त्तव्य आहे' असें समजून वरील आचार सम्यग्दृष्टि श्रावकानें पाळिला पाहिजे.

---

१ मांसाशिषु दया नास्ति न सत्यं मद्यपायिषु ॥
आनृशंस्यं न मर्त्येषु मधूदुम्बरसेविषु ॥ १ ॥

अर्थः—मांस खाणारास दया नसते, मद्यपान करणारे सत्य भाषण करीत नाहींत आणि मधु व उदुंबर खाणारे लोक घातक व क्रूर असतात.

अथ स्वमतपरमताभ्यां मूलगुणान् विभजते—

आतां, आपल्या व इतर आचार्यांच्या मतानें मूलगुणांचा भेद दाखवितात.

अष्टैतान् गृहिणां मूलगुणान् स्थूलवधादि वा ।
फलस्थाने स्मरेत् द्यूतं मधुस्थान इहैव वा ॥ ३ ॥

टीका— स्मरेत् स्मृतिविषयीकुर्यात् । कोऽसौ मूलगुणस्थापनोद्यतः सूरिः । कान् मूलगुणान् । केषां गृहिणां । किंविशिष्टान् एतान् उपासकाध्ययनादिशास्त्रानुसारिभिः पूर्वमनुष्ठेयतयोपदिष्टान् कति अष्ट मद्यमांसमधुपञ्चोदुम्बरफलविरतिरूपान् । वा-शब्दः पक्षान्तरसूचने । स्वामिसमंतभद्रमते पुनः । सूरिः स्मरेत् । किं तत् स्थूलवधादि स्थूलहिंसानृतस्तेयमैथुनग्रन्थपञ्चकम् । क्व फलस्थाने पञ्चोदुम्बरफलप्रसङ्गे तन्निवृत्तौ वा मद्यमांसमधुविरतित्रयपञ्चाणुव्रतानि चाष्टौ मूलगुणान् स्मरेदित्यर्थः । पुनर्वाशब्दः पक्षान्तरसूचने । महापुराणमते तु स्मरेत् । किं तत् द्यूतं । क्व मधुस्थाने । कस्मिन् इहैव अस्मिन्नेव स्वाम्युक्ताष्टमूलगुणपक्षे मद्यमांसद्यूतविरतित्रयं पंचाणुव्रतानि चाष्टौ मूलगुणान् स्मरेदित्यर्थः । सर्वत्र यमनियमादौ मुक्त्यंगे स्मरणपरेण स्मरेदित्यनेन च भवितव्यमिति लक्षयति ॥

अर्थः—उपासकाध्ययन वगैरे शास्त्रांस अनुसरून आम्हीं दुसऱ्या श्लोकांत जे श्रावकाचे आठ मूलगुण सांगितले आहेत त्यांत व इतर आचार्यांच्या मतांत भेद असा कीं,— आम्हीं जीं पांच प्रकारच्या उदुंबर वृक्षांचीं फळें त्याग करण्यास सांगितलीं आहेत; त्यांच्या ऐवजीं श्रीसमंतभद्र आचार्यांनीं हिंसा, लबाडी, चोरी, परस्त्री व परिग्रह हीं

पांच पातकें स्थूलपणें सोडावीं असें सांगितलें आहे. आणि श्रीसमंतभद्रांनीं जे आठ मूलगुण सांगितले आहेत त्यांपैकीं मधुत्यागाच्या ऐवजीं जिनसेन[1] आचार्यांनीं द्यूत ( जुगार ) त्याग लिहिला आहे असें समजावें.

सम्प्रति मद्यस्य जन्तुभूयिष्ठतानुवादपुरस्सरमुपयोक्तॄणामुभय-लोकबाधकत्वमुपदर्शयन्नवश्यत्याज्यतामभिधत्ते—

---

मद्यमांसमधुत्यागाः सहोदुम्बरपञ्चकैः ॥
अष्टावेते गृहस्थानामुक्ता मूलगुणाः श्रुते ॥ २ ॥

सोमदेवाचार्य.

अर्थः—पांच प्रकारचीं उदुंबराचीं फळें, मद्य, मांस आणि मधु यांचा त्याग करणें हे श्रावकांचे आठ मूलगुण होत. असें शास्त्रांत सांगितलें आहे.

मद्यमांसमधुत्यागैः सहाणुव्रतपञ्चकम् ॥
अष्टौ मूलगुणानाहुर्गृहिणां श्रमणोत्तमाः ॥ ३ ॥

समन्तभद्र आचार्य.

अर्थः—मद्य, मांस आणि मधु या तिन्हींचा त्याग करून पांच अणुव्रतें पाळणें याला गृहस्थाचे आठ मूळगुण ह्मणतात. असें दिगंबर मुनींनीं सांगितलें आहे.

१ हिंसासत्यस्तेयादब्रह्मपरिग्रहाच्च बादरभेदात् ॥
द्यूतान्मांसान्मद्याद्विरतिर्गृहिणोऽष्ट सन्त्यमी मूलगुणाः ॥ ४ ॥

जिनसेनाचार्य.

अर्थः—हिंसा, लबाडी, चोरी, अब्रह्म आणि परिग्रह या पांच पातकांचा स्थूलपणें त्याग करून; जुगार मांस व मद्य हीं सोडणें हे गृहस्थाचे आठ मूलगुण होत.

आतां, मद्यांत जंतु पुष्कळ असतात आणि त्याच्या सेवनानें इहपरलोकीं अत्यंत दुःख होतें ह्मणून मद्यपान न करण्याचा उपदेश करितात.

यदेकबिन्दोः प्रचरन्ति जीवा- ।
श्चेत्तत् त्रिलोकीमपि पूरयन्ति ॥
यद्विक्लवाश्चेममनुं च लोकं ।
यस्यन्ति तत् कश्यमवश्यमस्येत् ॥ ४ ॥

**टीका**— अस्येत् त्यजेत् । कोऽसौ स्वहितैषी । किं तत् तत्कश्यं मद्यं । कथं अवश्यं नियमेन मद्यविरतिव्रतं स्वीकुर्यादित्यर्थः । यतः पूरयन्ति तरन्ति । के ते जीवाः । कां त्रिलोकीमपि समस्तविष्टपमपि । कथं तत् ततः । चेद्यदि । प्रचरन्ति संचरन्ति । के जीवाः । कस्मात् यदेकबिन्दोः यस्य मद्यस्यैकस्माद् बिन्दोः पृषतः सकाशात् । तज्जाः प्राणिनो यदि विचरेयुरित्यर्थः । यतश्च यस्यन्ति भ्रंशयन्ति श्रेयोरहितं कुर्वन्तीत्यर्थः । के ते यद्विक्लवाः येन मद्येन मोहितमतयः । कं लोकं । किंविशिष्टमिमं । न केवलममुं च तद्भवमुत्तरभवं च दुःखमयं कुर्वन्तीत्यर्थः ॥

**अर्थ**— ज्याच्या एका बिंदूपासून निघालेले जीव जर पसरूं लागले तर ते तीन्ही जगांसहि भरून टाकितील, आणि ज्याचें पान करून मोहित झालेले लोक इह-

---

१ मनोमोहस्य हेतुत्वान्निदानत्वाच्च दुर्गतेः ॥
मद्यं सद्भिः सदा त्याज्यमिहामुत्र च दोषकृत् ॥ १ ॥

अर्थः—मद्य हें मनाला मोह करणारें व दुर्गतीस नेणारें व

लोकींच्या व परलोकींच्याहि सुखास अंतरतात, असें जें मद्य तें अवश्य सोडून द्यावें. ह्मणजे मद्यपान न करण्याचें व्रत स्वीकारावें.

इदानीं मद्यपानस्य द्रव्यभावहिंसानिदानत्वमनूद्य तन्निवृत्तिप्रवृत्तिशीलानां गुणदोषौ दृष्टान्तद्वारेण स्पष्टयन्नाह—

आतां, मद्यपानानें द्रव्यहिंसा व भावहिंसा घडते हें सांगून त्याच्या निवृत्तींत गुणदोष कोणते आहेत हें दृष्टांतद्वारा सांगतात.

पीते यत्र रसाङ्गजीवनिवहाः क्षिप्रं म्रियन्तेऽखिलाः
कामक्रोधभयभ्रमप्रभृतयः सावद्यमुद्यन्ति च ॥
तन्मद्यं व्रतयन्न धूर्तिलपरास्कन्दीव यात्यापदम् ।
तत्पायी पुनरेकपादिव दुराचारं चरन्मज्जति ॥ ५ ॥

टीका— न याति न प्राप्नोति । कोऽसौ पुरुषः । कां आपदं विपदं । किं कुर्वन् व्रतयन् व्रतं कुर्वन् अमद्यपकुलजातोऽपि देवादिसाक्षिकं निवर्तयन्नित्यर्थः । किं तत् तत्प्रागुक्तविनिपातप्रायं मद्यम् । क इव धूर्तिलपरास्कन्दीव धूर्तिलनामा चोरो यथा ।

---

इहपरलोकीं दुःख देणारें असें आहे. ह्मणून सत्पुरुषांनीं याचा सर्वदा त्याग करावा.

विवेकः संयमो ज्ञानं सत्यं शौचं दया क्षमा ॥
मद्यात्प्रवीयते सर्वं तृण्या वन्हिकणादिव ॥ २ ॥

अर्थः—अग्नीच्या एकाच कणापासून सुद्धां गवताची गंजी जशी जळून जाते, त्याप्रमाणें मद्यपानानें विचार, संयम, ज्ञान, सत्य, पवित्रता, दया व क्षमा हे सगळे गुण तत्काळ नाहींसे होतात.

तत्स्थायी पुनर्मद्यपानशीलो मज्जति दुर्गतिदुःखे व्रजति । किं कुर्वन् चरन् अनुतिष्ठन् । कं दुराचारं अगम्यगमनाभक्ष्यभक्षणापेयपानादिकं । क इव एकपादिव एकपान्नामपरिव्राजको यथा । यत्र किं? यस्मिन्मद्ये पीते सति । म्रियन्ते विपद्यन्ते । के ते? रसांगजीवनिवहाः रसोऽगकारणं येषां ते रसांगाः रसजा इत्यर्थः । तथा रसस्यांगानि कारणानि रसांगानि मद्ये रसजनका इत्यर्थः । रसांगाश्च ते जीवाश्च रसांगजीवास्तेषां निवहाः संघाताः । किंविशिष्टाः अखिलाः समस्ताः । कथं क्षिप्रं पानानन्तरमेव । तथा उद्यन्ति उत्पद्यन्ते । के ते कामादयः । क सति यत्र पीते सति । कथं सावद्यं पापेन निन्दया वा सह । कामो योन्यादौ रिरंसा । भ्रमो मिथ्याज्ञानं चक्रारूढस्येव शरीरभ्रमणं । कामश्च क्रोधश्च भयं च भ्रमश्च कामक्रोधभयभ्रमाः ते प्रभृतयः प्रमुखा येषामभिमानहास्यारतिशोकादीनां ते ॥

अर्थः– ज्याचें पान केल्याबरोबर त्यांत ( मद्यांत ) रस उत्पन्न होण्यास कारण असे, अथवा रसापासून उत्पन्न होणारे–जे जीव असतात ते सगळे तत्काळ मरून जातात, ( अर्थात् द्रव्यहिंसा घडते. ) आणि काम, क्रोध, भ्रम

---

१ रसजानां च बहूनां जीवानां योनिरिष्यते मद्यम् ॥
मद्यं भजतां तेषां हिंसा सञ्जायतेऽवश्यम् ॥ १ ॥

अर्थः—मद्य हें रसापासून उत्पन्न होणाऱ्या पुष्कळ जीवांचें उत्पत्तिस्थान आहे. ह्मणून तें सेविणाऱ्यांस हिंसा नियमानें घडते.

समुत्पद्य विपद्येह देहिनोऽनेकशः किल ॥
मद्ये भवन्ति कालेन मनोमोहाय देहिनाम् ॥ २ ॥

अर्थः—मद्यांत अनेक जीव उत्पन्न होतात व ते मरतहि असतात. आणि तें पान करणाऱ्याला मोह करणारें आहे.

( मिथ्याज्ञान-मोह ) वगैरे निंद्य पातकें घडतात, ( अर्थात् भावहिंसा घडते ह्मणजे आत्म्याचे परिणाम हिंसारूप होतात. ) असें जें मद्य तें न पिण्याचें व्रत करून मूर्त्तिल नांवाचा चोर, तो विपत्तीस पावला नाहीं. ( मूर्तिळ हा चोर होता तरी मद्यापानव्रत त्यानें घेतलेलें असल्यामुळें तो दुर्गतीस गेला नाहीं. ) जो मद्यपान करणार नाहीं तो मूर्त्तिळ चोराप्रमाणें सुखी होईल. आणि एकपाद नांवाचा एक मिथ्यातपस्वी होता, तो मद्यपान करून व त्यामुळें अविवेकी होऊन अगम्यगमन, अभक्ष्यभक्षण वगैरे दुराचार करून जसा नरकास गेला; तसा मद्यप मनुष्य नरकास जातो.

---

१ अभिमानभयजुगुप्साहास्या रतिकामशोककोपाद्याः ॥
हिंसायाः पर्यायाः सर्वेऽपि च नरकसंनिहिताः ॥ १ ॥

अर्थः—गर्व, भीति, निंदा, हास्य ( थट्टा ), रति, विषयवासना, शोक व क्रोध हे सगळे हिंसेचे पर्याय असून ह्यांच्यापासून नरक फारच जवळ आहे.

न विना प्राणिविघातान्मांसस्योत्पत्तिरिष्यते यस्मात् ॥
मांसं भजतस्तस्मात् प्रसरत्यनिवारिता हिंसा ॥ २ ॥

अर्थः—प्राण्यांचा वध केल्यावाचून मांस मिळत नाहीं. तेव्हां तें खाणाऱ्यास हिंसेचें पातक लागणारच.

ये भक्षयन्त्यन्यपलं स्वकीयपलपुष्टये ॥
त एव घातका यन्न वद को भक्षकं विना ॥ ३ ॥

अर्थः—जे लोक स्वतांचें मांस पुष्ट होण्याकरितां अन्य

अथाचारविशुद्धिगर्वितानां पिशिताशनं गर्ह्यमाणः प्राह—

आतां, मांस भक्षण करूनहि स्वतां आचारानें शुद्ध आहों असा गर्व वाहणारांस उद्देशून ह्मणतात.—

स्थानेऽश्नन्तु पलं हेतोः स्वतश्चाशुचिकश्मलाः ॥

श्वादिलालावदप्यद्युः शुचिम्मन्याः कथं नु तत् ६

टीका— अश्नन्तु भक्षयन्तु। के ते कश्मलाः जातिकुलाचारमलिनाः। किं तत् पलं मांसं। किंविशिष्टं अशुचि। कस्मात् हेतोः शुक्रशोणितलक्षणात् कारणात्। न केवलं हेतोः स्वतश्च स्वभावेन अमेध्यबीजममेध्यस्वभावं चेत्यर्थः। कथं स्थाने युक्तं कश्मलानां तथाप्रवृत्त्युपपत्तेः। नु अहो। कथमद्युः कथं खादेयुः गर्हामहे। अन्याय्य(अनार्य)मेतत्। गर्हे सप्तम्या विधानात्। के ते शुचिम्मन्याः आचारविशुद्धमात्मानं मन्यमानाः। किं तत् पलं। किंविशिष्टं श्वादिलालावदपि श्वादीनां कुकुरचित्रकश्येनादीनां लाला मुखस्रावः श्वादिलाला सा अस्मिन्नस्तीति श्वादिलालावत्। अथवा श्वादिलालया तुल्यं श्वादिलालावत् कुकुरादिलालायुक्तं तत्तुल्यं वा। अपि विस्मये ॥

अर्थः— जाति व कुलाचारानें मलिन असे जे लोक आहेत ते शुक्र, शोणित वगैरे कारणामुळें व स्वभावानेंहि

---

प्राण्याचें मांस भक्षण खातात तेच लोक घातक होत. भक्षकाशिवाय दुसऱ्या कोणास घातक ह्मणावें?

मांसास्वादनलुब्धस्य देहिनो देहिनं प्रति ॥

हन्तुं प्रवर्त्तते बुद्धिः शाकिन्य इव दुर्धियः ॥ ४ ॥

अर्थ— मांस खाण्यास लुब्ध झालेल्या माणसाची बुद्धि दुष्ट अशा शाकिनीप्रमाणें इतर जीवाला मारण्यास प्रवृत्त होते.

अशुचि असें मांस भक्षण करितात तें ठीक आहे. पण, स्वतांस शुद्ध ह्मणविणारे लोक श्वान वगैरे नीच प्राण्यांच्या लाळेच्या मळानें युक्त असें जें मांस तें कसें भक्षण करितात? त्यांचा आह्मी धिक्कार करितों.

साम्प्रतं स्वयमेव पञ्चत्वं प्राप्तस्य पञ्चेन्द्रियस्य मत्स्यादेर्भक्षण-मदूषणमुत्प्रेक्षमाणान् प्रत्याह—

आतां, आपोआप मरून पडलेल्या प्राण्यांचें मांस खाण्यांत दोष नाहीं असें ह्मणणाऱ्या मांसभक्षकांस उद्देशून ह्मणतात.

हिंस्रः स्वयम्मृतस्यापि स्यादश्नन् वा स्पृशन्पलम्॥
पक्वापक्वा हि तत्पेश्यो निगोदौघसुतः सदा ७

टीका— स्यात् भवेत्। कोऽसौ पुमान्। किंविशिष्टः हिंस्रः द्रव्यहिंसाशीलः। भावहिंसायास्तु मांसभक्षणे दर्पकरतरत्वेन वक्ष्यमाणत्वात्। किं कुर्वन् अश्नन् खादन्। स्पृशन् वा हस्तादिना संयोजयन्। किं तत् पलं मांसं। कस्य स्वयम्मृतस्यापि भोक्तुः प्रयत्नमन्तरेणापि त्यक्तप्राणस्य मत्स्यमहिषादेः किं पुनरात्मना वधितस्येत्यपिशब्दार्थः। कुत इत्याह– हि यस्मात्। भवन्ति।

---

१ भक्षयन्ति पलमस्तचेतनाः। सप्तधातुमयदेहसंभवम्॥
यद्वदन्ति च शुचित्वमात्मनः। किं विडम्बनमतःपरं बुधाः॥१॥

अर्थः—रस, रक्त वगैरे सात प्रकारच्या धातूंनी भरलेल्या देहापासून काढलेलें मांस मूर्ख मनुष्य भक्षण करितात. तें ठीक आहे. पण आपण शुद्ध आहों असा अभिमान बाळगणारे कित्येक पंडित मांसभक्षण करितात त्यांना काय ह्मणावें !

कास्तत्पेश्यः तस्य पलस्य पेश्यः कोशाः । किंविशिष्टाः निगोदौघसुतः निगोदानां साधारणांगजीवानामेकशरीरभोक्तॄणामनन्तप्राणिनामोघाः सङ्घातास्तान् सुवन्ति जनयन्तीति निगोदौघसुतः । किं कदाचिन्नेत्याह सदा सर्वदा । किंविशिष्टाः सत्यः पक्वापक्वाः पक्वाश्चापक्वाश्चेति विगृह्यैकशेषेण पक्वापक्वा इत्यस्य लोपस्तेन पक्वाः आमाः पच्यमानाश्चेत्यर्थः ॥

अर्थः—आपोआप मरून पडलेल्या मत्स्य, महिष वगैरे प्राण्यांचें मांस खाणारा किंवा स्पर्शहि करणारा जीव हिंस्र ह्मणजे हिंसक[१] होय. कारण, मांसाच्या ज्या पक्व[२] अपक्व व

---

१ यतो मांसाशिनः पुंसो दमो दानं दयार्द्रता ॥
सत्यशौचव्रताचारा न स्युर्विद्यादयोऽपि च ॥ १ ॥

अर्थः—इंद्रियदमन, दान, दया, सत्य, पवित्रता, व्रताचार व बऱ्यावाईटपणाचा विचार हे सगळे सद्गुण मांस खाणाऱ्यांस नसतात.

२ आमां वा पक्वां वा खादति वा स्पृशति वा पिशितपेशीम् ॥
स निहन्ति सततनिचितं पिण्डं बहुजीवकोटीनाम् ॥ २ ॥

अर्थः—अपक्व असो कीं पक्व असो; पण, त्या मांसाच्या पेशीला ( गोळा ) जो शिवतो किंवा खातो, तो, एकसारखें चिकटून असलेल्या कोट्यावधी जीवांच्या पिंडाची हिंसा करितो, असें समजावें.

आमास्वपि पक्वास्वपि विपच्यमानासु मांसपेशीषु ॥
सातत्येनोत्पादस्तज्जातीनां निगोतानाम् ॥ ३ ॥

अर्थः—मांसाच्या गांठी हिरव्या असोत, कुजलेल्य

पच्यमान अशा गांठी असतात त्यांतहि अनंत निगोत जीव सर्वदा असतात. एकाच शरीराचा उपभोग घेणारे जे अनंत जीव त्यांना निगोत ह्मणतात. तात्पर्यः—मांस हें कोणत्याहि अवस्थेंत असो ह्मणजे तें हिरवें असो, कुजलेलें असो अथवा कुजत असलेलें असो तरी त्यांत निगोत जीव अनंत असतात.

अथ मांसस्य प्राणिहिंसातिरेकप्रभवत्वेनेन्द्रियदर्पकरतरत्वेन च भावहिंसाहेतुत्वानुवादपुरस्सरं तद्भक्षणं नरकादिगतिविवर्तननिमित्तत्वेनोपदिशन्नाह—

आतां मांसभक्षण हें अनंत जीवांची हिंसा ( द्रव्यहिंसा ), इंद्रियांचा दर्प ( भावहिंसा ) व नरकगति इत्यादिकांला कारण असल्यामुळें; त्याचा त्याग करण्याविषयीं उपदेश करितात.

प्राणिहिंसार्पितं दर्पमर्पयत्तरसं तराम् ॥
रसयित्वा नृशंसः स्वं विवर्तयति संसृतौ ॥ ८ ॥

टीका— विवर्तयति द्रव्यक्षेत्रकालभावैः परिवर्तयति । कोऽसौ नृशंसः क्रूरकर्मकृत् । कं स्वं आत्मानं । क्व संसृतौ संसारे । किं कृत्वा रसयित्वा आस्वाद्य । किं तत् तरसं मांसं । किंविशिष्टं प्राणिहिंसार्पितं पञ्चेन्द्रियजीववधसम्पादितं । किं कुर्वत् अर्पयत् सम्पादयत् । कं दर्पं मदावेशं । कथं तरां अतिशायनेऽव्ययमिदम् । मृष्टान्नादिभ्योऽतिशयेन । प्राणिवधादुत्पन्नं तद्वद्दर्पकरं चेत्यर्थः ॥

---

असोत किंवा कुजत असलेल्या असोत; तरी, त्यांत त्या जातीचे निगोत जीव सतत उत्पन्न होत असतात.

अर्थः—प्राण्यांची हिंसा करून मिळविलेलें अर्थात् जें संपादन करण्यांत द्रव्यहिंसा घडते, आणि अत्यंत मद उत्पन्न करणारें अर्थात् ज्याच्या सेवनानें भावहिंसा घडते असें जें मांस, तें भक्षण करणारा क्रूर प्राणी स्वतांला दुःखमय संसारांत अनंतकाल फिरवितो.

इदानीं साङ्कल्पिकस्यापि पलभक्षणस्य दोषं तद्विरतिनिष्ठायाश्च गुणमुदाहरणद्वारेण दर्शयति—

आतां मांसभक्षणाची इच्छा करण्यांत दोष व तें सोडण्यांत गुण काय हें उदाहरणानें सांगतात.

भ्रमति पिशिताशनाभिध्यानादपि सौरसेनवत्कुगतीः
तद्विरतिरतः सुगतिं श्रयति नरश्चण्डवत्खदिरवद्वा ९

टीका— भ्रमति परापरविवर्ते परिवर्तयति । कोऽसौ जीवः। काः कुगतीः नरकादिभवग्रहणानि । कस्मात् पिशिताशनाभिध्यानादपि मांसभक्षणसङ्कल्पात् किं पुनस्तद्भक्षणादित्यपिशब्दार्थः । किंवत् सौरसेनवत् सौरसेनराज्ञा तुल्यं । तथा श्रयति लभते । कोऽसौ नरः कां सुगतिं स्वर्गादिगतिं । किंविशिष्टः सन् तद्विरतिरतः पिशितनिवृत्तावासक्तः । किंवत् चण्डवत् चण्डनामोज्जयिन्यां मातङ्गो यथा । अथवा खदिरवत् खदिरसारो नाम भिल्लराजो यथा ॥

अर्थः—मांस भक्षण करण्याचें तर दूरच असो, पण त्याची इच्छा करणाराहि सौरसेन राजाप्रमाणें नरक वगैरे अनेक दुर्गतींत चिरकाल हिंडतो. मांसभक्षण करण्याचें ज्यानें सोडिलें आहे असा प्राणी,—पूर्वी उज्जयिनी नगरींत होऊन गेलेल्या चंड नांवाच्या मातंगाप्रमाणें; अथवा,

खदिरसार नांवाच्या भिल्लांच्या राजाप्रमाणें—सद्गतीस पावतो.

अधुना मांसं सतां भक्षणीयं प्राण्यङ्गत्वान्मुद्गादिवदित्यनुमानाभिधानग्रहावेशान्मांसभक्षणदाक्षिणान् प्रत्याह—

आतां " उडीद, गहूं वगैरे जे मनुष्यांनीं खाण्याचे पदार्थ आहेत ते एकेंद्रिय जीवांचे अवयव ( अंग ) आहेत असें असून ते भक्षण्यांत जर दोष नाहीं तर मांसभक्षण करण्यांतहि दोष नाहीं. कारण, मांसहि प्रण्यांचेंच अंग आहे. " असें अनुमान करून तें भक्षण करण्यांत दोष नाहीं असें प्रतिपादन करणाऱ्यांस उद्देशून ह्मणतात.

प्राण्यङ्गत्वे समेऽप्यन्नं भोज्यं मांसं न धार्मिकैः ॥
भोग्या स्त्रीत्वाविशेषेऽपि जनैर्जायैव नाम्बिका १०

टीका— भोज्यं भोक्तव्यं । किं तत् अन्नं मुद्गादिधान्यं रसरक्तविकारजत्वाभावात् । न तु भोज्यं किं तत् मांसं रसरक्तविकारजत्वात् । कैः धार्मिकैः धर्ममहिंसारूपं चरद्भिः । क्व सति प्राण्यङ्गत्वे जीवकायत्वे । किंविशिष्टे समेऽपि अन्नमांसयोस्तुल्येऽपि

---

१ मांसं जीवशरीरं जीवशरीरं भवेन्न वा मांसम् ॥
यद्वन्निम्बो वृक्षो वृक्षस्तु भवेन्न वा निम्बः ॥ १ ॥

अर्थः—मांस हें प्राण्यांचें शरीर आहे. पण, प्राण्यांच्या शरीरास मांस ह्मणतां येणार नाहीं. कारण; उडीद, गहूं वगैरे धान्यें एकेंद्रिय जीव आहेत. पण, त्यांत रक्त, मज्जा वगैरे नसल्यामुळें त्या एकेंद्रिय जीवाच्या शरीराला मांस ह्मणतां येणार नाहीं. याला उदाहरणः—निंब हा वृक्ष आहे ह्मणून वृक्षास निंब ह्मणतां येणार नाहीं. कारण, वृक्ष शद्बाची व्याप्ति संगळ्या वृक्षांवर आहे.

न च प्राणिकायत्वाद्धान्यस्यापि मांसत्वमुपकल्प्यं यो यः प्राणिकायः स स मांसमिति व्याप्तेरभावात् । अन्यथा वृक्षत्वादशोकादीनामपि निम्बत्वकल्पनाप्रसङ्गात् । यतः भोग्या अनुभवनीया । काऽसौ जायैव । न पुनरम्बिका माता भोग्या । कैर्जनैः लोकैः । क्व सति स्त्रीत्वाविशेषेऽपि भार्यामात्रोः स्त्रीत्वे तुल्येऽपि ॥

**अर्थः—मांस हें प्राण्यांचें अंग आहे आणि अन्नहि प्राण्यांचें अंग आहे. असें जरी दोहोंत साम्य आहे, तरी मांस हें रस व रक्त यांच्या विकारापासून उत्पन्न होतें,**

---

जर वृक्षास निंब म्हणाल तर अशोक वगैरे वृक्षांसहि निंबच ह्मणावें लागेल. यावरून, अन्न हें जीवशरीर आहे तरी मांसाप्रमाणें त्यांत दोष नाहींत. आणखी असें पहा कीं; शंख, रेशीम, चामर वगैरे पदार्थ हीं प्राण्यांचीं शरीरें असूनहि त्यांस व्यवहारांत पवित्र मानिलें आहे. पण, त्यांच्याप्रमाणें अस्थि ( हाड ) नख वगैरे पदार्थांस मानिलें नाहीं. याप्रमाणें, भात, पोळी वगैरे पदार्थच सेवन करण्यास योग्य आहेत आणि मांस हें अभक्ष्य आहे. कारण, मांस खाण्यानें द्रव्यहिंसा व भावहिंसा अधिक घडते.

शुद्धं दुग्धं न गोमांसं वस्तुवैचित्र्यमीदृशं ॥
विषघ्नं रत्नमाहेयं विषं च विपदे यतः ॥ २ ॥

अर्थः—एकाच ठिकाणीं उत्पन्न झालेल्या दोन वस्तूंत किती तरी अंतर आहे पहा ! गाईचें दूध शुद्ध आहे तरी तिच्या मांसास शुद्ध ह्मणतां येणार नाहीं. उदाहरण,—रत्न आणि विष हीं दोन्हीं सर्पाच्या ठिकाणीं असतात, तरी दोहोंत अंतर मोठें आहे. रत्न हें विषाचा नाश करणारें आहे व विष हें प्राणनाश करणारें आहे. अथवा,—

म्हणून त्यांत दोष आहे. याकरितां अहिंसा धर्म पाळणाऱ्यांनीं मांसभक्षण करूं नये. आणि धान्य हें एकेंद्रिय

हेयं पलं पयः पेयं समे सत्यपि कारणे ॥
विषद्रोरायुषे पत्रं मूलं तु मृतये मतम् ॥ ३ ॥

अर्थः—गाईच्या ठिकाणीं मांस आणि दूध हीं उत्पन्न होण्यास कारण एकच ( तृण, धान्य, जल वगैरे ) आहे. तरी, मांस हें त्याज्य आणि दूध हें पिण्यास योग्य आहे. याला उदाहरण–विषवृक्षाचें पान आयुष्य वाढविण्याला कारण आहे, आणि त्याचें मूळ असतें तें मरणाला कारण आहे.

पञ्चेन्द्रियस्य कस्यापि बधे तन्मांसभक्षणे ॥
यथा हि नरकप्राप्तिर्न तथा धान्यभोजनात् ॥ ४ ॥

अर्थः—कोणत्याहि पंचेंद्रिय प्राण्यांच्या वधानें व त्याच्या मांसाच्या भक्षणानें जशी नरकगति प्राप्त होते; तशी दुर्गति धान्य खाण्यानें होत नाहीं.

धान्यपाके प्राणिवधः परमेकोऽवशिष्यते ॥
गृहिणां देशयमिनां स तु नात्यन्तबाधकः ॥ ५॥

अर्थः—धान्याचें अन्न तयार करण्यांतहि एकेंद्रिय जीवांचा बध होतो. तरी पण, एकदेश संयम पाळणाऱ्या गृहस्थांस तो फारसा बाधक होत नाहीं.

मांसखादकगतिं विमृशन्तः । सस्यभोजनरता इह सन्तः ॥
प्राप्नुवन्ति सुरसम्पदमुच्चै- । जैंनशासनजुषो गृहिणोऽपि ॥६॥

अर्थः—मांस खाणाऱ्यांच्या भयंकर परिणामाचा विचार करून अर्थात् त्याचा त्याग करून; धान्य खाणारे जैनधर्माविषयीं श्रद्धाळू व सज्जन गृहस्थहि देवलोकींच्या संपत्तीस प्राप्त होतात.

जीवांचें जरी अंग आहे तरी तें रसरक्तांपासून उत्पन्न होणारें नव्हे, ह्मणून त्यांत दोष नाहीं. जसें—माता आणि जाया ( बायको ) या दोघींच्या ठिकाणीं स्त्रीत्व जरी सारखेंच आहे, तरी पुरुषानें पत्नीचाच उपभोग करणें योग्य आहे. मातेचा उपभोग करणें योग्य नाहीं.

अथ क्रमप्राप्तान्मधुदोषानाह—

आतां, मधुभक्षणाचे दोष सांगतात.

मधुकृद्व्रातघातोत्थं मध्वशुच्यपि बिन्दुशः ॥
खादन् बध्नात्यघं सप्तग्रामदाहांहसोऽधिकम् ११

टीका— बध्नाति आत्मना योजयति । कोऽसौ पुमान् । किं तत् अघं पापं । कियत् अधिकं अतिरिक्तं । कस्मात् सप्तग्रामदाहांहसः ग्रामसप्तकदाहकपातकात् । किं कुर्वन् खादन् भक्षयन् । किं तत् मधु क्षौद्रं । किंभूतमपि बिन्दुशः बिन्दुमात्रमपि ।

---

१ अनेकजन्तुसङ्घातनिघातनसमुद्भवम् ॥
जगुप्सनीयं लालावत्कः स्वादयति माक्षिकम् ॥ १ ॥

अर्थः—अनेक प्राण्यांच्या समुदायांच्या नाशानें प्राप्त होणारें आणि लाळेप्रमाणें किळस आणणारें असें जें मधु ( मध ) तें कोण बरें धर्मशील मनुष्य भक्षण करील? अथवा,—

मक्षिकागर्भसम्भूतबालाण्डकनिपीडनात् ॥
जातं मधु कथं सन्तः सेवन्ते कललाकृति ॥ २ ॥

अर्थः—मधमाशीच्या गर्भांतून निघालेलीं लहान लहान अंडीं पिळून त्यापासून उत्पन्न झालेला अर्थात् मांसाप्रमाणें त्याज्य असा मध सत्पुरुष कसा बरें सेवितील? अथवा,—

किंविशिष्टं मधुकृतां मक्षिकाभ्रमरमशकादीनां मधुकरप्राणिनां व्रातः सङ्घस्तस्य घातो नाशस्तस्माद्भुत्था उत्पत्तिर्यस्य तन्मधुकृद्व्रातघातोत्थं । पुनः किंविशिष्टं अशुचि प्राणिनिर्यासजन्यत्वान्माक्षिकादिवान्तत्वाच्चापवित्रं म्लेच्छलालादिसम्पृक्तत्वात् तुच्छं च ॥

**अर्थ— भ्रमर, मधमाशी वगैरे प्राण्याच्या समुदायाच्या नाशानें उत्पन्न होणारा व अत्यंत अशुचि असा जो मध, त्याचा एक बिंदुहि खाणाऱ्या मनुष्यास [1] सात गांवें जाळिल्यापेक्षांहि अधिक पातक लागतें.**

---

एकैककुसुमक्रोडाद्रसमापीय मक्षिकाः ॥
यद्वमन्ति मधूच्छिष्टं तदश्नन्ति न धार्मिकाः ॥ ३ ॥

अर्थः—एकेक फुलांतून निघणारा रस पिऊन पुनः मधमाशा जें ओकितात, तो मध होय. असा उष्ट्यापमाणें असलेला मध धार्मिकजन कसा बरें खातील? खाणार नाहींत. शिवाय तें खाण्यांत फारच मोठें पातक आहे. कारण,—

१ ग्रामसप्तकविदाहिरेफसा । तुल्यता न मधुभक्षिरेफसः ॥
तुल्यमञ्जलिजलेन कुत्रचि- । न्निम्नगापातिजलं न जायते ॥४॥

अर्थः—सात गांवें जाळून जें पातक घडतें, तें कांहीं मध खाण्यानें घडणाऱ्या पातकाची बरोबरी करणार नाहीं. ओंजळभर असलेलें पाणी समुद्रांतल्या सगळ्या पाण्याची बरोबरी करील काय? करणार नाहीं. तात्पर्यः—सात गांवें जाळण्यापेक्षांहि फारच मोठें असें पातक मध खाण्यांत आहे. याकरितां तें खाण्याची इच्छाहि करूं नये. कारण,—

यश्चिखादिषति सारघं कुधी- । र्मक्षिकागणविनाशनस्पृहः ॥

अथ क्षौद्रवन्नवनीतस्यापि दोषभूयिष्ठतया त्याज्यतामुपदिशति—

**आतां, मधाप्रमाणें नवनीतांतहि ( लोणी ) पुष्कळ दोष असतात; ह्मणून त्याचाहि त्याग करण्यास सांगतात.**

**मधुवन्नवनीतं च मुञ्चेत्तत्रापि भूरिशः ॥**
**द्विमुहूर्तात्परं शश्वत्संसजन्त्यंगिराशयः ॥ १२ ॥**

**टीका**—मुञ्चेत् व्रतयेत् । कोऽसौ धार्मिकः । किं तत् नवनीतं च दधिसारमपि । क्विवत् मधुवत् क्षौद्रं यथा । यतः संसजन्ति सम्मूर्च्छन्ति । के अङ्गिराशयः जीवसंघाताः । कियन्तो भूरिशः प्रचुराः । क्व तत्रापि न केवलं मधुनि नवनीतेऽपि । कथं शश्वत् सदा । कथं परमूर्ध्वं । कस्मात् द्विमुहूर्तात् मुहूर्तद्वयात् ॥

**अर्थ— मधूप्रमाणें नवनीतहि ( लोणी ) त्याज्य आहे.**

---

पापकर्दमनिषेधनिम्नगा । यस्य हन्त करुणा कुतस्तनी ॥ ५ ॥

अर्थः—ज्याला मध खाण्याची इच्छा झाली त्याला मधमाशींचा वध करण्याचीच इच्छा झाली. मग, पापरूपी चिखल धुवून टाकणारी जणूं नदीच अशी करुणा त्याला कोठून असणार! मुळींच असणार नाहीं! ! कष्ट कष्ट! ! ! “ मधांत सर्वदा जीव भरलेले असतात. ह्मणून सांगतात कीं,—

स्वयमेव विगलितं यद् गृहीतमथवा बलेन निजगोलात् ॥
तत्रापि भवति हिंसा तदाश्रयप्राणिनां घातात् ॥ ६ ॥

अर्थः—मध हें आपोआप गळून पडलेलें असो; कीं बलात्कारानें काढून आणलेलें असो; तरी तें खाण्यानें हिंसा होतेच. कारण, त्यांत सर्वदा सूक्ष्म जीव भरलेले असतात.

१ यन्मुहूर्तयुगतः परं सदा मूर्छति प्रचुरजीवराशिभिः ॥

कारण त्यांतहि चार घटिकांनंतर तत्काल अनंत संमूर्छन जीव भरून जातात.

अथ पञ्चोदुम्बरभक्षणे द्रव्यभावहिंसादोषमुपपादयति—

आतां, उदुंबर खाण्यांतहि द्रव्यभावहिंसेचा दोष घडतो हें प्रतिपादन करितात.

पिप्पलोदुम्बरप्लक्षवटफल्गुफलान्यदन् ॥
हन्त्यार्द्राणि त्रसान् शुष्काण्यपि स्वं रागयोगतः ॥१३॥

टीका—हन्ति हिनस्ति । कोऽसौ पुरुषः । कान् त्रसान् स्थूलसूक्ष्मप्राणिकुलाकुलत्वात्तेषाम् । किं कुर्वन् अदन् भक्षयन् । कानि पिप्पलादिफलानि । फल्गुरत्र काकोदुम्बरिका । किंविशिष्टानि आर्द्राणि । न केवलमार्द्राणि तान्यदन् स्थूलसूक्ष्मप्राणिनो हन्ति किं तर्हि? शुष्काण्यपि कालोच्छिन्नत्रसान्यपि । तान्यदन् स्वमात्मानं हन्ति । कस्मात् रागयोगतः प्रीतिसम्बन्धात् । अन्तर्दीपकत्वादिदं मध्वादिष्वपि योज्यम् । तत्रापि रागावतारद्वारेणात्मघातस्योक्तत्वात्॥

---

तद्गिलन्ति नवनीतमत्र ये ते व्रजन्ति खलु कां गतिं मृताः ॥१॥

अर्थः—चार घटिका संपल्याबरोबर ज्यांत पुष्कळ संमूर्छन जीव भरून जातात असें तें नवनीत जे लोक खातात; ते मरणानंतर कोणत्या दुर्गतीस जातात, हें सांगवत नाहीं. आणखी कित्येकांचें असेंहि मत आहे कीं,—

१ अंतर्मुहूर्तात्परतः सुसूक्ष्मा जन्तुराशयः ॥
यत्र मूर्छन्ति नाद्यं तन्नवनीतं विवेकिभिः ॥ २ ॥

अर्थः—नवनीतांत पौणेदोन घटिका नंतर सूक्ष्म असे अनंत जंतु भरून जातात. ह्मणून विवेकी पुरुषानें तें खाऊं नये.

अर्थ— पिंपळ, उंबर, पिंपरी, वड व काळा उंबर ह्या पांच वृक्षांचीं ओलीं व वाळलेलीं फळें खाणारा प्राणी त्रस जीवांची हिंसा ( द्रव्यहिंसा ) करितो. व त्या फळांच्या ठायीं प्रीति ठेविल्यामुळें आपलीहि हिंसा ( भावहिंसा ) करितो.

अथ निशाभोजनागालितजलोपयोगयोर्मद्याद्युपयोगवद्दोषमयत्वात्परिहारमाह—

आतां, रात्रिभोजननिषेध व अगालितजलत्याग सांगतात

रागजीववधापायभूयस्त्वात्तद्वदुत्सृजेत् ॥
रात्रिभक्तं तथा युंज्यान्न पानीयमगालितम् ॥१४॥

---

२ अश्वत्थोदुम्बरप्लक्षन्यग्रोधादिफलेष्वपि ॥
प्रत्यक्षाः प्राणिनः स्थूलाः सूक्ष्माश्चागमगोचराः ॥ २ ॥

अर्थः—या पांच उदुंबर फळांतहि स्थूल जीव किती भरलेले असतात ते तर प्रत्यक्ष दिसतातच. शिवाय त्यांत सूक्ष्म जीवहि असतात, ते दिसत नाहींत. ते शास्त्रानेंच कळून येतात.

१ ससंख्यजीवव्यपघातवृत्तिभिर्न धीवरैरस्ति समं समानता ॥
अनन्तजीवव्यपरोपकाणामुदुम्बराहारविलोलचेतसाम् ॥ २ ॥

अर्थः—नदींत जाळें पसरून कोळी लोक मासे मारितात. तरी त्यांत मेलेल्या जीवांची संख्या ( मोजमाप ) असते. तशी संख्या उंबर खाणाऱ्या लोकांनीं वध केलेल्या सूक्ष्म जीवांची होत नाहीं. कारण, त्यांत ते सूक्ष्म जीव अनंत असतात. यावरून, मासे मारणाऱ्या कोळ्यापेक्षांहि उंबर खाणारे लोक महापातकी होत. यांत संशय नाहीं.

**टीका**—उत्सृजेद्वर्जयेद्धार्मिकः। किं तत् रात्रिभक्तं रात्रावन्नप्राशनं किंवत् तद्वत् मद्यपानादिवत्। कस्मात् रागेत्यादि। रागश्च जीववधश्च अपायाश्च जलोदरादयस्ते भूयांसो दिनभोजनादतिशयेन बहवो यत्र तद्रागजीववधापायभूयस्तस्य भावस्तत्त्वं तस्मात्। तथा न युञ्ज्यात् नोपयुञ्जीत किं तत् पानीयं जलं पेयत्वात्तैलघृतादि वा सर्वं द्रवद्रव्यं। किंविशिष्टं अगालितं वस्त्रादपरिस्रुतम्॥

**अर्थ**— रात्रिभोजन व अगालित जलाचें पान करण्यांत राग[1] (भावहिंसा) जीववध[2] (द्रव्यहिंसा) व अपाय ह्मणजे जलोदर वगैरे रोग होणें इत्यादि दोष घडतात. ह्मणून, मद्याप्रमाणें त्यांचाहि त्याग करावा. भावार्थ—रात्रिभोजनानें दिवसापेक्षां अधिक हिंसा होते, व अगालित जलपानानें सूक्ष्म जीवांची हिंसा घडून जलोदर वगैरे रोग जडतात. पानीय ह्मणजे पेय पदार्थ. यावरून असा बोध होतो कीं, पाणी, दूध रस वगैरे जे पातळ पदार्थ आहेत, ते वस्त्रपूत करूनच उपयोगांत आणावेत.

---

१ राग ह्मणजे प्रीति. दिवसापेक्षां रात्रिभोजन करण्यांत अधिक प्रीति असते. प्रीति जी आहे ती भावहिंसेला कारण आहे.

२ अर्कालोकेन विना भुंजानः परिहरेत्कथं हिंसाम्॥
अपि बोधितप्रदीपो भोज्यजुषां सूक्ष्मजीवानाम्॥ १॥

अर्थः—रात्रीं उत्तम प्रकाशाचा दिवा पेटवून त्याच्या प्रकाशांत जरी भोजन केलें तरी त्या प्रकाशांत अन्नांतील सूक्ष्मजीव दिसत नाहींत आणि यामुळें त्या सूक्ष्मजीवांची हिंसा होतेच; ती चुकवितां येत नाहीं. ह्मणून त्या वेळीं भोजन करण्यांत दिवसापेक्षा अधिक हिंसा घडते.

साम्प्रतमनस्तमितभोजिनः सत्फलं किञ्चिद्दृष्टान्तेन मुग्धजनप्रोचनार्थं प्रकटयति—

**आतां, रात्रिभोजनत्यागाचें फळ उदाहरणानें सांगतात.**

**चित्रकूटेऽत्र मातङ्गी यामानस्तमितव्रतात् ॥**
**स्वभर्त्रा मारिता जाता नागश्रीः सागराङ्गजा ॥१५॥**

टीका—जाता उत्पन्ना । काऽसौ मातङ्गी अन्तेवासिनी । किंविशिष्टा सागराङ्गजा सागरदत्तश्रेष्ठिपुत्री । किंनाम्नी नागश्रीः । क्व चित्रकूटे । किंविशिष्टेऽत्र एतस्मिन्नेव मालवदेशस्योत्तरस्यां दिशि प्रसिद्धे । कस्मात् यामानस्तमितव्रतात् यामं प्रहरमात्रं पालितादनस्तमितभोजननियमात् । किंविशिष्टा सती मारिता । केन स्वभर्त्रा जागरिकनाम्ना ॥

**अर्थ**—येथेंच ह्मणजे मालवदेशाच्या उत्तर दिशेस चित्रकूट पर्वतावर रहाणारी एक मांगीण आपल्या पतीकडून मारिली गेली! तरी, तिनें एक प्रहर पर्यंतच रात्रिभोजन त्यागाचें व्रत पाळिलें होतें, त्या पुण्यानें ती सागरदत्त श्रेष्ठीची नागश्री नांवाची कन्या होऊन जन्मली. अर्थात् धार्मिक व श्रीमंताच्या घरीं तिला जन्म प्राप्त झालें.

एवं कृतपरिकर्मणा पाक्षिकश्रावकेण स्थूलहिंसादिविरतिरपि यथात्मशक्ति भावनीयेत्युपदेशार्थमाह—

**आतां, ज्यानें मद्य, मांस, मधु वगैरेंचा त्याग केला आहे, अशा पाक्षिक श्रावकानें अहिंसा वगैरे व्रतांचाहि थोडा थोडा अभ्यास करावा; हें सांगतात.**

स्थूलहिंसानृतस्तेयमैथुनग्रन्थवर्जनम् ॥
पापभीरुतयाऽभ्यस्येद्बलवीर्यनिगूहकः ॥ १६ ॥

टीका—अभ्यसेद्भावयेत् । कोऽसौ श्रावकः । किं तत् स्थूलेत्यादि वक्ष्यमाणलक्षणं स्थूलहिंसादिविरतिरूपमणुव्रतपञ्चकं । कया पापभीरूतया नतु राजादिभयेन । ततस्तदभ्यासे कर्मक्षपणाऽनिष्टेः किंविशिष्टः सन् बलवीर्यनिगूहकः बलमाहारादिजा शक्तिः सैव नैसर्गिकं वीर्यं तयोर्निगूहकस्तदनुसारीत्यर्थः ॥

अर्थ—स्थूलहिंसा, असत्य, चौर्य, परस्त्री व निष्कारण अधिक परिग्रह ( धन, धान्य, दास, दासी, बैल, घोडा वगैरे ) ह्या पांच पातकांचा, यथाशक्ति व पापाची भीति मनांत बाळगून त्याग करण्याचा अभ्यास करावा. तात्पर्य,– अहिंसा वगैरे पांच व्रतें जीं पाळावयाचीं असतात तीं राजादिकांच्या भयानें न पाळतां;– केवळ हिंसा वगैरे करण्यांत मोठें पातक आहे अशा भावानें– पाळिलीं पाहिजेत.

एवं हि स्थूलहिंसाविरतिमभ्यस्यता वेश्यादाविव द्यूतेऽप्यासक्तिर्न कर्तव्येत्युपदिशति—

आतां, वेश्येप्रमाणेंच जुगारहि अनर्थकारक आहे ह्मणून त्याचा त्याग करण्यास सांगतात.

द्यूते हिंसानृतस्तेयलोभमायामये सजत् ।
क स्वं क्षिपति नानर्थे वेश्याखेटान्यदारवत् ॥ १७ ॥

टीका--क्कानर्थे न क्षिपति सर्वस्मिन्-धर्मादिभ्रंशे व्यापारयतीत्यर्थः । कं स्वं आत्मानं जातिं च । किं कुर्वन् सजन् गृद्धिं

कुर्वन् कौतुकमात्रेण द्यूतक्रीडनस्य पाक्षिकेण त्यक्तुमशक्यत्वादेवमुच्यते । क्व सजन् द्यूते । किंविशिष्टे हिंसा प्राणातिपातः अनृतमसत्यवचनं स्तेयं चौर्यं लोभो गार्ध्यं माया वञ्चना ताः प्रकृताः प्राचुर्येण कृता अस्मिन्निति हिंसादिमये । किंवत् वेश्यायामाखेटे परदारेषु च यथा । वेश्यादिष्वपि हिंसादिमयत्वादासजतः स्वस्य ज्ञातीनां च पुरुषार्थभ्रंशस्य सुप्रसिद्धत्वात् ॥

**अर्थ— हिंसा, लबाडी, चोरी, लोभ, कपट इत्यादि दोषांचें आगरच अशा जुगारीच्या व्यसनांत जो आसक्त होतो; तो, सर्वथा धर्मांचा ध्वंस होण्यास कारण अशा कोणत्या अनर्थांत आपणास टाकीत नाहीं बरें? अर्थात् वेश्या, शिकार व परस्त्री करणारा मनुष्य जसा धर्मभ्रष्ट व जातिभ्रष्ट होतो तद्वत् जुगार खेळणाराहि होतो. कारण, जुगार हें सर्व दुर्व्यसनांचें मूळ आहे.**

---

१ सर्वानर्थप्रथनं मथनं शौचस्य सद्म मायायाः ॥
दूरात्परिहर्तव्यं चौर्यासत्यास्पदं द्यूतम् ॥ १ ॥

अर्थः—सगळ्या अनर्थांस उदयास आणणारें, पवित्रतेचा नाश करणारें, कपटाचें माहेर व चोरी आणि लबाडीचें ठिकाण असें जें जुगाराचें व्यसन त्याच्या वाऱ्यास सुद्धां राहूं नये. जुगार खेळणाऱ्याची स्थिति कशी असते पहा.—

कौपीनं वसनं कदन्नमशनं शय्या धरा पांसुला ।
जल्पाश्लीलगिरः कुटुम्बकजनद्रोहः सहाया विटाः ॥
व्यापाराः परवञ्चनानि सुहृदश्चौरा महान्तो द्विषः ।
प्रायः सैष दुरोदरव्यसनिनः संसारवासक्रमः ॥ २ ॥

अर्थः—लंगोटीशिवाय दुसरें वस्त्र टिकतच नाहीं, कदन्नाशिवाय भोजन कधींच मिळत नाहीं, केरकचरा वगैरेनीं भरलेली

अथ प्रतिपाद्यानुरोधाद्धर्माचार्याणां सूत्राविरोधेन देशनानानात्वोपलम्भाद्भंग्यन्तरेणाष्टमूलगुणानुद्देष्टुमाह—

आतां, प्रतिपाद्य विषयास अनुसरून व धर्माचार्यांच्या मूलसूत्रास बाध न आणितां; अन्यप्रकारानें श्रावकांचे आठ मूलगुण सांगतात.

मद्यपलमधुनिशाशन-
पञ्चफलीविरतिपञ्चकाप्तनुती ॥
जीवदया जलगालन-
मिति च क्वचिदष्टमूलगुणाः ॥ १८ ॥

टीका — वर्तन्ते । के मूलगुणाः । कति अष्ट । क्व क्वचित् शास्त्रे । कथं मद्येत्यादि । पञ्चफली पञ्चानां फलानां समाहारः पिप्पलादिफलपञ्चकमित्यर्थः । तद्विरतिरेक एवात्र मूलगुणः । आप्तनुतिः त्रिकालदेववन्दना । मद्यं च पलं च मधु च निशाशनं च पञ्चफली च ताभ्यः पञ्चभ्यो विरतयस्तासां पञ्चकं । तच्चाप्तनुतिश्च ते द्वे । जीवदया अनुकम्प्यानुकम्पा । जलगालनं चेति ॥

अर्थ— १ मद्य, २ मांस, ३ मध, ४ रात्रिभोजन ५ पंचोदुंबर ह्यांचा त्याग करणें; ६ त्रिकाल देववंदना—

---

जमीन हीच ज्याची शय्या, भाषणांत सर्वदा अश्लीलपणा, कुटुंबांतील मनुष्यांशीं कधींच सरळ असावयाचें नाहीं, रंडीबाज लोक तितके मदतगार, दुसऱ्यांस ठकविण्याचा उद्योग सर्वदा चाललेला, चोर तितके याचे मित्र, सज्जन तितके शत्रु, अशा प्रकारचा संसारस्थितीचा जो क्रम; तो, प्रायः ह्मणजे मुख्यत्वेंकरून जुगार खेळणाऱ्या लोकांचाच असतो.

स्तुतिस्तोत्र करणें; ७ जीवदया आणि ८ जल गालित करून तें उपयोगांत आणणें हेहि श्रावकांचे आठ मूलगुण होत. असें कोठें कोठें शास्त्रांत सांगितलें आहे.

प्रकृतमुपसंहरन् सार्वकालिकसम्यक्त्वशुद्धिपूर्वकमद्यादिविरतिकृतां कृतोपनीतीनां ब्राम्हणक्षत्रियविशां जिनधर्मश्रुत्यधिकारितामाविष्कर्तुमाह—

याप्रमाणें सम्यग्दर्शनाच्या शुद्धीकरितां निरंतर अवश्य पाळल्या पाहिजेत अशा आठ मूलगुणांचें वर्णन पुरें करून; आतां, जिनधर्मशास्त्राचें श्रवण करण्याचा अधिकार कोणास आहे हें सांगतात.

यावज्जीवमिति त्यक्त्वा ।
महापापानि शुद्धधीः ॥
जिनधर्मश्रुतेर्योग्यः ।
स्यात्कृतोपनयो द्विजः ॥ १९ ॥

टीका— स्याद्भवेत् कोऽसौ द्विजः द्विर्जातो मातृगर्भे जिन-

---

१ मद्योदुम्बरपञ्चकामिषमधुत्यागाः कृपा प्राणिनां ।
नक्तंभुक्तिविमुक्तिराप्तविनुतिस्तोयं सुवस्त्रस्रुतम् ॥
एतेऽष्टौ प्रगुणा गुणा गणधरैरागारिणां कीर्तिता ।
एकेनाप्यमुना विना यदि भवेत् भूतो न गेहाश्रमी ॥ १ ॥

अर्थः—मद्य, मांस, मधु, पंचोदुंबर व रात्रिभोजन यांचा त्याग, प्राण्यांची दया, त्रिकाल देववंदन व जलगालन हे आठ मुख्य गुण गणधरांनीं गृहस्थांस सांगितले आहेत. ह्यांपैकीं एक गुण जरी कमी असला तरी त्यास गृहस्थ ह्मणतां येणार नाहीं.

समयज्ञानगर्भे चोत्पादात् द्विजो ब्राह्मणक्षत्रियविशामन्यतमः । त्रयो वर्णा द्विजातय इति वचनात् । किंविशिष्टः कृतोपनयः कृतो यथाविध्युपकल्पित उपनयो मौञ्जीबन्धादिलक्षणोपनीतिक्रिया यस्य स तथोक्तः । किंविशिष्टः स्यात् योग्योऽधिकारी । कस्या जिनधर्मश्रुतेः वीतरागसर्वज्ञोपदिष्टस्य धर्मस्य श्रुतिः श्रवणं शास्त्रं वा उपासकाध्ययनादि तस्याः । किं कृत्वा शुद्धधीः सम्यक्त्वविशुद्धबुद्धिः सन् । त्यक्त्वा कानि महापापानि महद्विपुलमनन्तसंसारकारणं पापं येभ्यस्तानि मद्यपानादीनि प्राक्प्रबन्धेनोक्तानि । कथं यावज्जीवं जीवितावधि कथं इति अनेन प्रकारेण ॥

**अर्थ— महापापें ह्मणजे संसारांत दीर्घकाल हिंडविणारीं जीं मद्यपान, मांसभक्षण वगैरे दुर्व्यसनें त्यांचा यावज्जीव त्याग करून; अर्थात् आठ मूलगुण मरणपर्यंत पाळण्याचें व्रत घेऊन; त्यामुळें ज्याचें सम्यक्त्व शुद्ध झालें आहे असा, व मौंजीबंध वगैरे लक्षणाची उपनीतिक्रिया ज्याची केली आहे असा जो द्विज (ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीन वर्णांस द्विज ह्मणतात. प्रथम जन्म पावून पुनः वर सांगितलेल्या व्रतसंस्कारापासून जो जन्मतो ह्मणजे दोनवेळां जो जन्मतो तो द्विज.)**

---

१ अष्टावनिष्टदुस्तरदुरितायतनान्यमूनि परिवर्ज्य ॥
जिनधर्मदेशनाया भवन्ति पात्राणि शुद्धधियः ॥ १ ॥

अर्थः—अनिष्ट व दुस्तर अशा पापांचें घर अशीं मद्यपान वगैरे व्यसनें सोडून अर्थात् आठ मूलगुण पाळून ज्यांची बुद्धि शुद्ध झाली आहे असे सम्यग्दृष्टि जे झालेले असतात; तेच जीव जिनधर्माच्या उपदेशास पात्र होत.

**तो जिनोक्त धर्माचें अथवा ‘उपासकाध्ययन’ वगैरे शास्त्राचें श्रवण करण्यास योग्य होय.**

सहजामहार्यो चालौकिकीं गुणसम्पदमुद्वहतो भव्यान् यथासम्भवमवगमयन्नाह—

**आतां, भव्य पुरुष कसे उत्पन्न होतात तें व त्यांचे भेद सांगतात.—**

जाता जैनकुले पुरा जिनवृषाभ्यासानुभावाद्गुणै- ।
र्येऽयत्नोपनतैः स्फुरन्ति सुकृतामग्रेसराः केऽपि ते ॥
येऽप्युत्पद्य कुदृक्कुले विधिवशाद्दीक्षोचिते स्वं गुणै- ।
र्विद्याशिल्पविमुक्तवृत्तिनि पुनन्त्यन्वीरते तेऽपि तान्

**टीका**—सन्ति। के ते केऽपि प्रविरलाः सम्प्रति बहूनामभावात्। किंविशिष्टा अग्रेसराः सम्यक्त्वसहचारिपुण्योदयान्मुख्याः। केषां सुकृतां कृतपुण्यानां। ये किं ये स्फुरन्ति लोकचित्ते चमत्कारं कुर्वन्ति। कैः गुणैः सम्यक्त्वादिभिः। किंविशिष्टैरयत्नोपनतैः प्रयत्नमन्तरेण प्राप्तैः सहजैरित्यर्थः। किंविशिष्टाः सन्तो जाता उत्पन्नाः। क जैनकुले जिनो देवता येषां ते जैनास्तेषां कुलं पूर्वपुरुषपरम्पराप्रभवो वंशस्तत्र। जिनोक्तगर्भाधानादिनिर्वाणपर्यन्तक्रियामंत्रसंस्कारयोग्ये महान्वय इत्यर्थः। कस्मात् पुरा पूर्वजन्मनि जिनवृषस्य सर्वज्ञोक्तधर्मस्याभ्यासः असकृत्प्रवृत्तिस्तस्यानुभावो माहात्म्यं तज्जनितपुण्योदयस्तस्मात्। तथा अन्वीरतेऽनुगच्छन्ति। के तेऽपि। कान् तान् पूर्वोक्तान् जैनकुलजातान् तत्सदृशा भवन्तीत्यर्थः। ये किं ये पुनन्ति पवित्रीकुर्वन्ति। कं स्वमात्मानं। कैः गुणैः वक्ष्यमाणतत्त्वार्थ-

प्रतिपत्त्यादिभिः । किं कृत्वा उत्पद्य जनित्वा । क्व कुदृक्कुलेऽपि मिथ्यादृष्टिवंशेऽपि । अपिरत्र विस्मये भिन्नक्रमः । किंविशिष्टे दीक्षोचिते दीक्षा व्रताविष्करणं व्रतोन्मुखस्य वृत्तिरिति यावत् । सा चात्रोपासकदीक्षा जिनमुद्रा वा उपनीत्यादिसंस्कारो वा । पुनः किंविशिष्टे विद्याशिल्पविमुक्तवृत्तिनि विद्याऽत्राजीवनार्थं गीतादिशास्त्रं शिल्पं कारुकर्म ताभ्यां विमुक्ता ततोऽन्या वृत्तिर्वार्ता कृष्यादिलक्षणो जीवनोपायो यत्र तस्मिन् । कस्मात् विधिवशात् मिथ्यात्वसहचारिपुण्योदययोगात् ॥

अर्थः—जैनकुल=जिन आहे उपास्य देव ज्यांना ते जैन, त्यांचें जें कुल ह्मणजे पूर्वपुरुषांच्या परंपरेनें झालेला वंश अर्थात् जिनोक्त गर्भाधानापासून निर्वाणपर्यंत ज्या क्रिया, मंत्र व संस्कार त्यांच्या योगानें शुद्ध अशा या जैन कुलांत जे उत्पन्न झालेले, व सम्यक्त्वाबरोबरच असणाऱ्या पुण्योदयामुळें पुण्यशाली पुरुषांमध्यें श्रेष्ठ झालेले असे व पूर्वजन्मीं अभ्यासिलेल्या जिनधर्माच्या माहात्म्यामुळें इह जन्मीं प्रयत्नाशिवाय प्राप्त झालेल्या आपल्या सम्यक्त्व वगैरे गुणांनीं लोकांच्या चित्तांत चमत्कार उत्पन्न करितात असे ते पुरुष या जगीं हल्लीं क्वचितच आढळून येतात. ह्मणजे ते फारच थोडे आहेत. [ जे पूर्वजन्मीं जिनधर्मानें चालत होते ते इहजन्मींहि जैनकुलांत उत्पन्न होऊन पूर्वसंस्कारामुळें तसेच धर्मनिष्ठ झाले ही गोष्ट सहज आहे. ] आतां आश्चर्य मानण्यासारखी गोष्ट ही कीं,—कित्येक भव्य; विद्या ह्मणजे चरितार्थाच्या उपयोगीं पडणारें गायन वगैरेचें ज्ञान आणि शिल्प

ह्मणजे चित्रें वगैरे काढण्याची कला या दोन उद्योगाशिवाय बाकीचे ह्मणजे कृषि व्यापार वगैरे उदरानिर्वाहाचे उद्योग ज्यांत आहेत अशा ह्मणजे सुखानें ज्यांत निर्वाह होतो अशा, व दीक्षा ( व्रतांचे ठायीं सम्मुखवृत्ति. ) ह्मणजे उपासक दीक्षा अथवा जिनमुद्रा अथवा उपनीति वगैरे संस्कार या तिहींपैकीं कोणतीहि दीक्षा घेण्यास योग्य, पण, मिथ्यादृष्टींच्या कुलांत जन्मूनहि मिथ्यात्वाबरोबरच असणाऱ्या पुण्योदयाच्या योगानें, तत्वश्रद्धान वगैरे गुणांनीं आपल्या आत्म्यास पवित्र करून; त्याच्या योगानें वर वर्णिलेल्या जैन कुलांतील पुरुषांप्रमाणें होतात, ह्मणजे त्याच्या योग्यतेचे होतात.

तात्पर्य:— जैनकुलांत जन्म पावून पूर्वजन्मींच्या संस्कारामुळें सहज धर्मनिष्ठ होणारा एक, व मिथ्यादृष्टींच्या कुलांतहि जन्म पावून जिनधर्मनिष्ठ होणारा एक अशा भेदानें धर्मशील भव्यजीव दोन प्रकारचे असतात.

इदानीं द्विजातिषु कुलक्रमायातमिथ्याधर्मपरिहारेण विधिवज्जिनोक्तमार्गमाश्रित्य स्वाध्यायध्यानबलादशुभकर्माणि निघ्नन्तं भव्यमभिष्टौति—

आतां, ब्राह्मणांमध्यें कुलक्रमानें चालत आलेल्या मिथ्याधर्माचा परित्याग करून; व जिनोक्त मार्गाचा विधिपूर्वक आश्रय करून; स्वाध्याय व ध्यान ह्यांच्या बळानें अशुभकर्माचा ध्वंस करणाऱ्या भव्याचें अभिनंदन करितात.

तत्त्वार्थं प्रतिपद्य तीर्थकथनादादाय देशव्रतं ।
तद्दीक्षाग्रधृतापराजितमहामन्त्रोऽस्तदुर्दैवतः ॥
आङ्गं पूर्वमथार्थसंग्रहमधीत्याधीतशास्त्रान्तरः ।
पर्वान्ते प्रतिमासमाधिमुपयन् धन्यो निहन्त्यंहसी

टीका—निहन्ति नाशयति । कोऽसौ धन्यः सुकृती । के अंहसी द्रव्यभावपापे इत्यर्थः । किं कुर्वन् उपयन् अभ्यस्यन् । कं प्रतिमासमाधिं रात्रिप्रतिमायोगं । क्क पर्वान्ते पर्वणां मासि मासि द्वयोरष्टम्योर्द्वयोश्चतुर्दश्योरन्ते अवसाने रात्रावित्यर्थः । किंविशिष्टः सन् अधीतशास्त्रान्तरः अधीतानि विपठितानि शास्त्रान्तराणि सौगतादिग्रन्था व्याकरणादीनि च येनासौ । किं कृत्वा अधीत्य पठित्वा । कं अर्थसङ्ग्रहं उद्धारग्रन्थमुपश्रुत्य । सूत्रमपि । किंविशिष्टमाङ्गं आचाराङ्गादिद्वादशाङ्गाश्रितं । न केवलमाङ्गं पौर्वं च चतुर्दशपूर्वगतश्रुताश्रितम् । अथशब्दोऽत्र चार्थे । किम्भूतो भूत्वा अस्तदुर्दैवतः त्यक्तमिथ्यादेवतागणः । पुनः किंविशिष्टो भूत्वा तदित्यादि तस्य देशव्रतस्य दीक्षा अग्रं पूर्वं यस्य तत्तद्दीक्षाग्रं उपासकदीक्षापूर्वकं धृतो गुरुमुखाद्धारितोऽपराजितो नाम महान् गणधरदेवादीनां पूज्यो मन्त्रः पञ्चनमस्काराख्यो येन स तद्दीक्षाग्रधृतापराजितमहामन्त्रः । किं कृत्वा आसाद्य लब्ध्वा । किंतत् देशव्रतं तद्दीक्षामूलगुणाष्टकादिकं । किं कृत्वा प्रतिपद्य निश्चित्य । कं तत्वार्थं जीवादिकं । कस्मात् तीर्थकथनात् तीर्थस्य धर्माचार्यस्य गृहस्थाचार्यस्य वा कथनाद्वाक्यप्रबन्धात् । एता अष्टौ मिथ्यादृशो दीक्षान्वयक्रियाः क्रमेण संक्षेपादत्रोक्ता विस्तरतस्तु ज्ञानप्रदीपिकायामार्षे वा द्रष्टव्याः । अत्रार्षोक्तः श्लोको यथा— अवतारो वृत्तलाभः स्थानलाभो गणग्रहः । पूजाराध्यं पुण्ययज्ञो दृढचर्योपयोगिता ॥

**अर्थः—तीर्थ ह्मणजे धर्माचार्य अथवा गृहस्थाचार्य, यांच्या उत्तम उपदेशानें जिनोक्त जीवाजीवादि तत्वार्थांचा निश्चय करून ह्मणजे त्यावर श्रद्धा ठेवून ( यालाच १ अवतारक्रिया ह्मणतात. ) पूर्वोक्त आठ मूलगुण**

---

१ आर्ष ह्मणजे भगवान् जिनसेन आचार्यप्रणीत महापुराण; त्यांतल्या ३९ व्या अध्यायांत दीक्षान्वयक्रिया वर्णिली आहे. अणुव्रतें किंवा महाव्रतें स्वीकारण्याविषयीं उन्मुख झालेली जी मनुष्याची वृत्ति तिचें नांव दीक्षा. दीक्षेसंबंधी जी क्रिया ती दीक्षान्वयक्रिया. तिचे ४८ भेद आहेत. त्यांपैकी, आठ क्रिया—मिथ्यादृष्टि कुलांत जन्मलेला भव्य जीव जर जैनमार्गांत प्रवृत्त होऊं लागला; तर, त्याला—करावयास सांगितल्या आहेत. त्यांचा क्रम असा.—

१ दिगंबर मुनि अथवा धर्मनिष्ठ व विद्वान् असा गृहस्थाचार्य यांच्यापैकीं कोणाच्या तरी उत्तम उपदेशानें मिथ्यात्वाचा त्याग करून जिनोक्त तत्वाचें श्रद्धान करणें याला 'अवतार' ह्मणतात. या अवतारास धर्मजन्म ह्मणतात. कारण,—

गुरुर्जनयिता तत्वज्ञानं गर्भः सुसंस्कृतः ॥
तथा तत्रावतीर्णोऽसौ भव्यात्मा धर्मजन्मना ॥ १ ॥

अर्थः—गुरु हा जनक आहे, त्याच्यापासून झालेलें तत्वज्ञान हा उत्तम संस्कारानें युक्त असा गर्भ आहे. त्या ज्ञानगर्भांतून धर्मस्वीकार रूपानें हा भव्यात्मा अवतार पावलेला आहे. ह्मणून या अवतारास धर्मजन्म ह्मणतात. (प्राणी जेव्हां जुनें शरीर सोडून नवीन शरीर धारण करितो ह्मणजे मरण पावलेला जीव पुनः जन्मास येतो तेंव्हां त्याला शरीरजन्म ह्मणतात. त्याप्रमाणें

पाळण्याची प्रतिज्ञा करून ( याला २ वृत्तलाभ ह्मणतात. ), उपासकदीक्षा प्रथम घेऊन नंतर अपराजित ह्मणजे गणधर वगैरे मुनिश्रेष्ठांसहि पूज्य असा जो महामंत्र ह्मणजे पंचनमस्कारमंत्र तो स्वीकार करून ( याला ३ स्थानलाभ ह्मणतात. ), मिथ्यादेवतांचा त्याग करून ( याला

---

जीवानें मिथ्यात्व अवस्थेचा त्याग करून सम्यक्त्वाचा स्वीकार केला ह्मणजे त्याला धर्मजन्म ह्मणावें. )

२ ततोऽस्य वृत्तलाभः स्यात्तदैव गुरुपादयोः ॥
प्रणतस्य व्रतव्रातं विधानेनोपसेदुषः ॥ २ ॥

अर्थः— जेव्हां गुरूच्या उपदेशानें याला सम्यक्त्व होतें त्याच वेळीं गुरुपदीं नम्र होऊन विधिपूर्वक हा आठ मूलगुण वगैरे व्रतें स्वीकारितो. याला 'वृत्तलाभ' ह्मणतात.

३ ततः कृतोपवासस्य पूजाविधिपुरस्सरम् ॥
स्थानलाभो भवेदस्य तत्रायमुचितो विधिः ॥ ३ ॥

अर्थः—वृत्तलाभानंतर जिनपूजा व उपवास वगैरे करून याला 'स्थानलाभ' होतो. त्याचा विधि असाः—

जिनालये शुचौ रंगे पद्ममष्टदलं लिखेत् ॥
विलिखेद्वा जिनास्थानमण्डलं समवृत्तकम् ॥ ४ ॥
श्लक्ष्णेन पिष्टचूर्णेन सलिलालोडितेन वा ॥
वर्तनं मण्डलस्येष्टं चन्दनादिद्रवेण वा ॥ ५ ॥
तस्मिन्नष्टदले पद्मे जैने वाऽऽस्थानमण्डले ॥
विधिना लिखिते तज्ज्ञैर्विष्वग्विरचितार्चने ॥ ६ ॥
जिनार्च्याभिमूखं सूरिर्विधिनैनं निवेशयेत् ॥
तवोपासकदीक्षेयमिति मुर्ध्नि मुहुः स्पृशन् ॥ ७ ॥

**४ गणग्रह ह्मणतात. ), द्वादशांग शास्त्रासंबंधी द्रव्यसंग्रह वगैरे अध्यात्म ग्रंथांचें श्रवण करून (याला ५ पूजा-**

---

पञ्चमुष्टिविधानेन स्पृष्ट्वैनमधिमस्तकम् ॥
पूतोऽसि दीक्षयेत्युक्त्वा सिद्धशेषं च लम्भयेत् ॥ ८ ॥
ततः पञ्चनमस्कारपदान्यस्मायुपादिशेत् ॥
मन्त्रोऽयमखिलात्पापात्त्वां पुनीतादितीरयन् ॥ ९ ॥
कृत्वा विधिमिमं पश्चात्पारणाय विसर्जयेत् ॥
गुरोरनुग्रहात्सोऽपि सम्प्रीतः स्वं गृहं व्रजेत् ॥ १० ॥

अर्थः—जिनालयांत निर्मळ अशा मंडपामध्यें बारीक अशा अनेक रंगाच्या पिठांच्या चूर्णानें अथवा चंदन वगैरे गंध द्रव्यांच्या पातळ लेपानें अष्टदलाचें कमल किंवा जिनेश्वराच्या समवसरण सभेसमान व वर्तुलाकार असें मंडल शास्त्रोक्त विधि जाणणाऱ्यांनीं लिहावें. व त्याच्या मध्यभागीं जिनाची प्रतिमा स्थापन करून पूजा करावी. नंतर त्या जिनप्रतिमेपुढें विधि-पूर्वक त्या शिष्यास बसवून गुरूनें 'तुला ही उपासक दीक्षा देत आहों' असें ह्मणत त्याच्या मस्तकास वारंवार स्पर्श करावा. याप्रमाणें पंचमुष्टी करून त्याच्या मस्तकास स्पर्श केल्यावर 'तूं पवित्र आहेस आतां उपासक दीक्षा तूं घे' असें म्हणून त्याच्या मस्तकावर तीर्थोदकाचें सेंचन करावें. त्यानंतर, 'हा मंत्र तुला सर्वपापापासून पवित्र करील' असें सांगून त्या शिष्यास पंचनम-स्कार मंत्राचा उपदेश करावा. याप्रमाणें सर्व विधि करून त्याला पारणेकरितां मोकळीक द्यावी. नंतर तो शिष्यहि आज आपणास गुरूचा अनुग्रह झाला ह्मणून मोठा हर्ष मानून घरीं जातो. याला "स्थानलाभ" ह्मणतात. घरीं गेल्यावर—

राध्य ह्मणतात. ), जिनोक्त चतुर्दश पूर्व शास्त्राचा अर्थ श्रवण करून, ( याला ६ पुण्ययज्ञ ह्मणतात. ) न्याय,

---

४ इयन्तं कालमज्ञानात्पूजिताः स्थ कृतादरम् ॥
पूज्यास्त्विदानीमस्माभिरस्मत्समयदेवताः ॥ ११ ॥
ततोऽपमृषितेनालमन्यत्र स्वैरमास्यताम् ॥
इति प्रकाशमेवैता नीत्वान्यत्र क्वचित्त्यजेत् ॥ १२ ॥
गणग्रहः स एषः स्यात्प्राक्तनं देवतागणम् ॥
विसृज्यार्चयतः शान्ता देवताः समयोचिताः ॥ १३ ॥

अर्थः—मिथ्या देवतांस उद्देशून असें ह्मणावें कीं, 'आजपर्यंत आह्मीं आमच्या अज्ञानामुळें तुह्मांस मोठा आदर करून पूजिलें. आतां आह्मांस जिनसमय देवता पुज्य आहेत, तर तुह्मी येथून निघून, आमच्यावर न रागावतां तुमच्या इच्छेस येईल तिकडे जाऊन रहा.' असें ह्मणून त्या मिथ्यादेवांच्या मूर्ति कोठेंतरी बाहेर नेऊन ठेवाव्या. याप्रमाणें पूर्वीच्या मिथ्या देवतांस सोडून जिनधर्मास संमत अशा शांत देवतांची अर्चना करणें याला " गणग्रह " असें ह्मणतात.

५ पूजाराध्याख्यया ख्याता क्रियाऽस्य स्यादतःपरा ॥
पूजोपवाससम्पत्त्या गृह्णतोऽङ्गार्थसंग्रहम् ॥ १४ ॥

अर्थः—त्यानंतर पूजा व उपवास करून द्वादशांग शास्त्राचा अर्थ समजून घेणें याला ' पूजाराध्य क्रिया ' ह्मणतात.

६ ततोऽन्या पुण्ययज्ञाख्या क्रिया पुण्यानुबन्धिनी ॥
शृण्वतः पूर्वविद्यानामर्थं सब्रह्मचारिणः ॥ १५ ॥

अर्थः—त्यानंतर पुण्यकारक अशा १४ पूर्व विद्यांचा अर्थ समानधर्मी गुरूपासून समजून घेणें याला 'पुण्ययज्ञ' ह्मणतात.

व्याकरण, अलंकार, गणित वगैरे शास्त्रांचेंहि अध्ययन करून (याला ७ दृढचर्या ह्मणतात.), प्रत्येक महिन्याच्या २ अष्टमी व २ चतुर्दशींच्या रात्रीं प्रतिमायोग धारण करण्याचा अभ्यास करून (याला ८ उपयोगिता ह्मणतात.) द्रव्य व भाव अशा भेदानें दोन प्रकारच्या पातकांचा ध्वंस करणारा जो भव्यात्मा, तो धन्य ह्मणजे पुण्यवान् होय.

अथ शूद्रस्याप्याहारादिशुद्धिमतो ब्राह्मणादिवद्धर्मक्रियाकारित्वं यथोचितमनुमन्यमानः प्राह—

आतां, आचार वगैरेंनीं शुद्ध अशा शूद्रालाहि श्रावक धर्म पाळण्याचा अधिकार असणें उचित असल्याविषयीं संमति दाखवितात.

शूद्रोऽप्युपस्कराचार- ।
वपुःशुध्द्याऽस्तु तादृशः ॥

---

७ तदास्य दृढचर्याख्या क्रिया स्वसमयश्रुतम् ॥
निष्ठाप्य शृण्वतो ग्रन्थान्बाह्यानन्यांश्च कांश्चन ॥ १६ ॥

अर्थः—नंतर, स्वधर्माचें शास्त्र उत्तम प्रकारें समजून घेऊन; न्याय, व्याकरण वगैरे लौकिक ग्रंथांचाहि अभ्यास करणें याला 'दृढचर्या' ह्मणतात.

८ दृढव्रतस्य तस्यान्या क्रिया स्यादुपयोगिता ॥
पर्वोपवासपर्यन्ते प्रतिमायोगधारणम् ॥ १७ ॥

अर्थः—ज्याचीं व्रतें बळकट झालीं आहेत अशा त्या भव्यानें अष्टमी व चतुर्दशी पर्वानिमित्त उपवास करून त्या रात्रीं प्रतिमायोग धारण करणें याला "उपयोगिता" ह्मणतात.

जात्या हीनोऽपि कालादि- ।
लब्धौ ह्यात्माऽस्ति धर्मभाक् ॥ २२ ॥

**टीका**—अस्तु भवतु । कोऽसौ शूद्रोऽपि । किंविशिष्टस्तादृशो जिनधर्मश्रुतेर्योग्यः । किंविशिष्टः सन् उपस्करः आसनाद्युपकरणं आचारः मद्यादिविरतिः वपुः शरीरं तेषां त्रयाणां शुध्या पवित्रतया विशिष्टः । कुत इत्याह जात्येत्यादि– हि यस्मादास्ति भवति । कोऽसौ आत्मा जीवः । किंविशिष्टो धर्मभाक् श्रावकधर्माराधकः । कस्यां सत्यां कालादिलब्धौ कालादीनां कालदेशादीनां लब्धौ धर्माराधनयोग्यतायां सत्यां । किंविशिष्टोऽपि हीनो रिक्तोऽल्पो वा किं पुनरुत्कृष्टो मध्यमो वेत्यपिशब्दार्थः । कया जात्या वर्णसम्भूत्या । वर्णलक्षणमार्षे यथा– जातिगोत्रादिकर्माणि शुक्लध्यानस्य हेतवः । येषु ते स्युस्त्रयोवर्णाः शेषाः शूद्राः प्रकीर्तिताः ॥ १ ॥

**अर्थः**—**आसन, आचमन वगैरे विधि, मद्य वगैरेचा त्यागरूप आचार व देह हे ज्याचे शुद्ध आहेत असा शूद्रहि ब्राह्मण वगैरे वर्णाप्रमाणें श्रावकाचार पाळण्यास योग्य आहे. कारण, काल वगैरे लब्धि प्राप्त झाली ह्मणजे जातीनें हीन असाहि आत्मा श्रावक**

---

१ जातिगोत्रादिकर्माणि शुक्लध्यानस्य हेतवः ॥
येषु ते स्युस्त्रयो वर्णाः शेषाः शूद्राः प्रकीर्तिताः ॥ १ ॥

अर्थः—शुक्लध्यानास कारण अशीं उत्तम जाति, उत्तम गोत्र इत्यादि कर्मे ज्यांत असतात असे तीन वर्ण आहेत. ते हे;-ब्राह्मण क्षत्रिय व वैश्य. बाकीच्या वर्णास शूद्र ह्मणतात. कारण, त्यांत जाति, कुळ वगैरे शुद्ध असत नाहींत.

णाचा अधिकारी होतो. (पण, त्याला निर्ग्रंथ दीक्षा घेण्याचा अधिकार नाहीं.)

इत्थमानृशंस्यममृषाभाषित्वं परस्वनिवृत्तिरिच्छानियमो निषिद्धासु च स्त्रीषु ब्रह्मचर्यमिति सर्वसाधारणधर्ममभिधायेदानीमध्ययनं यजनं दानं ब्राह्मणक्षत्रियविशां समानो धर्मोऽध्यापनयाजनप्रतिग्रहाश्च ब्राह्मणानामेवेति विशेषतस्तद्याख्यानार्थमुत्तरप्रबन्धमुपक्रममाणो यजनादिविधानाय पाक्षिकं तावदेवं नियुंक्ते--

आतां, पाक्षिक श्रावकास देवपूजा वगैरे क्रिया करण्यास सांगतात.

**यजेत देवं सेवेत गुरून् पात्राणि तर्पयेत् ॥**
**कर्म धर्म्यं यशस्यं च यथालोकं सदा चरेत् ॥२३॥**

टीका—यजेत् पूजयेत् । कोऽसौ श्रावकः । कं देवं दीव्यते स्तूयते इन्द्रादिभिरिति देवः परमात्मा तं । तथा सेवेत उपासीत । कोऽसौ श्रावकः । कान् गुरून् । धर्माचार्यादीन् । तथा तर्पयेत् प्रीणयेत् । कोऽसौ श्रावकः । कानि पात्राणि संपूज्यमानमोक्षकारणगुणान् । तथा आचरेत् अनुतिष्ठेत् । कोऽसौ श्रावकः । अथः-- कर्म भृत्वाऽऽश्रितानित्यादिना वक्ष्यमाणं । किंविशिष्टं ध. व्याक्याप्रधानत्वाद्धर्मादनपेतं न केवलं धर्म्यं यशस्यं च धर्म्यं तावदवश्यमाचरणीयं तच्चेत्कीर्त्यर्थं स्यात्तदा सुतरां भद्रकमित्ययमर्थश्चशब्देनाचीयते । अनुक्तसमुच्चये वाऽत्र चः । तेनायुष्यं च कर्म ब्राह्ममुहूर्तोत्थानशरीरचिन्तादन्तधावनादिकमायुर्वेदप्रसिद्धमाचरेदिति लभ्यते । कथं यथालोकं लोकस्यानतिक्रमेण लोकानुसारेणेत्यर्थः । यो य आलोक आप्तोपदेशप्रकाशस्तेन तेन तत्तत्कर्माचरेदिति ग्राह्यम् । कथं सदा नित्यम् ॥

अर्थः—देव ह्मणजे इंद्रादिकांनीं पूज्य असा जो परमात्मा वीतराग जिनेश्वर, त्याची पूजा करावी. धर्माचार्य वगैरे दिगंबर मुनींची सेवा करावी. मोक्षमार्गी प्रवृत्त असलेल्या कोणत्याहि मतीच्या पात्रास तृप्त करावें. जेणेंकरून दयामूलक धर्म व निर्मल कीर्ति वृद्धिंगत होतील अशीं कृत्यें करावींत व लोकांस ( सत्पुरुषांस ) संमत असें आचरण, अथवा यथालोक ह्मणजे आप्त जो जिनेश्वर त्याचा जो आलोक ह्मणजे वचनप्रकाश अर्थात् उपदेश त्यास अनुसरून आचरण ठेवावें. हीं वरील सर्वकृत्यें सर्वदा करावीं.

---

१ दानं पूजा जिनैः शीलमुपवासश्चतुर्विधः ॥
श्रावकाणां मतो धर्मः संसारारण्यपावकः ॥ १ ॥

अर्थः—दान, पूजा, शील व चार प्रकारचा उपवास इत्यादि प्रकारचा जो श्रावक धर्म, तो दुःखमय संसाररूपी अरण्यास जाळून टाकणारा अग्निच आहे.

आराध्यन्ते जिनेन्द्रा गुरुषु च विनतिर्धार्मिके प्रीतिरुच्चैः ।
पात्रेभ्यो दानमापन्निहतजनकृते तच्च कारुण्यबुध्या ॥
तत्वाभ्यासः स्वकीयव्रतरतिरमलं दर्शनं यत्र पूज्यं ।
तद्गार्हस्थ्यं बुधानामितरदिह पुनर्दुःखदो मोहपाशः ॥ २ ॥

अर्थः—जिनेंद्राची आराधना, गुरूंच्या ठायीं विनय, धार्मिक लोकांवर प्रेम, सत्पात्रीं दान, विपत्तीनें गांजलेल्या लोकांवर करुणा करून त्यांची विपत्ति दूर करणें, तत्वज्ञानाचा अभ्यास, आपणास कर्तव्य अशा व्रताच्या ठायीं आसक्ति व पवित्र सम्यग्दर्शन ह्या सगळ्या क्रिया ( कायिक; वाचिक, व मानसिक-

इतोऽष्टादशभिः पद्यैर्जिनपूजां प्रपञ्चयति—

येथून १८ श्लोकांनीं जिनपूजेचा विस्तार सांगतात.

यथाशक्ति यजेतार्हद्देवं नित्यमहादिभिः ॥
सङ्कल्पतोऽपि तं यष्टा भेकवत्स्वर्महीयते ॥२४॥

टीका—यजेत । कोऽसौ श्रावकः । कं अर्हद्देवं । कथं यथाशक्ति या या शक्तिस्तया । कैर्नित्यमहादिभिः वक्ष्यमाणैः । यतो महीयते पूज्यो भवति । कोऽसौ जीवः । किंविशिष्टो यष्टा ताच्छील्येन साधुत्वेन वा यजमानः । कं तं अर्हद्देवं । कस्मात्सङ्कल्पतोऽपि यजेऽहमर्हद्देवामिति चिन्तनात् । किं पुनः कायेन गन्धाक्षतादिभिर्वाचा च विचित्रस्तवनैरुपचरन्नित्यपिशब्दार्थः । क्व महीयतेऽसौ स्वः स्वर्गे महर्द्धिकदेवैः स्वामीति मत्वा पूज्यत इत्यर्थः । किंवत् भेकवत् राजगृहनगरे श्रेष्ठिचरो दर्दुरो यथा ॥

अर्थः—ज्याची जशी शक्ति असेल ती न झांकतां त्यानें अरहंत देवाची नित्यमह वगैरे पूजा करावी. नुसत्या संकल्पानेंहि ह्मणजे 'आतां आपण जिनपूजा करावी असा विचार मात्र मनांत आणून' जिनाची पू[illegible]रा जीव राजग्रह नगरांतील बेडकाप्रमाणें स्वर्गा[illegible] महर्द्धिक वगैरे साधारण देवांनीं पूजिला जातो. तात्पर्य,—ज्याअर्थी जिनपूजेचा नुसता संकल्प करून ह्मणजे मनानेंच जिनाची पूजा करून, स्वर्गांतील

---

क्रिया ) जेथें चालतात, तोच गृहस्थपणा विद्वानांस आवडतो. ह्या वरील क्रिया जेथें नाहींत तो गृहस्थपणा इहपरलोकीं दुःख देणारा केवळ मोहपाशच होय.

इंद्राचें पद तिर्यंच जीवास प्राप्त झालें, त्याअर्थी तिर्यं-चापेक्षांहि अधिक योग्यतेचा जो मनुष्य, त्यानें जर काया, वाचा, मनेंकरून अरहंत देवाची पूजा केली; तर त्यास त्याहीपेक्षां अधिक सुखाचा लाभ होणारच.

अथ नित्यमहमाह—

प्रोक्तो नित्यमहोऽन्वहं निजगृहान्नीतेन गन्धादिना
पूजा चैत्यगृहेऽर्हतः स्वविभवैश्चैत्यादिनिर्मापणम् ॥
भक्त्या ग्रामगृहादिशासनविधादानं त्रिसन्ध्याश्रया
सेवा स्वेऽपि गृहेऽर्चनं च यमिनां नित्यप्रदानानुगम्

टीका—प्रोक्तः प्रवचने कथितः । कोऽसौ नित्यमहः । किं पूजा । कस्यार्हतः । क्व चैत्यगृहे । केन गन्धादिना चन्दनाक्षतपुष्पादिना । किंविशिष्टेन नीतेन चैत्यालयं प्रापितेन । कस्मान्निजगृहात् । कथमन्वहं दिने दिने । तथा प्रोक्तो नित्यमहः । किं तत् चैत्यादिनिर्मापणं चैत्यचैत्यालयादिनिष्पादनं । कस्मात् स्वविभवात् निजधनविनियोगात् । तथा प्रोक्तो नित्यमहः । किं तत् ग्रामगृहादिशासनविधादानं ग्रामः संवसथः गृहं वेश्म आदिशब्दात्क्षेत्रहट्टादिपरिग्रहः । ग्रामगृहादेः दानादिकर्म जे [illegible] घया शासनविधानेन दानं । कया भक्त्या । तथा प्रोक्तो नित्यमहः । किं सेवा आराधना । कस्य अर्हतः । किंविशिष्टा त्रिसन्ध्याश्रया त्रैकालिकी । क्व गृहे । किंविशिष्टे स्वे निजे । अपिशब्दाच्चैत्यगृहे च । न केवलमर्हत्पूजादिकं नित्यमहः प्रोक्तः । अर्चनं च पूजा । केषां यमिनां संयतानां । किंविशिष्टं नित्यप्रदानानुगं अहरहःप्रकृष्टदानसम्बन्धि ॥

अर्थः— १ प्रतिदिवशीं आपल्या घरांतून गंध, पुष्प, अक्षता वगैरे पूजनसामग्री नेऊन चैत्यालयांत अरहंताचें पूजन करणें, २ स्वतां न्यायानें मिळविलेलें द्रव्य खर्च करून जिनमंदिर किंवा जिनबिंब भक्तीनें निर्माण करवून; तेथें नित्य पूजा चालण्याकरितां गांव, घर किंवा जमीन वगैरे उत्पन्नाचीं क्षेत्रें शासनविधीनें (सनदपत्र करून) देणें, ३ घरीं किंवा जिनमंदिरीं नित्य त्रिकाळ अरहंताची भक्ति करणें, ४ नित्य दिगंबर मुनींस आहार वगैरे दान देऊन त्यांची पूजा करणें हे सगळे नित्यमह होत.

अथाष्टान्हिकैन्द्रध्वजौ लक्षयति—

जिनार्चा क्रियते भव्यै- ।
र्या नन्दीश्वरपर्वणि ॥
अष्टाह्निकोऽसौ सेन्द्राद्यैः ।
साध्या त्विन्द्रध्वजो महः ॥ २६ ॥

टीका—प्रोक्तः सूरिभिः । कोऽसावसौ महः । किमाख्यः आष्टान्हिकः । या किं या क्रियते काऽसौ जिनार्चा अर्हत्पूजा । कैर्भव्यैर्भावुकैर्भव्यात् सम्भूयकरणज्ञापनार्थं बहुवचनं । क नन्दीश्वरपर्वणि प्रतिवर्षमाषाढकार्तिकफाल्गुनसितपक्षेष्वष्टम्यादिदिनाष्टके । तथा प्रोक्तः । कोऽसौ इन्द्रध्वजाख्यो महः । काऽसौ सा जिनार्चा । किंविशिष्टा साध्या क्रियमाणा । कैरिंद्राद्यैः इन्द्रप्रतीन्द्रसामानिकादिभिः । तुर्विशेषे ॥

अर्थः—नंदीश्वरपर्वांत ह्मणजे आषाढ, कार्तिक व फाल्गुन या तीन मासांच्या शुद्धपक्षीं अष्टमीपासून पौर्णि-

मेपर्यंत पुष्कळ भाविक जन मिळून जी जिनपूजा करितात, तिला अष्टाह्निक मह ह्मणतात. आणि इंद्र, प्रतींद्र व सामानिक वगैरे देव मिळून जी जिनपूजा करितात, तिचें नांव इंद्रध्वजमह होय.

अथ महामहं निर्दिशति—

भक्त्या मकुटबद्धैर्या ।
जिनपूजा विधीयते ॥
तदाख्या सर्वतोभद्र- ।
चतुर्मुखमहामहाः ॥ २७ ॥

टीका—भवन्ति । कास्तदाख्याः तस्या जिनपूजाया आख्या नामानि । किं किं सर्वतोभद्र इति चतुर्मुख इति महामह इति च तिस्रोऽन्वर्थाः । तत्र सर्वत्र प्राणिवृन्दे कल्याणकरणात्सर्वतोभद्रः । चतुर्मुखमण्डपे विधीयमानत्वाच्चतुर्मुखः । अष्टान्हिकापेक्षया गुरुत्वान्महामहः । या किं जिनपूजा विधीयते । कैर्मकुटबद्धैर्मकुटानि बद्धानि सामन्तादिभिर्येषां ते मकुटबद्धा मण्डलेश्वरास्तैः कया भक्त्या न तु चक्रवर्त्यादिभयादिना । एषा अपि कल्पवृक्षवत् । केवलमत्र प्रतिनियतजनपदविषयं दानादिकम् ॥

अर्थः—मकुटबद्ध ह्मणजे मांडलिक राजे मिळून भक्तीनें ( चक्रवर्तींची आज्ञा पाळण्याकरितां नसून केवळ भक्तीनेंच ) जी जिनपूजा करितात; तिला १ सर्वतोभद्र, २ चतुर्मुख व ३ महामह अशीं तीन नांवें आहेत. प्राणिमात्रांचें कल्याण करणारा ह्मणून सर्वतोभद्र, चतुर्मुख मंडपांत तो केला जातो ह्मणून चतुर्मुख व अष्टान्हिकापेक्षांहि मोठा ह्मणून महामह.

अथ कल्पवृक्षमहमाह—

किमिच्छकेन दानेन ।
जगदाशाः प्रपूर्य यः ॥
चक्रिभिः क्रियते सोऽर्ह- ।
द्यज्ञः कल्पद्रुमो मतः ॥ २८ ॥

**टीका**—मतः पूर्वाचार्यैः सम्मतः। कोऽसौ सोऽर्हद्यज्ञः। किमाख्यः कल्पद्रुमः कल्पवृक्षनामा। यः किं यः क्रियते। कैश्चक्रिभिः सम्राड्भिः। किं कृत्वा प्रपूर्य प्रकर्षेण पूरयित्वा। काः जगदाशाः लोकानां मनोरथान्। केन दानेन त्यागेन। किंविशिष्टेन किमिच्छकेन किमिच्छसीति प्रश्नपूर्वकं याचकेच्छानुरूपं क्रियमाणेन ॥

**अर्थः**—याचकांच्या इच्छेप्रमाणें दान देऊन जगाची आशा पूर्ण करून चक्रवर्ती राजाकडून जी अरहंताची पूजा केली जाते, त्याला कल्पद्रुम मह ह्मणतात.

सम्प्रति बलिस्नपनादिजिनपूजाविशेषाणां नित्यमहादिष्वेवान्तर्भावमाह—

बलिस्नपननाट्यादि ।
नित्यं नैमित्तिकं च यत् ॥
भक्त्या कुर्वन्ति तेष्वेव ।
तद्यथास्वं विकल्पयेत् ॥ २९ ॥

**टीका**:— विकल्पयेत् नित्यमहादीनामेव भेदमाचक्षीत विद्वान्। किं तत् तत्। केषु तेष्वेव नित्यमहादिषु। कथं यथास्वं यथायोग्यं। यत्किं यत्कुर्वन्ति निर्वर्तयन्ति। के ते भक्ता भक्तिमन्तः

किं तत् बलिस्नपननाट्यादि बलिरूपहारः स्नपनमभिषेकः नाट्यं गीतनृत्यवाद्यं। आदिशब्दात्प्रतिष्ठारथयात्रादि। किंविशिष्टं नित्यं प्रत्यहविधेयं! तथा नैमित्तिकं पर्वकर्तव्यम्॥

अर्थ;—बलि ( पूजासाहित्य ), अभिषेक, नृत्य, वाद्य, प्रतिष्ठा, रथयात्रा वगैरे ज्या नित्य व कांहीं पर्वकालांच्या निमित्तानें भाविकजन पूजा करितात, त्या सर्वांचा समावेश वर सांगितलेल्या प्रकारांतच करावा.

इदानीं जलादिपूजानां प्रत्येकं फलमालपति—

आतां, जल वगैरे द्रव्यांनीं केल्या जाणाऱ्या प्रत्येक पूजेचें फळ संक्षेपानें सांगतात.

वार्धारा रजसः शमाय पदयोः सम्यक्प्रयुक्ता
ऽर्हतः। सद्गन्धस्तनुसौरभाय विभवाच्छेदाय
सन्त्यक्षताः॥ यष्टुः स्रग्दिविजस्रजे चरुरुमा-
स्वाम्याय दीपस्त्विषे॥ धूपो विश्वदृगुत्सवाय
फलमिष्टार्थाय चार्घाय सः॥ ३०॥

टीका— भवति। काऽसौ वार्धारा वारो जलस्य धारा-स्रुतिः। कस्मै शमाय अनुद्रेकाय। कस्य रजसः पापस्य ज्ञानदृगावरणकर्मणोर्वा॥ कस्य यष्टुरात्मनः पूजयितुः। किंविशिष्टा सती प्रयुक्ता सम्पादिता। कयोः पदयोश्चरणयोः। कस्य अर्हतो जिनेन्द्रस्य। कथं सम्यक् यथोक्तविधानेन। तथा भवति कोऽसौ सद्गन्धः श्रीचन्दनद्रवः। कस्मै तनुसौरभाय शरीरसौगन्ध्यनिमित्तम्। कस्य यष्टुः। किंविशिष्टः सन् अर्हतः पदयोः सम्यक् प्रयुक्तः। तथा सन्ति भवन्ति। के

अक्षताः अखण्डतण्डुलाः । कस्मै विभवाच्छेदाय विभवस्याणिमादिविभूतेर्द्रविणस्य वाऽच्छेदो निरन्तरप्रवृत्तिस्तदर्थं । शेषं पूर्ववत् । तथा भवति कोऽसौ स्रक् पुष्पमाला । कस्यै दिविजस्रजे स्वर्गजन्ममन्दारमालार्थं । तथा भवति । कोऽसौ चरुः नैवेद्यं । कस्मै उमास्वाम्याय लक्ष्मीपतित्वार्थं । तथा भवति । कोऽसौ दीपः आरार्तिकं । कस्यै त्विषे दीप्त्यर्थं । तथा भवति कोऽसौ धूपः । किंविशिष्टः अर्हतः पदयोः सम्यक्प्रयुक्तः । कस्मै विश्वदृगुत्सवाय यष्टुः परमसौभाग्यार्थं । तथा भवति । किं तत् फलं बीजपूरादि । कस्मै इष्टार्थायाभिमतवस्तुप्राप्त्यर्थं । तथा भवति । कोऽसौ सः श्रुतत्वादर्घः पुष्पाञ्जलिरित्यर्थः । कस्मै भवत्यर्घाय पूजाविशेषार्थं । अथवा स इत्यनेन पूर्वोक्त इष्टार्थ एव परामृश्यते तेनायमर्थः कथ्यते । यद्यद्यष्टुरात्मनोऽभिमतं वस्तु गीतादिकं तेन जिने सम्यक्प्रयुक्ते तत्तद्विशिष्टगीतादिवस्तुनोऽर्घाय मूल्याय स्यात्तत्सम्पादयतीत्यर्थः ॥

**अर्थः**—अरहंत परमेश्वराच्या पदकमलांच्या ठायीं शुद्धभावानें स्वतां अर्पिली जाणारी जलधारा पूजकाच्या ज्ञानावरण व दर्शनावरण कर्मरजाचा उपशम करिते. गंध अर्पण करणारास अन्यजन्मीं सुगंध देह, अखंडतंडुलांच्या पूजेनें पूजकास निरंतरचें ऐश्वर्य, पुष्पमाळा अर्पण करणारास स्वर्गीं मंदारपुष्पांची माळा, चरुपूजेनें लक्ष्मीचें स्वामित्व, दीपपूजेनें तेजास्विता, धूपानें सुखसंपत्ति, फलानें इच्छित पदार्थांचा लाभ, पुष्पांजलीनें व अर्घ्यानें पूज्यता अशीं फळें क्रमानें प्राप्त होतात.

अथ जिनेज्यायाः सम्यक्प्रयोगविध्युपदेशपुरस्सरं लोकोत्तरं फलविशेषमाविष्करोति—

आतां, पूजेचा उत्तमविधि व त्यापासून प्राप्त होणारें लोकोत्तर फल वर्णितात.

चैत्यादौ न्यस्य शुद्धे निरुपरमनिरौपम्यत-
त्तद्गुणौघ- । श्रद्धानात्सोऽयमर्हन्निति जिनम-
नघैस्तद्विधोपाधिसिद्धैः ॥ नीराद्यैश्चारुका-
व्यस्फुरदनणुगुणग्रामरज्यन्मनोभि- । र्भव्यो
ऽर्चन् दृग्विशुद्धिं प्रबलयतु यया कल्पते
तत्पदाय ॥ २१ ॥

टीका— प्रबलयतु प्रबलां प्रकृष्टस्वफलदानसमर्थां करोतु । कोऽसौ भव्यो भाक्तिकः । कां दृग्विशुद्धिं शङ्कादिदोषरहिततत्त्वश्रद्धानं । किं कुर्वन्नर्चन् पूजयन् । कं जिनं कैर्नीराद्यैः जलगन्धाक्षतादिभिः । किंविशिष्टैरनघैः हठहृतत्वाहृद्यत्वखान्यभुक्तशेषत्वादिपापहेतुदोषमुक्तैः । पुनः किंविशिष्टैः तद्विधोपाधिसिद्धैः निष्पापसाधननिष्पन्नैः । पुनरपि किंविशिष्टैः चार्विल्यादि— चारूणि दोषनिरासाद्गुणालङ्कारस्वीकाराच्च सहृदयहृदयावर्जकानि काव्यानि लोकोत्तरवर्णनारमणीयगद्यपद्यवाङ्मयानि । अनणुगुणग्रामा अनणूनां महतां गुरूणां गुणानां निसर्गनिर्मलत्वसौरभ्यातिशयादीनां ग्रामाः सङ्घाताः चारुकाव्यैः स्फुरन्तो भावुकलोकचित्तेषु चमत्कुर्वन्तोऽनणुगुणग्रामास्तै रज्यन्ति म्रियमाणानि मनांसि येषु तानि तैः । किं कृत्वा अर्चन् न्यस्य सोऽयमर्हन्निति उत्सर्पणावसर्पणतृतीयचतुर्थकालयोर्यश्चतुस्त्रिंशदतिशयसमेतः समवसृतावष्टमहाप्रातिहार्यविराजितस्तत्त्वोपदेशेन भव्यलोकं पुनीतवान् सोऽर्हन्नेवायमिति नामस्थापनाद्रव्यभावैः स्थापयित्वा । कं जिनं क्व चैत्यादौ चैत्ये प्रतिमायां ।

आदिशब्देन तदलाभे जिनाकाररहितेऽप्यक्षतादौ । किंविशिष्टे शुद्धे निर्दोषे रुद्राकाररहिते इत्यर्थः । कस्मान्निरित्यादि । निरुपरमा अविनश्वरा निरौपम्या असाधारणास्तत्तद्गुणा व्यवहारेण दर्शनविशुध्द्यादिभावनाप्रमुखकल्याणपञ्चकलक्षणा निश्चयेन चिदचिद्ज्ञेयद्रव्याकारविशेषस्वरूपास्तेषामोघे समूहे श्रद्धानं रुचिरतरोऽनुरागस्तस्मात् । इत्थं तां दृग्विशुद्धिं प्रबलयतु भव्यो यया दृग्विशुध्द्या प्रबलीकृतया । कल्पते सम्पद्यते भव्यः । कस्मै तत्पदाय तीर्थकरत्वाय । एकस्या अपि दृग्विशुद्धेरुत्कर्षस्य तीर्थकरत्वाख्यपुण्यविशेषबन्धहेतुत्वप्रसिद्धेः ॥

अर्थः—शुद्ध ह्मणजे शास्त्रोक्त विधीनें निर्मिलेली अर्थात् रौद्र वगैरे आकार नसून वीतरागमुद्रा जिची आहे अशी जिनप्रतिमा अथवा प्रसंगीं ती नसल्यास निर्मळ तंडुल मंत्रविधीनें स्थापना करून; कधींच नाश न होणारे व निरुपम असे जे अरहंताचे ते ते गुण, त्यांवर श्रद्धा ठेऊन तोच हा अरहंत येथें प्रत्यक्ष आहे अशी त्या जिनबिंबाच्या ठिकाणीं किंवा तंडुलाच्या ठिकाणीं कल्पना करून; पापरहित साधनांनीं मिळविलेल्या निर्मल अशा जल, गंध वगैरे द्रव्यांनीं व चारु ह्मणजे ज्यांत दोष नसून उपमा वगैरे अलंकारांनीं जिनेश्वराचे फार मोठे असे गुण वर्णिले आहेत व ज्यांच्या श्रवणानें भाविक लोकांचें अंतःकरण तुष्ट होतें अशा मनोहर काव्यांचा ( मंत्र श्लोकांचा ) गंभीर व मधुर शब्दानें उच्चार करीत त्या त्या जिनाची पूजा करणारा भव्य आपलें विशुद्ध सम्यग्दर्शन प्रबल ह्मणजे उत्कृष्ट फल देण्यास समर्थ करो. कारण, नुसतें सम्यग्दर्शनच जरी शुद्ध ह्मणजे शंकादि दोषांनीं रहित असलें,

तरी भव्यास तीर्थंकरत्व प्राप्त होण्याच्या पुण्याचा बंध होतो, तात्पर्यः- जिनपूजा करणारा श्रावक शुद्ध सम्यग्दृष्टि असल्यास; त्याला इतरांपेक्षां विशेष प्रकारचें फळ प्राप्त होतें.

अधुना व्रतभूषितस्य जिनयष्टुरिष्टफलविशेषमाभिधत्ते—

आतां अहिंसा वगैरे अणुव्रतें पाळणाऱ्या जिनपूजकास प्राप्त होणाऱ्या विशेष फलाचें वर्णन करितात.

**दृक्पूतमपि यष्टारमर्हतोऽभ्युदयश्रियः ॥**
**श्रयन्त्यहम्पूर्विकया किं पुनर्व्रतभूषितम् ॥ ३२ ॥**

टीका—श्रयन्ति आश्रयन्ति। का अभ्युदयश्रियः पूजार्थाज्ञैश्वर्यविशिष्टबलपरिजनकामभोगसम्पदः । कं यष्टारं पूजकं । कस्य अर्हतः। किंविशिष्टं दृक्पूतमपि सम्यक्त्वविशुद्धं। अपिर्विस्मये। कया अहम्पूर्विकया अहं पूर्वमहं पूर्वमित्यहम्पूर्विका तया अहंप्रथमिकया। किंपुनर्विशेषात् श्रयन्ति। का अभ्युदयश्रियः। कं अर्हतो यष्टारं। किंविशिष्टं व्रतैर्देशतो हिंसादिविरतिलक्षणैर्भूषितमलंकृतम् ॥

अर्थः—नुसत्या सम्यग्दर्शनानेंच शुद्ध अशा अर्हत्पूजकांस पूजा, आज्ञा, ऐश्वर्य, बल, परिवार इत्यादि संपत्ति मी पुढें तूं पुढें अशी त्वरा करून प्राप्त होतात. मग, सम्यग्दर्शनानें पवित्र व अहिंसादि व्रतें हेच कोणी अलंकार यांहींकरून भूषित असा जिनपूजक असल्यावर काय विचारावें? ह्मणजे त्याच्या संपत्तीस तर पारावार नाहीं!

जिनपूजान्तरायपरिहारोपायविधिमाह—

आतां; जिनपूजेस विघ्न न येण्याचा उपाय सांगतात.

यथास्वं दानमानाद्यैः ।
सुखीकृत्य विधर्मणः ॥
सधर्मणः स्वसात्कृत्य ।
सिध्द्यर्थी यजतां जिनम् ॥ ३३ ॥

टीका—यजतां पूजयतु । कोऽसौ सिध्यर्थी जिनपूजासम्पूर्णतां स्वात्मोपलब्धिं वा अभीप्सुः । कं जिनं । किं कृत्वा स्वसात्कृत्य स्वाधीनान् कृत्वा । कान् सधर्मणः जिनधर्मभावितान् । किं कृत्वा सुखीकृत्य अनुकूलान् कृत्वा । कान् विधर्मणः शिवादिधर्मरतान् सर्वधर्मबाह्यान् वा । कैः यथास्वं यथायोग्यं । दानमानाद्यैः अर्थविनियोगसत्काराभ्युत्थानासनप्रदानादिभिरावर्जनोपायैः ॥

अर्थ—निर्विघ्नपणें पूजा व्हावी अशी ज्याला इच्छा आहे; अथवा, मोक्षाभिलाषी जो आहे; त्यानें, विधर्मी लोकांस यथायोग्य दान सन्मान वगैरे करून व आपले धर्माचे लोकांस अनुकूल करून घेऊन; नंतर जिनपूजा करावी.

स्नानापास्तदोषस्यैव गृहस्थस्य स्वयं जिनयजनेऽधिकारित्वमन्यस्य पुनस्तथाविधेनैवान्येन तद्याजन इत्युपदेशार्थमाह—

आतां; स्नानानें देह शुद्ध करून स्वतः जिनपूजा करावी, इतरांकडून करविल्यास, तोहि स्नानानें पवित्र झालेला असावा हें सांगतात.

---

१ नित्यं स्नानं गृहस्थस्य देवार्चनपरिग्रहे ॥
यतेस्तु दुर्जनस्पर्शात्स्नानमन्यद्विगर्हितम् ॥ १ ॥

अर्थ—जिनपूजा करणाऱ्या गृहस्थानें नित्य स्नान करावें. यती म्हणजे मुनी जो आहे, त्यानें, दुर्जन म्हणजे ज्यांना स्पर्श

स्त्र्यारम्भसेवासंक्लिष्टः ।
स्नात्वाऽऽकण्ठमथाशिरः ॥
स्वयं यजेतार्हत्पादा- ।
नस्नातोऽन्येन याजयेत् ॥ ३४ ॥

---

करूं नये अशा लोकांचा स्पर्श झाल्यास स्नान करावें. यतीनें दुर्जनस्पर्शाशिवाय इतर कारणावरून स्नान करणें निंद्य होय.

वातातपादिसंस्पृष्टे भूरितोये जलाशये ॥
अवगाह्याचरेत्स्नानमतोऽन्यद्गालितं भजेत् ॥ २ ॥

अर्थः— ज्या नद्या, तळीं किंवा विहिरीच्या पाण्यांत आपण स्नान करावयाचें; तें पाणी स्नानाच्या वेळीं उन्हानें तापलेलें असावें आणि त्यावर वारा खेळत असावा. अशा पाण्यांत बुडी मारून स्नान करावें तसें नसल्यास वस्त्रानें पाणी शोधून त्यानें स्नान करावें.

पादजानुकटिग्रीवाशिरःपर्यन्तसंश्रयम् ॥
स्नानं पञ्चविधं ज्ञेयं यथादोषं शरीरिणाम् ॥ ३ ॥

अर्थः—नुसते पाय धुणें, गुडघ्यापर्यंत पाय धुणें, कमरेपर्यंत अंग धुणें; कंठापर्यंत अंग धुणें आणि मस्तकावरून स्नान करणें याप्रमाणें स्नान पांच प्रकारचें आहे. तेव्हां, त्या त्या दोषास उचित असें स्नान संसारी प्राण्यानें करीत असावें.

ब्रह्मचर्योपपन्नस्य निवृत्तारम्भकर्मणः ॥
यद्वातद्वा भवेत्स्नानमन्त्यमन्यस्य तु द्वयम् ॥ ४ ॥

अर्थः—जो ब्रह्मचारी आहे आणि ज्यानें प्रपंचासंबंधी उद्योग धंदे सोडिले आहेत, त्याचें स्नान जितक्यास तितकेंच असतें.

**टीका**—यजेत् पूजयेत् । कोऽसौ भाक्तिको गृही । कानर्हत्पादान् जिनचरणान् । केन स्वयमात्मना । किं कृत्वा स्नात्वा शौचं कृत्वा । कथमाकण्ठं कण्ठावधि । अथ अथवा । आशिरः मस्तकावधि । यथादोषं जलेन शुचीभूयेत्यर्थः । किंविशिष्टः सन् स्त्र्यादीति स्त्रीसेवया कृष्यादिकर्मसेवया च । संक्लिष्टः समन्तात्काये मनसि चोपतप्तः । प्रस्वेदतन्द्रालस्यदौर्मनस्यादिदोषदूषितकायमनस्क इत्यर्थः । सोऽस्नातः किं कुर्यादित्याह— याजयेत्पूजया संयोजयेत् । कोऽसौ अस्नातस्तथाविधो गृही । कानर्हत्पादान् । केन कर्त्राऽन्येन स्नातेन सब्रह्मचारिसतीर्थ्यसधर्मकादिना ॥

---

पण ज्याला स्त्री आहे आणि जो कृषी वगैरे उद्योग करितो, त्यानें मात्र आकंठ किंवा मस्तकावरून स्नान करावें.

सर्वारम्भविजृम्भस्य ब्रह्मजिह्मस्य देहिनः ॥
अविधाय बहिःशुद्धिं नासोपास्त्यधिकारिता ॥ ५ ॥

**अर्थः**—जो प्रपंचासंबंधी सर्व उद्योग धंदे करितो आणि ज्याला स्त्री आहे, त्याचें अंतरंग जरी शुद्ध असलें; तरी बाह्य शुद्धीवाचून अर्थात् स्नान केल्यावाचून जिनपूजा करण्याचा त्याला अधिकार नाहीं.

आप्लुतः सम्प्लुतश्चान्तः शुचिवासोविभूषितः ॥
मौनसंयमसम्पन्नः कुर्याद्देवार्चनाविधिम् ॥ ६ ॥

**अर्थः**—प्रथम शुद्ध जलानें स्नान करून, नंतर मंत्रपूर्वक आचमनानें अंतःशुद्धि करून व शुद्धवस्त्रानें सुशोभित होऊन; आणि मग मौन धारण करून व चित्त स्वाधीन ठेऊन देवपूजेचा विधि करावा.

दन्तधावनशुद्धास्यो मुखवासोवृताननः ॥

अर्थः---स्त्रीसंग व उदरनिर्वाहाचे उद्योग करून थकलेला जो पार्यंचिक मनुष्य; त्यानें कंठापर्यंत किंवा मस्तकावरूनहि स्नान करून शुद्ध होऊन; नंतर स्वहस्तें जिनेंद्राची पूजा करावी. स्नान झालें नसल्यास, जो स्नानानें शुद्ध झाला आहे अशा इतर श्रावकाकडून पूजा करवावी.

चैत्यादिनिर्माणस्य फलविशेषसमर्थनया विधेयतामभिधत्ते—

आतां; जिनचैत्यालय वगैरे निर्माण करविण्यांतहि विशेष पुण्य असल्याचें सांगतात.

निर्माप्यं जिनचैत्यतद्गृहमठस्वाध्यायशालादिकं ।
श्रद्धाशक्त्यनुरूपमास्ति महते धर्मानुबन्धाय यत् ॥
हिंसारम्भविवर्तिनां हि गृहिणां तत्तादृगालम्बन- ।
प्रागल्भीलसदाभिमानिकरसं स्यात्पुण्यचिन्मानसम् ॥

टीका— निर्माप्यं कारापणीयं । किं तत् तज्जिनचैत्यादि । कैः पाक्षिकश्रावकैः । किंविशिष्टं श्रद्धाशक्त्यनुरूपं रुच्या सामर्थ्येन च सदृशं । यत्किं यदस्ति भवति । कस्मै धर्मानुबन्धाय धर्मस्यानुबन्धोऽलब्धलाभो लब्धपरिरक्षणं रक्षितवर्धनमित्येवमात्मकस्तस्मै । किंविशिष्टाय महते विपुलाय । एतेन चैत्यालयादिनिर्मापणे सावद्यदोषशङ्कानिरस्ता । यदाह तत्पापमपि न पापं यत्र महान् धर्मस-

---

असञ्ज्ञातान्यसंसर्गः सुधीर्देवानुपाचरेत् ॥ ७ ॥

अर्थः---प्रथम दांत घांसून मुख शुद्ध करून व मुखवस्त्रानें तोंड झांकून घेऊन आणि अशुचि मनुष्यांस किंवा अशुचि पदार्थास स्पर्श न करितां विद्वानानें देवाची पूजा करावी.

म्बन्ध इति ॥ हि यस्मात् । स्यात् भवेत् किं तत् मानसं मनः । किंविशिष्टं पुण्यचित् पुण्यं सुकृतं चिनोति वर्धयति । अथवा पुण्या पवित्रा निर्मला चित् संवित्तिर्यस्य तत्पुण्यचित् । केषां गृहिणां गृहस्थानां । किंविशिष्टानां हिंसारम्भविवर्तिनां हिंसाप्रायः आरभः कृष्यादिः तत्र विवर्तन्ते विविधं परिणमन्तेऽभीक्ष्णमिति तद्विवर्तिनस्तेषां । किंविशिष्टं तत् तदित्यादि ताज्जिनचैत्यचैत्यालयादि तादृक्तीर्थयात्रादि आलम्बनं दृग्विशुध्द्यङ्गं प्रागल्भी प्रौढिः आभिमानिकरसः अहङ्कारानुरक्तो हर्षः तच्च तादृक्क तत्तादृक् तच्च तदालम्बनं च तस्या प्रागल्भी तया लसन् द्योतमानः स्वसंवित्तिविषयभिवन् आभिमानिकरसो यस्मिन् तत् तथोक्तम् ॥

**अर्थः—पाक्षिक श्रावकानें आपल्या श्रद्धेला व शक्तीला अनुसरून जिनबिंब, जिनमंदिर, पाठशाला व स्वाध्यायशाला वगैरे निर्माण करावीं. तेणेंकरून फार मोठा असा**

---

यद्यप्यारम्भतो हिंसा हिंसायाः पापसम्भवः ॥
तथाऽप्यत्र कृतारम्भो महत्पुण्यं समश्नुते ॥ १ ॥

अर्थः—जरी आरंभापासून हिंसा घडते व हिंसेपासून पाप घडतें; तरी, जिनमंदिर, पाठशाला, स्वाध्यायशाला वगैरे बांधवितांनां आरंभ ( दगड, माती, पाणी, लांकडें वगैरेची घडामोड ) कराविणारा पुरुष महापुण्याचा अधिकारी होतो कारण, त्या मोठ्या पुण्यापुढें अल्पपापाचें काय चालणार?

निरालम्बनधर्मस्य स्थितिर्यस्मात्ततः सताम् ॥
मुक्तिप्रासादसोपानमाप्तैरुक्तो जिनालयः ॥ २ ॥

अर्थः—ज्याच्यावर सत्पुरुषाच्या सम्यग्दर्शनशुद्धि रूप धर्माची स्थिति अवलंबून आहे असें जें जिनमंदिर तें मोक्षरूपी प्रासाद चढण्याची पहिली पायरी होय. असें सर्वज्ञांनीं सांगितलें आहे.

धर्मानुबंध ( धर्मलाभ, धर्मरक्षण व धर्मवृद्धि. ) होतो; आणि हिंसा व आरंभ ह्मणजे कृषि वगैरे उदरनिर्वाहाचे उद्योग ह्यांच्यामध्यें अनेक परिणामास पावणारे जे गृहस्थ, त्यांचें मन,....तें जिनबिंब वगैरे व तादृक् ह्मणजे जिनयात्रा वगैरे आणि आलंबन ह्मणजे सम्यग्दर्शनाच्या शुध्दीचें अंग, यांच्या प्रौढीनें ज्यांत आभिमानिक ह्मणजे हर्ष किंवा आत्मज्ञान रूपी रस आहे असें व पुण्याचा संचय करणारें असें होतें. या श्लोकांत " महते " या पदानें ग्रंथकारांनीं असें दाखविलें आहे कीं, जिनमंदिर वगैरे बांधावितांना जरी हिंसेचा थोडासा दोप घडतो; तरी, त्यांत पुण्यबंध अधिक असल्यामुळें, दोपांचा परिहार होतो.

शास्त्रविदामपि प्रायः प्रतिमादर्शनेनैव देवादिसेवापरां मतिं कुर्वाणं कलिकालमपवदते---

आतां; बहुतकरून जिनप्रतिमेच्या दर्शनानेंच मनुष्यास जिनपूजेची इच्छा कराविणाऱ्या कलिकालास अपवाद देतात.

धिग्दुष्षमाकालरात्रिं ।
यत्र शास्त्रदृशामपि ॥
चैत्यालोकादृते न स्यात् ।
प्रायो देवविशा मतिः ॥३६॥

टीका---धिक् निन्दामीत्यर्थः । कां दुःषमाकालरात्रिं दुःषमा पञ्चमकालः कालरात्रिर्मरणनिशेव दुर्निवारमोहावहत्वात् । यत्र किं यस्यां न स्यात् । काऽसौ मतिरन्तःकरणप्रवृत्तिः । किंविशिष्टा देवविशा देवं परमात्मानं विशत्यनन्यशरणीभूय श्रयतीति किबन्तादजा-

द्यतष्टाप् । केषां शास्त्रदृशामपि । श्रुतचक्षुषामपि । कथं ऋते विना कस्मात् चैत्यालोकात् प्रतिमादर्शनात् । कथं प्रायो बाहुल्येन । केषाञ्चित् ज्ञानवैराग्यपराणां चैत्यदर्शनमन्तरेणापि मनः परमात्मानं संश्रयतीति भावः ॥

अर्थः—या पंचमकालरूपी कालरात्रीस ( मरण रात्रीस ) धिक्कार असो! कारण, या काळीं बहुतकरून ज्यांना शास्त्ररूपी नेत्र आहेत अशा पंडितांचीही बुद्धि प्रतिमेच्या दर्शनावांचून जिनभक्ति करण्यास प्रवृत्त होत नाही.

कलौ धर्मस्थितिः सम्यक्चैत्यालयमूलैवेत्यनुशास्ति——

या कलिकालांत जिनधर्माची उत्तमस्थिति चैत्यालयानेंच असणारी आहे हें सांगतात.

प्रतिष्ठायात्रादिव्यतिकरशुभस्वैरचरण- ।
स्फुरद्धर्मोद्धर्षप्रसररसपूरास्तरजसः ॥
कथं स्युः सागाराः श्रमणगणधर्माश्रमपदं ।
न यत्रार्हद्गेहं दलितकलिलीलाविलसितम् ३७

टीका—— तत्र नगरादौ कथं स्युः कथमपि न भवेयुरित्यर्थः । के ते सागारा गृहस्थाः । किंविशिष्टाः प्रतिष्ठेत्यादि आदिशब्दः पूजाभिषेकजागरणाद्यर्थः । व्यतिकरः प्रघट्टकः । स्वैरं स्वच्छन्दं । उद्धर्ष उत्सवः । प्रसरश्चिरावस्थायित्वं । रसः हर्षो जलं वा । रजः पापं रेणुश्च प्रतिष्ठायात्रादीनां व्यतिकरे शुभं प्रशस्तं पुण्यास्रवणकारणं स्वैरं चरणं मनोवाक्कायव्यापारस्तेन स्फुरँश्चासौ धर्मोद्धर्षस्तस्य प्रसरः स एव रसपूरो जलप्रवाहस्तेनास्तं स्फाटितं रजो येषां ते तथा । कथं स्युस्तत्र । यत्र किं यत्र न भवति । किं तत् अर्हद्गेहं जिनचैत्यालयः । किंविशिष्टं दलितं छिन्नं खण्डितं कलिलीलाविलसितं मठ-

पत्यादिदुर्णयो निरंकुशविजृम्भमाणसंक्लेशपरिणामो वा यत्र तद्दलित-कलिलीलाविलसितं । पुनः किंविशिष्टं श्रमणगणधर्माश्रमपदं श्रमणस्य यतिसङ्घस्य धर्मार्थमाश्रमपदं निवासस्थानम् ॥

अर्थः—ज्याच्या योगानें या कलिकालाच्या दुष्टलीलेचा विलास लयास जातो आणि जें मुनिजनांच्या धर्माचें निवासस्थान आहे असें जें जिनमंदिर, तें ज्या नगरांत किंवा गांवांत नाहीं; त्या ठिकाणीं वास करणारे गृहस्थ—प्रतिष्ठा, रथोत्सव, अभिषेक, जागरण वगैरे पुण्यकृत्यें करण्यांत स्वेच्छेप्रमाणें शुभाचरण करून, त्यामुळें स्फुरण पावणारा जो धर्मोत्सव, त्याचा प्रसार रूपी जलाच्या पूरानें ज्यांचें पातक धुवून गेलें आहे—असे कसे होतील? तात्पर्य, जेथें जिनमंदिर नाहीं तेथील गृहस्थांस पुण्यसंचय करण्यास मार्ग नाहीं.

कलौ वसतिविशेषं विना सतामप्यनवस्थितचित्तत्वं दर्शयति—

या कलिकालांत मठाची आवश्यकता दाखवितात.

मनो मठकठेराणां ।
वात्ययेवानवस्थया ॥
चेक्षिप्यमाणं नाद्यत्वे ।
क्रमते धर्मकर्मसु ॥ ३८ ॥

टीका—न क्रमते नोत्सहते । किं तन्मनः । केषां मठकठेराणां वसतिदरिद्राणामरण्यादिवासिनां यतीनामित्यर्थः । क्व धर्मकर्मसु धर्मार्थासु क्रियासु आवश्यकादिषु । कदा अद्यत्वे अस्मिन् काले । किं क्रियमाणं चेक्षिप्यमाणं भृशं पुनःपुनर्वा

चाल्यमानं । कया अनवस्थया परापररागादिविवर्तनपरिणत्त्या । कयेव वात्ययेव वातमण्डल्या तूल्यादिर्यथा ॥

**अर्थः—वायूनें कापूस जसा चंचल होतो त्याप्रमाणें परापर रागद्वेषादिविकारानें चंचल होणारें,—या पंचमकालांतील मठदरिद्र ह्मणजे ज्यांना रहावयास एकांत असें घर नाहीं अशा यतींचें—चित्त आवश्यकक्रियेविषयीं उत्सुक होत नाहीं.**

विमर्शस्थानं विना महोपाध्यायादीनामपि शास्त्रान्तस्तत्वज्ञानदौःस्थित्यं प्रथयति—

**आतां; पाठशाळेची आवश्यकता दाखवितात.**

**विनेयवद्विनेतॄणा- ।**
**मपि स्वाध्यायशालया ॥**
**विना विमर्शशून्या धी- ।**
**र्दृष्टेऽप्यन्धायतेऽध्वनि ॥ ३९ ॥**

टीका—अन्धायते अन्धमिवात्मानमाचरति तत्त्वं न पश्यतीत्यर्थः । काऽसौ धीर्बुद्धिः । केषां विनेतॄणामपि । केषामिव विनेयवत् शिष्याणां यथा । क्व अध्वनि मार्गे अर्थाच्छास्त्रे निःश्रेयसि वा । किंविशिष्टेऽपि दृष्टेऽपि अभ्यस्तेऽपि । किंविशिष्टा सती विमर्शशून्या अन्तस्तत्वक्षोदविधुरा । कथं विना । कया स्वाध्यायशालया पाठस्थानेन । ततश्चैत्यादिचतुष्टयं श्रेयोऽर्थं नियमेन कारयेदिति प्रतिपत्तव्यम् ॥

**अर्थः—पाठशाळा नसली ह्मणजे शिष्यांप्रमाणें उपाध्यायांचीहि ( शिक्षक ) बुद्धि शास्त्राचें तत्व नीट ओळ-**

खण्यास असमर्थ अशी होतसाती अभ्यास असलेल्याहि शास्त्रमार्गांत अंधाप्रमाणें होते. तात्पर्य, जिनबिंब, जिनमंदिर, मठ व पाठशाला हीं धनिकानें यथाशक्ति निर्माण करवावीं. तेणेंकरून धर्मवृद्धि होते.

सत्रातुरस्थानयोरनुकम्प्यप्राण्यनुग्रहबुध्या विधापनं बह्वारम्भरतानां गृहस्थानां जिनपूजार्थं पुष्पवाटिकादिनिर्मापणे दोषाभावं च प्रकाशयन्नाह—

आतां; सत्र, औषधालय व पुष्कळसा आरंभ ( कृषि वगैरे ) करणारांनीं जिनपूजेकारितां पुष्पवाटिका हीं निर्माण करावयास सांगतात.

सत्रमप्यनुकम्प्यानां ।
सृजेदनुजिघृक्षया ॥
चिकित्साशालवत् दुष्ये- ।
न्नेज्यायै वाटिकाद्यपि ॥ ४० ॥

टीका—सृजेन्निर्मापयेत्पाक्षिकः । किं तत् सत्रमन्नप्रदानस्थानं अपिशब्दात्प्रपां च । किंवत् चिकित्साशालवत् व्याधिप्रतीकारस्थानं यथा । कया अनुजिघृक्षया उपकर्तुमिच्छया । केषामनुकम्प्यानां कृपाविषयानां क्षुत्तृष्णार्तानां व्याधितानां च । तथा न दुष्येन्न दुष्टं भवेत् । किं तत् वाटिकादि आदिशब्दाद्वापीपुष्करिण्यादि । किमर्थमिज्यायै पूजार्थं । अपिशब्देनानादरार्थेन विषयसुखार्थं कृष्यादिकं कुर्वतां यद्यपि धर्मबुध्या वाटिकादिविधाने लोके व्यवहारानुरोधाद्दोषो न भवति । तथापि तदकुर्वतामेव क्रयक्रीतेन पुष्पादिना तेषामपि जिनं पूजयतां महान् गुणो भवतीति ज्ञाप्यते ॥

अर्थः—पाक्षिक श्रावकानें ज्यांची वृत्ति दयनीय झाली आहे ह्मणजे ज्यांच्यावर अवश्य दया केली पाहिजे अशा जीवांवर उपकार करण्याकरितां औषधालय बांधवावें; आणि त्याचप्रमाणें सत्र ( सदावर्त्त- भोजनशाला ) व पाणपोई हीं निर्माण करवावीं. जिनपूजेकरितां फुलांची बागहि लावण्यांत दोष नाहीं. ह्यावरून ज्याला कृषि करण्याचें इष्ट नाहीं त्यानें आयतीं विकावयास आलेलीं फुलें विकत घेऊन जिनपूजा करणें; हाहि मोठा गुण असल्याचें सिद्ध होतें.

निर्व्याजभक्त्या येन केनापि प्रकारेण जिनं सेवमानानां समस्तदुखोच्छेदमितस्ततः समस्तमीहितार्थसम्पत्तिं चोपदिशति—

आतां, निष्कपट भक्तीनें कोणत्याही प्रकारें जिनपूजा करणाऱ्याच्या सर्वदुःखांचा नाश होऊन त्याला संपूर्ण इष्टप्राप्ति होते असें सांगतात.

यथाकथञ्चिद्भजतां ।
जिनं निर्व्याजचेतसाम् ॥
नश्यन्ति सर्वदुःखानि ।
दिशः कामान्दुहन्ति च ॥ ४१ ॥

टीका—नश्यन्ति निवर्तन्ते । कानि सर्वदुःखानि शरीरमनस्तापाः । केषां निर्व्याजचेतसां निर्मायमनसां भाक्तिकानामित्यर्थः । किं कुर्वतां भजतां सेवमानानां । कं जिनं । कथं यथाकथञ्चित् येनकेनापि स्नपनपूजास्तवनादिप्रकारेण । तथा दुहन्ति प्रपूरयन्ति । का दिशः ककुभः । कान् कामान् मनोरथान् । यद्यत्कामयन्ते जिनयष्टारस्तत्तत्सर्वत्र लभन्ते इत्यर्थः ॥

**अर्थः**— स्नपन, भजन, पूजन वगैरे कोणत्याहि प्रकारें जिनास पूजणाऱ्या निष्कपट चित्ताच्या भक्ताचीं शारीरिक व मानसिक दुःखें सर्व लयास जातात; आणि त्यांचे इष्टार्थ पाहिजे त्या ठिकाणीं पूर्ण होतात.

एवं जिनपूजां विधेयतयोपादिश्य तद्वत्सिध्दादिपूजामपि विधेयतयोपदेष्टुमाह—

याप्रमाणें अर्हत्पूजा अवश्य केलीच पाहिजे हें सांगून, आतां त्याचप्रमाणें सिद्ध वगैरे परमेष्ठींचेंहि पूजन करावयास सांगतात.

जिनानिव यजन् सिध्दान्
साधून् धर्मं च नन्दति ॥
तेऽपि लोकोत्तमास्तद्व-
च्छरणं मङ्गलं च यत् ॥ ४२ ॥

**टीका**—नन्दति अन्तरङ्गबहिरङ्गविभूत्या संवर्धते । कोऽसौ जीवः । किं कुर्वन् यजन् पूजयन् । कान् सिध्दान् मुक्तात्मनः । तथा साधून् सिध्दिं साधयन्तीत्यन्वर्थनामानुसरणादाचार्योपाध्यायतीन् । न केवलं धर्मं च व्यवहारनिश्चयरूपं रत्नत्रयं । कानिव जिनानिव अर्हतो यथा । कुत इत्याह— यद्यस्मात् । वर्तन्ते । के ते अपि सिध्दसाधुधर्माः । किंविशिष्टाः लोकोत्तमाः लोकेषूत्कृष्टाः । तथा शरणमार्तिहरणमपायपरिरक्षणोपाया इत्यर्थः । तथा मङ्गलं पापापहाः पुण्यप्रदाश्च । किंवत् तद्वत् जिनवत् ।

**अर्थः**—जिनाप्रमाणेंच सिद्ध, साधु ( आचार्य, उपाध्याय व साधुमुनि ) आणि धर्म ह्यांची पूजा करणारा

प्राणी अन्यजन्मीं अंतरंग-बहिरंग-संपत्तीनें वृद्धीस पावतो. कारण, तेहि लोकश्रेष्ठ आणि जिनाप्रमाणेंच रक्षण करण्यास समर्थ व मंगल आहेत.

सकलपूज्यपूजाविधिप्रकाशनेनानुग्राहिकायाः सम्यक्श्रुतदेवतायाः पूजायां सज्जयन्नाह—

आतां श्रुतपूजा करावयास सांगतात.

यत्प्रसादान्न जातु स्यात् ।
पूज्यपूजाव्यतिक्रमः ॥
तां पूजयेज्जगत्पूज्यां ।
स्यात्कारोड्डमरां गिरम् ॥ ४२ ॥

टीका—पूजयेच्छ्रेयोऽर्थी यजेत । कां तां गिरं श्रुतदेवतां । किंविशिष्टां स्यात्कारोड्डमरां स्यात्पदप्रयोगेण सर्वथैकान्तवादिभिरजय्यां । पुनः किंविशिष्टां जगत्पूज्यां विश्वलोकानामच्यर्यां । यत्प्रसादात् यस्या अनुग्रहात् । न स्यात् न भवेत् । कोऽसौ पूज्यपूजाव्यतिक्रमः पूज्यानां अर्हत्सिध्दसाधुधर्माणां पूजायां व्यतिक्रमो यथोक्तविधिलंघनं । कथं जातु कदाचिदपि ॥

अर्थः— जिच्या प्रसादानें, पूज्य ह्मणजे अर्हत्सिद्ध वगैरे पंचपरमेष्ठी; त्यांची जी पूजा, ती करण्यांत शास्त्रोक्तविधीचें केव्हांहि उल्लंघन होत नाहीं; ह्मणजे जिच्या प्रसादानें पूजेचा विधि यथाशास्त्र कळतो, जी सर्व लोकांस पूज्य झालेली आहे; आणि स्यात्पदाच्या प्रयोगानें जी वादीलोकांकडून अजिंक्य झाली आहे अशा त्या श्रुतदेवीची अर्थात् जिनवाणीची पूजा करावी.

श्रुतपूजकाः परमार्थतो जिनपूजका एवेत्युपदिशति—

आतां श्रुतदेवीचे जे पूजक आहेत, ते तत्वदृष्टीनें पाहिले असतां जिनपूजकच होत; हें सांगतात.

ये यजन्ते श्रुतं भक्त्या ।
ते यजन्तेऽञ्जसा जिनम् ॥
न किञ्चिदन्तरं प्राहु- ।
राप्ता हि श्रुतदेवयोः ॥ ४४ ॥

टीका—यजन्ते पूजयन्ति । के ते पुमांसः । कं जिनं । केन अञ्जसा परमार्थेन। ये किं ये यजन्ते। किं तत् श्रुतं । कया भक्त्या हि यस्मात् । न प्राहुः न ब्रुवन्ति । के ते आप्ताः गुरवः । किं तत् अन्तरं भेदं । कयोः श्रुतदेवयोः प्रवचनपरमात्मनोः । कीदृशं किञ्चित् यदेव श्रुतं स एव देवो य एव च देवस्तदेव श्रुतमित्यर्थः ॥

अर्थः— जे लोक श्रुतदेवीस पूजितात ते खरोखर जिनासच पूजितात. कारण, श्रुत ह्मणजे शास्त्र आणि देव यांच्यामध्यें भेद नाहीं. ह्मणजे जें शास्त्र तोच देव, आणि जो देव तेंच शास्त्र. असें शास्त्रज्ञात्यांचें ह्मणणें आहे.

एवं देवपूजाविधिं संक्षेपेणोपदिश्य साक्षादुपकारकत्वेन गुरूणामुपासने नित्यं नियुङ्क्ते—

याप्रमाणें देवपूजेचा विधि संक्षेपानें सांगून, गुरुपूजाहि अवश्य करावी हें सांगतात.

उपास्या गुरवो नित्य- ।
मप्रमत्तैः शिवार्थिभिः ॥

तत्पक्षताक्ष्यपक्षान्त- ।

श्चरा विघ्नोरगोत्तराः ॥ ४५ ॥

**टीका**—उपास्याः सेव्याः । के ते गुरवः धर्माराधनायां प्रयोक्तारः । कैः शिवार्थिभिः परमकल्याणकामैः । किंविशिष्टैस्सद्भिरप्रमत्तैः प्रमादरहितैः । कथं नित्यं शश्वत् । यतो भवन्ति । के ते तत्पक्षताक्ष्यपक्षान्तश्चराः तेषां गुरूणां पक्षस्तदायत्ततया वृत्तिः स एव ताक्ष्यपक्षो गरुडपतत्रं तत्रान्तर्मध्ये चरन्ति तदन्तश्चराः । किंविशिष्टा भवन्ति । विघ्नोरगोत्तराः विघ्नाः प्रक्रमाद्धर्मानुष्ठानाविषये अन्तरायास्त एवोरगाः सर्पाः अपकारकत्वात् तेभ्य उत्तराः परे तद्दूरचारिणः । धर्मानुष्ठानप्रत्यूहसर्पैर्नाभिभूयन्त इत्यर्थः ॥

**अर्थः**—कल्याणाची इच्छा करणाऱ्या श्रावकांनीं आपल्याकडून कोणताही प्रमाद न होऊं देतां नेहमीं गुरूंची सेवा करावी. कारण, त्यांचा आश्रयरूपी जीं गरुडपक्ष्यांचीं पंखें, त्यांच्या पोटांत संचार करणारे विघ्नरूपी सर्पांच्या सपाट्यांत सांपडत नाहींत.

गुरूपास्तिविधिमाह—

**आतां ; गुरुसेवेचा विधी सांगतात.**

निर्व्याजया मनोवृत्त्या ।

सानुवृत्त्या गुरोर्मनः ॥

प्रविश्य राजवच्छश्व- ।

द्विनयेनानुरञ्जयेत् ॥ ४६ ॥

**टीका**—अनुरञ्जयेदात्मनि रक्तं कुर्यात् । कोऽसौ श्रेयोऽर्थी । किं तन्मनश्चित्तं । कस्य गुरोराराध्यस्य । केन विनयेन अभ्युत्थाना-

दिना कायिकेन हितमितादिप्रतिपादनेन वाचानिकेन शुभाचिन्तनादिना चित्तेन च । कथं शश्वत् नित्यं । किं कृत्वा प्रविश्यान्तश्चरित्वा । किं तत् गुरोर्मनः । कया मनोवृत्त्या चित्तप्रवृत्त्या । किंविशिष्टया निर्व्याजया निर्दम्भया । पुनः किंविशिष्टया सानुवृत्त्या छन्दानुवृत्तिसहितया । कस्येव राजवत् । राज्ञो यथा सेवकवर्गः ॥

अर्थ—निर्दंभ अशी मनाची वृत्ती ठेवून आणि त्याच्या इच्छेप्रमाणें वागून त्याच्या मनांत प्रवेश करून, आणि कायिक ( उभें राहून संमुख जाणें वगैरे ) वाचिक ( हित व मित भाषण ) आणि मानसिक ( शुभ चिंतणें ) याप्रमाणें तीन प्रकारच्या विनयानें राजाप्रमाणें गुरूच्या मनाचें रंजन करावें.

विनयेनानुरञ्जयेदित्येतदर्थं व्यनक्ति—

आतां ; गुरुविनयाचा प्रकार सांगतात.

पार्श्वे गुरूणां नृपवत् ।
प्रकृत्यभ्यधिकाः क्रियाः ॥

---

१ निष्ठीवनमवष्टम्भं जृम्भणं गात्रभञ्जनम् ॥
असत्यभाषणं नर्म हास्यं पादप्रसारणम् ॥ १ ॥
अभ्याख्यानं करस्फोटं करेण करताडनम् ॥
विकारमंगसंस्कारं वर्जयेद्यतिसान्निधौ ॥ २ ॥

अर्थः—थुंकणें, गर्व करणें, जांभई देणें, अंग मोडणें, असत्य भाषण करणें, खेळणें, हंसणें, पाय पसरणें, दोषारोप करणें, दंड ठोकणें, टाळ्या वाजविणें, कांहीं तरी चेष्टा करणें, अंगास संस्कार करीत बसणें ह्या व आणखी अशाच प्रकारच्या चेष्टा गुरूपुढें करूं नयेत.

आनिष्टाश्च त्यजेत्सर्वा ।
मनो जातु नु दूषयेत्॥ ४७ ॥

टीका—त्यजेत् वर्जयेत् उपासकः । काः क्रियाश्चेष्टाः । सर्वाः । किंविशिष्टाः प्रकृत्यभ्यधिकाः स्वभावादतिरिक्ताः वैकारिकीः कोपहास्याविवादादिकाः । न केवलं ताः अनिष्टाश्च शास्त्रनिषिद्धाश्च पर्यस्तिकोपाश्रयादिकाः । क्व पार्श्वे समीपे । केषां गुरूणां । केषामिव नृपवत् राज्ञां यथा । तथा न दूषयेत् न विकारयेत् । किं तत् राज्ञामिव गुरूणां मनः । कथं जातु कदाचिदपि आर्तावस्थायामपीत्यर्थः ॥

अर्थः—राजाच्या आज्ञेत सेवक जसा तत्पर असतो, त्याप्रमाणें तत्पर होऊन गुरूच्या जवळ राहून, त्याच्या स्वभावास न आवडणाऱ्या व शास्त्रांत निषिद्ध अशा अर्थात् कोप, हास्य, विवाद वगैरे चेष्टा त्याच्याशीं करूं नयेत. आणि जेणेंकरून त्याच्या चित्तास विकार होईल अशा प्रकारचें आचरण करूं नये.

साम्प्रतं पात्राणि तर्पयेदित्यादिपूर्वोद्दिष्टदानादिविधिप्रपञ्चार्थमाह—

आतां; दान वगैरेचा विधि सांगतात.

पात्रागमविधिद्रव्यदेशकालानतिक्रमात् ॥
दानं देयं गृहस्थेन तपश्चर्यं च शक्तितः॥ ४८ ॥

टीका—देयं दातव्यं । किं तत् दानं रत्नत्रयानुग्राहकं वस्तु । केन गृहस्थेन । कस्मात् पात्राद्यनतिक्रमात् यथापात्रं यथाऽऽगमं यथाविधि यथाद्रव्यं यथादेशं यथाकालं चेत्यर्थः । तथा चर्यमनुष्ठेयं

गृहस्थेन किं तत् तपोऽनशनादि । कस्मात् शक्तितः । निजसामर्थ्यानुसारेण दानतपसी कुर्यादित्यर्थः ॥

अर्थः—पात्र, शास्त्र, विधि, द्रव्य, देश आणि काळ या सर्वांस अनुसरून, सम्यग्दृष्टि श्रावकानें आपली शक्ति न झांकतां, दान द्यावें व तप करावें.

सम्यग्दृशा नित्यमवश्यतया विधीयमानयोर्दानतपसोरवश्यम्भाविनं फलविशेषमाह—

आतां; नित्य नियमानें केलेल्या दानतपांचें विशेष फळ सांगतात.

नियमेनान्वहं किञ्चि- ।
द्यच्छतो वा तपस्यतः ॥
सन्त्यवश्यं महीयांसः ।
परे लोका जिनश्रितः ॥ ४९ ॥

टीका— अवश्यं निश्चितं । सन्ति भवन्ति । के ते लोकाः किंविशिष्टाः परे जन्मान्तराणीत्यर्थः । किंविशिष्टाः सन्ति महीयांसः इन्द्रादिपदलक्षणाः । कस्य जिनश्रितः परमात्मानं सेवमानस्य भव्यस्य । किं कुर्वतो यच्छतो ददतः । तपस्यतो वा तपश्चरतः । किं किंचित् यद्वा तद्वा शास्त्रविहितं । केन नियमेन अवश्यतया । कथमन्वहं दिनेदिने ॥

---

१ वर्यमध्यजघन्यानां पात्राणामुपकारकम् ॥
दानं यथायथं देयं वैयावृत्यविधायिना ॥ १ ॥

अर्थः—वैयावृत्य करणारानें उत्तम, मध्यम व जघन्य पात्रांस उपयोगी असें दान ।विधिपूर्वक व शक्त्यनुसार देत असावें.

अर्थः—थोडें कां होईना, पण जो सम्यग्दृष्टि जिनभक्त नित्य नियमानें जिनशास्त्रास संमत असें कांहीं तरी दान करितो व तपश्चर्या करितो, त्यास अन्यजन्मीं इंद्रत्व वगैरे उच्च पदें प्राप्त होतात.

यदर्थं महानं कर्तव्यं तत्तदर्थमाह—

आतां; दानाचे हेतु सांगतात.

धर्मपात्राण्यनुग्राह्या- ।
ण्यमुत्र स्वार्थसिद्धये ॥
कार्यपात्राणि चात्रैव ।
कीर्त्यै त्वौचित्यमाचरेत् ॥ ५० ॥

टीका— अनुग्राह्याणि उपकार्याणि श्रेयोऽर्थिना । कानि धर्मपात्राणि रत्नत्रयसाधनपराः नराः । किमर्थं स्वार्थसिद्धये । क्व अमुत्र परलोके स्वर्गादिसुखसम्पत्त्यर्थमित्यर्थः । तथा अनुग्राह्याणि । कानि कार्यपात्राणि त्रिवर्गसाधनसहायाः । कस्यै अत्रैव जन्मनि स्वार्थसिद्धये पुरुषार्थसम्प्राप्तये । तथा आचरेदनुतिष्ठेत् गृही । किं तत् औचित्यं दानप्रियवचनाभ्यामन्यस्य सन्तोषोत्पादनं कस्यै कीर्त्यै यशोऽर्थम् ॥

अर्थः—स्वार्थ साधण्याकरितां ह्मणजे परलोकीं सुख होण्याकरितां अर्थात् स्वर्ग वगैरे ठिकाणीं जन्म घेऊन तेथील सुखाचा अनुभव घेण्याकरितां; या जन्मीं धर्मपात्र ह्मणजे रत्नत्रय साधण्यास तत्पर असे जे मुनि वगैरे त्यांना त्यांच्या उपयोगाचे पदार्थ देऊन; त्यांच्यावर उपकार करावेत आणि कार्यपात्र ह्मणजे येथेंच आपल्या उपयोगीं पडणारे अर्थात् धर्म, अर्थ व काम हे तीन पुरुषार्थ साधून

घेतांनां त्यांत आपल्यास सहाय करणारे असे जे, त्यांना, स्वार्थसिद्धि म्हणजे त्रिवर्गसिद्धि अर्थात् धर्म, अर्थ व काम ह्यांची जी सिद्धि, तिजकरितां— यथायोग्य दान देऊन; त्यांच्यावर उपकार करावे. आणि कीर्ति मिळविण्याकरितां औचित्य म्हणजे दान व प्रियभाषण यांहींकरून इतरांस संतोष उत्पन्न करावा.

धर्मपात्राणां यथागुणं सन्तर्पणीयत्वमाह—

आतां; त्या त्या गुणांच्या धर्मपात्रांस तृप्त करावें हें सांगतात.

समयिकसाधकसमय- ।
द्योतकनैष्ठिकगणाधिपान् धिनुयात् ॥
दानादिना यथोत्तर- ।
गुणरागात्सद्गृही नित्यम् ॥ ५१ ॥

टीका— समयिको गृही यतिर्वा जिनसमयश्रितः । साधको ज्योतिषमन्त्रवादादिलोकोपकारकशास्त्रज्ञः । समयद्योतको वादित्वादिना मार्गप्रभावकः । नैष्ठिको मूलोत्तरगुणश्लाघ्यतपोऽनुष्ठाननिष्ठः । गणाधिपः धर्माचार्यस्तादृग्गृहस्थाचार्यो वा एतान् पञ्च धिनुयात् प्रीणयेत् । कोऽसौ सद्गृही पाक्षिकश्रावकस्त्रैवर्णिको वा गृहस्थः । केन दानादिना दानमानासनसम्भाषणादिना । कस्मात् यथोत्तरगुणरागात् यो य उत्तर उत्कृष्टः समयिकादीनां मध्ये तस्य तस्य गुणेषु प्रीतितः । अथवा यो यो यस्योत्कृष्टो गुणस्तत्र तत्र प्रीत्या तं धिनुयादिति योज्यम् । अत्र श्रमणोपासकेषु मुमुक्षुषु रत्नत्रयानुग्रहबुध्या सन्तर्पणं पात्रदत्तिः । बुमुक्षुषु च गृहस्थेषु वात्सल्येन यथार्हमनुग्रहः समानदत्तिरिति विभागः ॥

**अर्थः—जिनसमय ह्मणजे जिनानें उपदेशिलेलें शास्त्र, त्याचा आश्रय करून असणारा ह्मणजे त्याप्रमाणें वागणारा जो यति किंवा गृहस्थ तो समयिक होय. ज्योतिष, मंत्र-वाद वगैरे लोकोपकारक शास्त्रांचा जो जाणता तो साधकें होय. वाद वगैरे करून जो मोक्षमार्गाची प्रभावना करितो तो समयद्योतक होय. मूल व उत्तर गुण यांहींकरून स्तुतीस पात्र असें तपाचें अनुष्ठान करण्यांत निष्ठ ह्मणजे**

---

१ गृहस्थो वा यतिर्वाऽपि जैनं समयमास्थितः ॥
यथाकालमनुप्राप्तः पूजनीयः सुदृष्टिभिः ॥ १ ॥

अर्थः—जैनधर्मी यति असो किंवा गृहस्थ असो, तो योग्यकालीं प्राप्त झाला असतां त्याचा सम्यग्दृष्टि श्रावकानें सन्मान करावा.

२ ज्योतिर्मन्त्रनिमित्तज्ञः सुप्रज्ञः कायकर्मसु ॥ ३ ॥
मान्यः समायिभिः सम्यक्परोक्षार्थ×××धीः ॥ २ ॥

अर्थः—ज्योतिःशास्त्र जाणणारा, निमित्त ह्मणजे शकुनशास्त्र जाणणारा, वैद्य, भविष्य जाणणारा असे जे आपल्या धर्मांतले सुज्ञ पुरुष त्यांचा दानमानादिकानें यथायोग्य सत्कार करावा. कारण,

३ दीक्षायात्राप्रतिष्ठाद्याः क्रियास्तद्विरहे कुतः ॥
तदर्थं परपृच्छायां कथं च समयोन्नतिः ॥

अर्थः—ज्योतिःशास्त्राचे जाणते वगैरे नसले तर दीक्षा, यात्रा, प्रतिष्ठा वगैरे क्रिया कशा करितां येतील? शिवाय, त्याकरितां परधर्मी लोकांस विचारूं लागल्यास आपल्या धर्माची उन्नति कशी होणार?

जो तत्पर असतो तो नैष्ठिक समजावा. धर्माचार्य किंवा त्याच्या सारखाच बुद्धिमान् असा जो गृहास्थाचार्य तो गणाधिप समजावा. या पांच धर्मपात्रांस ह्मणजे समयिक, समयद्योतक, नैष्ठिक आणि गणाधिप यांस; त्यांच्या ठिकाणीं असलेल्या त्या त्या उत्कृष्ट गुणांवर प्रीति ठेवून, उत्तम गृहस्थानें ह्मणजे पाक्षिक श्रावकानें अर्थात् धर्म, अर्थ व काम हे तीन पुरुपार्थ साधणाऱ्या गृहस्थानें; दान, मान, संभाषण वगैरे उपायांनीं तृप्त करावें. येथें, श्रमण ह्मणजे दिगंबर मुनि व उपासक ह्मणजे उत्कृष्ट प्रतिमाधारी असे जे दोन प्रकारचे मुमुक्षु (मुक्त होऊं इच्छिणारे) त्यांना तृप्त करणें ही पात्रदत्ति; आणि बुभुक्षु ह्मणजे गृहस्थ त्यांना योग्यतेप्रमाणें तृप्त करणें ही समानत्ति; असे दोन विभाग शास्त्रकारांनीं केले आहेत.

---

१ मूलोत्तरगुणश्लाध्यैस्तपोभिर्निष्ठितास्थितिः ॥
साधुः साधु भजेत्पूज्यः पुण्योपार्जनपण्डितैः ॥ ४ ॥

अर्थः—मूल व उत्तर गुणांनीं स्तुतीस पात्र अशा तपांनीं युक्त अशी स्थिति ज्यानें ठेविली आहे असा जो पूज्य साधु, त्याची सेवा—पुण्य मिळविण्यांत चतुर लोकांनीं—उत्तम प्रकारें करावी.

ज्ञानकाण्डे क्रियाकाण्डे चातुर्वर्ण्यपुरस्सरः ॥
सूरिर्देव इवाराध्यः संसाराब्धितरण्डकः ॥ ५ ॥

अर्थः —ज्ञानकांड व क्रियाकांड चालविण्यांत चारहि वर्णांत श्रेष्ठ असा जो धर्माचार्य किंवा गृहस्थाचार्य असतो, तो संसार-समुद्रांतून तारणारा एक तरंडक (नौका) आहे म्हणून देवाप्रमाणें त्याला पूजीत असावें.

समदत्तिविधानोपदेशार्थमाह—

आतां; येथें समानदत्तीचा विधि सांगतांना प्रथम समयिकाची प्रशंसा करितात.

स्फुरत्येकोऽपि जैनत्व- ।
गुणो यत्र सतां मतः ॥
तत्राप्यजैनैः सत्पात्रै- ।
र्द्योत्यं खद्योतवद्रवौ ॥ ५२ ॥

**टीका**:—द्योत्यं प्रकाश्यं प्रभाव्यं । कैः सत्पात्रैः ज्ञानतपोऽधिकैः । किंविशिष्टैरजैनैः शिवादिभक्तिग्रहाविष्टैः । क्व तत्रापि तपोज्ञानरहितेऽपि जैने । किंवत् खद्योतवत् खद्योतैरिव । कस्मिन् रवौ रविसन्निधाने ज्योतिरिङ्गणा यथा निष्प्रभा भवन्ति तथा स्फुरज्जैनत्वगुणपुंसः समीपे मिथ्यादृष्टिधार्मिका इत्यर्थः । यत्र किं यत्र स्फुरति प्रतपति । कोऽसौ जैनत्वगुणः जिन एव देवो मे भवार्णवोत्तारकत्वादित्यभिनिवेशधर्मः । किंविशिष्टोऽपि एकोऽपि ज्ञानतपोरहितः । किं पुनस्तत्सहित इत्यपिशब्दार्थः । किंविशिष्टः सतां मतः साधूनामिष्टः ॥

**अर्थ**;—जिनच देव होय, कारण, तो मला संसारसमुद्रांतून तारणारा आहे; असा जो अभिनिवेश त्याला जैनत्वगुण ह्मणतात. सज्जनांस संमत असा हा जैनत्वगुण (ज्ञान व तपरहित असा अर्थात् एकटाच) ज्या मनुष्याच्या ठिकाणीं प्रकाशमान झाला आहे, त्याच्या पुढेंहि ह्मणजे तप व ज्ञान यांहींकरून रहित अशाहि जैनापुढें;—अजैन ह्मणजे जिनधर्मबाह्य अर्थात् मिथ्यादृष्टि जे असतात; ते सत्पात्र जरी असले ह्मणजे ज्ञान व तप आचरणारे असले

तरी त्यांनीं सूर्यापुढें काजव्याप्रमाणें निस्तेज व्हावें लागतें.

श्रेयोऽर्थिनां जैनानुग्रहानुभावमाह—

आतां; ज्याला आपलें कल्याण करून घ्यावयाचें आहे, त्यानें जैनावर अनुग्रह करावा हें सांगतात.

वरमेकोऽप्युपकृतो ।
जैनो नान्ये सहस्रशः ॥
दलादिसिद्धान् कोऽन्वेति ।
रससिद्धे प्रसेदुषि ॥ ५२ ॥

टीकाः—वरं भवतु । कोऽसौ जैनः । किंविशिष्ट उपकृतोऽनुगृहीतः । किंविशिष्टोऽपि एकोऽपि । न वरं । केऽन्ये अजैनाः । किंविशिष्टा उपकृताः । कियन्तः सहस्रशः सहस्रसंख्याः । अत्र दृष्टान्तमाह को न कश्चित् । अन्वेति अनुवर्तते । कान् दलादिसिद्धान् दलं बीजरहितकृत्रिमसुवर्णादिद्रव्यं आदिशब्दाद्वर्णोत्कर्षादि । तत्र तेन वा सिद्धान् प्रसिद्धान् । क्व सति रससिद्धे पारदेन दारिद्र्यव्याधिजरादिनिराकरणशक्त्या प्रतीते पुंसि । किंविशिष्टे प्रसेदुषि प्रसन्ने अनुग्रहोद्यते ॥

अर्थः—हजारों मिथ्यादृष्टि जीवांवर उपकार करण्यापेक्षां एकट्या जैनावरच उपकार करणें हें फार बरें. कारण रससिद्ध ह्मणजे पारदानें ( पारा ) दारिद्र्य, व्याधि, जरा वगैरे दूर करण्याच्या शक्तीनें प्रसिद्ध असा पुरुष प्रसन्न झाल्यावर त्याला सोडून, दलादिसिद्धांस ह्मणजे (कृत्रिम सुवर्ण वगैरे द्रव्यें करण्यांत प्रसिद्ध अशा मनुष्यांस) कोण बरें अनुसरेल?

नामादिनिक्षेपविभक्तानां चतुर्णां जैनानां पात्रत्वं यथोत्तरं विशिनष्टि—

आतां; नाम, स्थापना, द्रव्य आणि भाव अशा चार प्रकारच्या जैनांस पात्रत्व असल्याचें सांगतात.

नामतः स्थापनातोऽपि ।
जैनः पात्रायते तराम् ॥
स लभ्यो द्रव्यतो धन्यै- ।
र्भावतस्तु महात्मभिः ॥ ५४ ॥

टीका:— पात्रायते तरां अजैनपात्रेभ्योऽतिशयेन संयुज्यमान-निर्वाणकारणगुणलक्षणपात्रवदाचरति सम्यक्त्वसहचारिपुण्याश्रवकारणत्वात् । कोऽसौ जैनः । केन नामतः सञ्ज्ञामात्रेण । न परं नाम्ना स्थापनातोऽपि सोऽयं जैन इति कल्पनामात्रेणापि । लभ्यः प्राप्यः । कोऽसौ स जैनः । केन द्रव्यतो द्रव्येण आगामिजैनत्वगुणयोग्यत्वेन विविष्टः । कैः धन्यैः पुण्यवद्भिः । स एव तु भावतो भावेन जैनत्वगुणयोगेन लभ्यः । कैः महात्माभिः महाभागैः ।

**अर्थः—**नामजैन ह्मणजे ज्याला जैन अशी संज्ञा आहे असा, आणि स्थापनाजैन ह्मणजे 'तो हा जैन होय' अशी कल्पना मात्र ज्याच्या विषयीं आहे असा जो जैन; तोहि अजैनपात्रापेक्षां, अतिशयेंकरून (ज्याला मोक्षास कारणीभूत असा गुण प्राप्त झाला आहे अशा पात्राप्रमाणें) उत्कृष्ट होय. कारण, त्या दोघांना दान केलें असतां सम्यक्त्व वाढून पुण्याश्रव होतो. तो जैन द्रव्यतः ह्मणजे पुढें प्राप्त होणारा जो जैनत्वगुण त्यानें युक्त असा झालेला, पुण्यवंतास प्राप्त होतो. आणि तोच ह्मणजे द्रव्यजैनच

भावतः ह्मणजे ज्याच्याठिकाणीं जैनत्वगुण आहे असा झालेला, महाभाग्यवंतास प्राप्त होतो.

भावजैनं प्रति निरुपाधिप्रीतिमतोऽभ्युदयनिःश्रेयससम्पदं फल-माह—

आतां; भावजैनावर निष्कपट प्रीति करणाऱ्यास प्राप्त होणारें फळ सांगतात.

प्रतीतजैनत्वगुणेऽनुरज्यन्
निर्व्याजमासंसृति तद्गुणानाम् ॥
धुरि स्फुरन्नभ्युदयैरदृप्त-
स्तृप्तस्त्रिलोकीतिलकत्वमेति ॥ ५५ ॥

टीका—एति गच्छति । कोऽसौ गृही । किं कुर्वन् अनुरज्यन् स्वयमेवानुरागं कुर्वन् । कथं निर्व्याजं निच्छद्म । क प्रतीतः प्रसिद्धो जैनत्वगुणो यस्य तस्मिन् प्रतीतजैनत्वगुणे । किमेति त्रिलोकीतिल-कत्वं परमपदं । किंभूतो भूत्वा तृप्तः वितृष्णीभूत इत्यर्थः । कैः अभ्युदयैराज्ञैश्वर्यादिभिः । किंविशिष्टः सन् अदृप्तोऽकृतमदः सम्यक्त्व-सहचारिपुण्योदययागोत् । किं कुर्वन् स्फुरन् दीव्यन् । क धुरि अग्रे । केषां सद्गुणानां प्रतीतजैनत्वगुणानां । कथं आसंसृति संसारं यावत् भवेभवे जैनानामग्रणीर्भवन्नित्यर्थः ॥

अर्थः—ज्याचा जैनत्वगुण सर्वांस प्रसिद्ध आहे, ह्मणजे ज्याच्या ठिकाणीं खरोखरच जैनत्वगुण वास करीत आहे, अशा भव्य पात्रावर जो मनुष्य निर्दंभपणें प्रीति करितो; तो, प्रत्येक जन्मीं जैनत्वगुणानें युक्त अशा लोकांच्या अग्रभागीं अधिक तेजस्वी होऊन, आणि प्रत्येक जन्मांत प्राप्त होणाऱ्या सुखैश्वर्यांनें तृप्त होऊन त्या ऐश्वर्याविषयीं

यत्किंचित्‌ही गर्व न बाळगितां, शेवटीं त्रैलोक्याचा तिलक होतो. ह्मणजे मोक्षपदास पावतो.

गृहस्थाचार्याय तदभावे मध्यमपात्राय वा कन्यादिदानं पाक्षिक-श्रावकस्य कर्तव्यतयोपदिशति—

आतां; गृहस्थाचार्यास किंवा तो नसल्यास मध्यमपा-त्रास कन्यादि दान देणें हें पाक्षिक श्रावकाचें कर्तव्य असल्याचें सांगतात.

निस्तारकोत्तमायाथ ।
मध्यमाय सधर्मणे ॥
कन्याभूहेमहस्त्यश्व- ।
रथरत्नादि निर्वपेत् ॥ ५६ ॥

**टीका**— निर्वपेत् दद्यात् गृही । किं तत् कन्या कुमारी भूर्भूमिः हेम काञ्चनं हस्ती गजः अश्वो वाजी रथः स्यन्दनः रत्नं वज्रादि । आदिशब्देन वस्त्रगृहनगराद्येवंजातीयकमन्यदपि त्रिवर्गसाधनाश्रयं वितरेत् । कस्मै सधर्मणे समान आत्मना समो धर्मः क्रियामन्त्रव्रतादिलक्षणो गुणो यस्य तस्मै । किंविशिष्टाय निस्तारकोत्तमाय संसारार्णवोत्तारकाणां गृहिणां मध्ये प्रधानाय । न केवलं तस्मै तदलाभे च मध्यमाय अनुत्तमाधमाय । अथशब्दोऽत्र पक्षान्तरसूचनेऽधिकारे वा । अत्र जघन्यविषयां समदत्तिं व्याख्याय मध्यमविषयाऽसावधिक्रियते इत्यर्थः । यत्यपेक्षया गृहस्थस्य गुणा-धिकस्यापि मध्यमपात्रत्वात् ॥

**अर्थः**—संसारसमुद्रांतून तरून जाण्याकरितां यत्न कर-णारे जे गृहस्थ त्यांच्यामध्यें श्रेष्ठ असा जो समानधर्मी

(क्रिया, मंत्र, व्रतें हीं ज्याचीं व आपलीं सारखीं आहेत) अशा गृहस्थास, किंवा तो न मिळाल्यास त्याच्यापेक्षां जो मध्यम आहे अशास—कन्या, भूमि, सुवर्ण, हत्ती, घोडा, रथ, रत्नें वगैरे त्रिवर्ग (धर्मार्थकाम) साधनाचे—पदार्थ दान द्यावेत. (या दानास समानदत्ति ह्मणतात.)

सधर्मभ्यः कन्यादिदाने हेतुमाह—

आतां; समानधर्मी श्रावकांस कन्या वगैरे दान देण्याचा हेतु सांगतात.

आधानादिक्रियामन्त्र- ।
व्रताद्युच्छेदवाञ्छया ॥
प्रदेयानि सधर्मभ्यः ।
कन्यादीनि यथोचितम् ॥ ५७ ॥

टीका:—प्रदेयानि प्रकृष्टं कृत्वा दातव्यानि गृहिणा । कानि कन्यादीनि । केभ्यः सधर्मभ्यः साधर्मिकेभ्यः । कथं यथोचितं ।

---

१ उक्तं च चारित्रसारे ॥ समदत्तिः स्वसमक्रियामन्त्राय निस्तारकोत्तमाय कन्याभूमिसुवर्णहस्त्यश्वरथरत्नादिदानम् । स्वसमानाभावे मध्यमपात्रस्यापि दानमिति ॥

अर्थः— याविषयीं चारित्रसार ग्रंथांत सांगितलें आहे कीं; ज्याच्या क्रिया, मंत्र व व्रतें हीं आपल्यासारखीं आहेत अशा उत्तम पात्रास ह्मणजे जो संसारांतून तरून जाण्याच्या उद्योगास लागला आहे अशास कन्या, भूमि, सुवर्ण, हत्ती, घोडा, रथ, रत्न वगैरे पदार्थ दान देणें याला समानदत्ति ह्मणतात. उत्तमपात्र नसल्यास मध्यमपात्रासहि वरील पदार्थ देणें यालाहि समानदत्ति ह्मणतात.

यो यो यद्दानस्य योग्यस्तस्मै तस्मै तद्दातव्यमित्यर्थः । कया? आधानादीत्यादि आधानं गर्भाधानविधानमादिर्यासां प्रीतिसुप्रीत्यादीनामाप्तोक्तानां क्रियाणां ता आधानादयस्ताश्च ताः क्रियाश्च कर्माणि गृहस्थानामवश्यकार्याणि । मन्त्राः प्रत्यासत्तेराधानादिक्रियासम्बन्धिन एवाप्तोक्ताः अपराजितमन्त्रो वा । व्रतानि मद्यविरत्यादीनि आदिशब्दाद्देवपूजापात्रदानादिधर्मकर्माणि तेषामच्छेदः सातत्येन प्रवृत्तिस्तत्र वाञ्छा आकांक्षा तया ॥

अर्थः—गर्भाधान, प्रीति, सुप्रीति वगैरे ज्या शास्त्रकारांनीं सांगितलेल्या क्रिया, त्या व त्या त्या क्रियांचे मंत्र आणि व्रतें (अहिंसा, मद्यविरति वगैरे) हीं सतत चालावींत ह्मणजे ह्यांचा विच्छेद होऊं नये, अशा हेतूनें; समानधर्मी जे गृहस्थ आहेत त्यांना यथोचित ह्मणजे ज्या ज्या पात्रास ज्या ज्या पदार्थांची आवश्यकता आहे हें पाहून व तो पदार्थ त्याला देणें योग्य कीं अयोग्य याचा विचार करून; त्या त्या पात्रास ते ते पदार्थ ह्मणजे कन्या, भूमि, सुवर्ण वगैरे पदार्थ द्यावेत.

सम्यक्कन्यादानविधिं तत्फलं चाह—

आतां; उत्तमकन्यादानाचा विधि व त्याचें फळ सांगतात.

निर्दोषां सुनिमित्तसूचितशिवां कन्यां वरार्हैर्गुणैः।
स्फूर्जन्तं परिणाय्य धर्म्यविधिना यः सत्करोत्यञ्जसा ॥
दम्पत्योः स तयोस्त्रिवर्गघटनात्त्रैवर्णिकेष्वग्रणी- ।
र्भूत्वा सत्समयास्तमोहमहिमा कार्ये परेऽप्यूर्जति ५८

टीकाः—यो गृही । अञ्जसा श्रद्धापरत्वेन । साधर्मिकं सत्क-

रोति सन्मानयति यथोचितवस्त्रादिदानेनोपचरति । किं कृत्वा परिणाय्य युक्तितो वरणविधानमाग्निदेवद्विजसाक्षिकं च पाणिग्रहणं विवाहस्तं कारयित्वा । केन धर्म्यविधिना धर्म्या धर्मादनपेता ब्राह्मप्राजापत्यार्षदैवाश्चत्वारो विवाहास्तेषां यथार्हं प्रयोगेण । किं

---

१ ॥ धर्म्यविवाहविधिरार्षोक्तो यथा ॥

अर्थः—धर्मशास्त्रास संमत असा विवाहविधि महापुराणांत श्रीजिनसेन आचार्यांनीं सांगितला आहे, तो असा—

तसोऽस्य गुर्वनुज्ञानादिष्टा वैवाहिकी क्रिया ॥
वैवाहिके कुले कन्यामुचितां परिणेष्यतः ॥ १ ॥

सिद्धार्चनविधिं सम्यग्निर्वर्त्य द्विजसत्तमाः ॥
कृताग्नित्रयसम्पूजाः कुर्युस्तत्साक्षिकां क्रियाम् ॥ २ ॥

पुण्याश्रमे क्वचित्सिद्धप्रतिमाभिमुखं तयोः ॥
दम्पत्योः परया भूत्या कार्यः पाणिग्रहोत्सवः ॥ ३ ॥

वेद्यां प्रणीतमग्नीनां त्रयं द्वयमथैककम् ॥
ततः प्रदक्षिणीकृत्य प्रशय्य विनिवेशनम् ॥ ४ ॥

पाणिग्रहणदीक्षायां नियुक्तं तद्वधूवरम् ॥
आसप्ताहं चरेद्ब्रह्मव्रतं देवाग्निसाक्षिकम् ॥ ५ ॥

क्रान्त्वा स्वस्योचितां भूमिं तीर्थभूमीर्विहृत्य च ॥
स्वगृहं प्रविशेद् भूत्या परया तद्वधूवरम् ॥ ६ ॥

विमुक्तकंकणं पश्चात्स्वगृहे शयनीयकम् ॥
अधिशय्य यथाकालं भोगांगैरुपलालितम् ॥ ७ ॥

सन्तानार्थमृतावेव कामसेवां मिथो भजेत् ॥
शक्तिकालव्यपेक्षोऽयं क्रमोऽशक्तेष्वतोऽन्यथा ॥ ८ ॥

कुर्वन्तं स्फूर्जन्तं विचारकचेतसि स्फुरन्तं । कैर्गुणैः । किंविशिष्टैः वराहैर्वरयितुर्योग्यैः कुलशीलसानाथ्यविद्यावित्तसौरूप्ययोग्यवयोर्थित्वैः कां परिणाय्य कन्यां । किंविशिष्टां निर्दोषां सामुद्रिकशास्त्रोक्तदोषरहितां । पुनः किंविशिष्टां सुनिमित्तसूचिताशिवां सुनिमित्तैः सामुद्रिकदूत(?)ज्योतिषादिभविष्यच्छुभाशुभज्ञानोपायैः सूचितं प्रकाशितं शिवं स्वस्य वरस्य च कल्याणं यस्यास्तां । स किमित्याह ऊर्जति समर्थो भवति । कोऽसौ स यथाविधिकन्यादाता क्व कार्येऽवश्यकृत्ये। किंविशिष्टे परेऽपि पारलौकिके न केवलं लौकिक इत्यपिशब्दार्थः । किंविशिष्टः सन् सदित्यादि सत्समयः जिनप्रवचनमार्यसज्ञातिर्वा तेनास्तो निराकृतो मोहस्य चारित्रावरणकर्मणो महिमा गुरुत्वं येन स तथोक्तः । किं कृत्वा । भूत्वा किम्भूतोऽग्रणीः प्रधानं । केषु मध्ये त्रैवर्गिकेषु धर्मार्थकामानाचरत्सु । कस्मात् त्रिवर्गघटनात् धर्मार्थकामसम्पादनात् । कयोस्तयोः स्वकन्यातद्वरलक्षणयोर्दम्पत्योर्जायापत्योः ॥

---

अर्थः—त्यानंतर ह्मणजे व्रताचरण क्रिया संपल्यानंतर, पित्याच्या आज्ञेनें, विवाहास योग्य अशा कुलांत जन्मलेल्या कन्येशीं विवाह करून घेणारास विवाहासंबंधी क्रिया करावयास सांगितली आहे; ती अशी,—प्रथम सिद्धपरमेष्ठीची आराधना करून, त्यानंतर गार्हपत्य, दक्षिणाग्नि व आहवनीय असे जे तीन अग्नि त्यांची विधिपूर्वक पूजा करून, त्या अग्नींच्या समक्ष विवाहक्रिया करावी. कोठें तरी पवित्र अशा प्रदेशांत सिद्धप्रतिमेच्या अग्रभागीं त्या वधूवरांचा पाणिग्रहणाचा उत्सव मोठ्या थाटानें करवावा. वेदीवर सिद्ध केलेल्या तीन्ही, दोन्ही अथवा एका अग्नीस वधूवरांनीं प्रदक्षिणा घालाव्या. विवाहक्रिया चालू असतांना उभयतां वधूवरांनीं सात दिवस ब्रह्मचर्य पाळावें. त्या-

अर्थः—सामुद्रिक शास्त्रांत सांगितलेल्या दोषांनीं रहित व उत्तम लक्षणांनीं जिणें आपलें व वराचेंहि शुभ सुचविलें आहे अशा कन्येचा, वरास योग्य–ह्मणजे कुल, शील वगैरे -गुणांनीं शोभणाऱ्या वराशीं धर्मशास्त्रास संमत अशा विधीनें विवाह करून जो गृहस्थ श्रद्धेनें अलंकार वस्त्र वगैरे देऊन त्या वराचा सत्कार करितो; तो, त्या वधूवरास धर्म, अर्थ व काम ह्या तीन पुरुषार्थांची घटना करून दिल्यामुळें; त्रैवर्गिकामध्यें ह्मणजे धर्म, अर्थ व काम हे तीन पुरुषार्थ जे सेवितात त्यांच्यामध्यें--पुढारी होऊन अर्थात् आपण निश्चित होऊन; मग, सत्समय ह्मणजे सत्संगति किंवा जिनप्रवचन (शास्त्र) जें, त्याच्या योगानें चारित्रमोह कर्माचा प्रभाव नाहींसा करून; ऐहिक व पारलौकिक कार्यामध्यें समर्थ होतो.

---

नंतर आपणांस उचित अशा भूमीवर व तीर्थभूमीवर विहार करून ह्मणजे जिनमंदिर वगैरे तीर्थांचें दर्शन घेऊन मोठ्या ऐश्वर्यानें त्या वधूवरांनीं गृहप्रवेश करावा. घरीं गेल्यावर हातांतील कंकण सोडून, पुढें योग्यकाळीं ( वधूला ऋतुदर्शन झाल्यावर ) तेथें मृदु व भोगसामग्रीनें रम्य अशा शयनावर वधूवरांनीं केवळ संतानाकरितांच परस्पर कामसेवन करावें. आणि तेंहि ऋतुकाळीं करावें. अन्य काळीं करूं नये. हा क्रम समर्थ मनुष्यास सांगितला आहे. अशक्त जो असेल त्यानें अधिक काळाच्या अंतरानें कामसेवन करावें.

१ द्वौ हि धर्मौ गृहस्थानां लौकिकः पारलौकिकः ॥
लोकाश्रयो भवेदाद्यः परः स्यादागमाश्रयः ॥ १ ॥

सत्कन्याप्रदातुः साधर्मिकोपकारकरणद्वारेण महान्तं सुकृतलाभमवभासयन्नाह—

सत्कन्यां ददता दत्तः ।
सत्रिवर्गो गृहाश्रमः ॥
गृहं हि गृहिणीमाहु- ।
र्न कुड्यकटसंहतिम् ॥ ५९ ॥

टीका:—दत्तो वितीर्णः सद्गृहिणा साधर्मिकाय । कोऽसौ गृहाश्रमः गृहे आश्रमो धर्मानुष्ठानं गृहमेव वाऽऽश्रमस्तपःस्थानं । किं कुर्वता ददता । कां सत्कन्यां सती प्रशस्ता कौलीन्यादिगुणोपेता सामुद्रिकोक्तदोषरहिता च कन्या कुमारी सत्कन्या तां । किंविशिष्टो

---

अर्थः— लौकिक ह्मणजे इहलोकीं उपयोगीं पडणारा व पारलौकिक ह्मणजे पुढील जन्मीं उपयोगीं पडणारा असे दोन धर्म गृहस्थांचे आहेत. त्यांपैकीं पहिला जो लौकिक, तो त्या त्या कालच्या लोकस्थितीवर अवलंबून असतो, अर्थात् देशकालाप्रमाणें तो निरनिराळ्या स्वरूपाचा होतो आणि दुसरा जो पारलौकिक तो जैनसिद्धांतास अनुसरून असतो. त्याचें मात्र रूप बदलत नाहीं.

सर्व एव हि जैनानां प्रमाणं लौकिको विधिः ॥
यत्र सम्यक्त्वहानिर्न यत्र न व्रतदूषणम् ॥ २ ॥

अर्थः—ज्यांत सम्यक्त्वाला हानि व अहिंसाव्रताला दूषण नाहीं असा जैनांचा लौकिकधर्माचा जो विधि आहे तो कोणत्याहि देशांतला आणि कोणत्याहि काळांतला असला तरी तो प्रमाणच्च होय.

गृहाश्रमो दचः सत्रिवर्गो धर्मार्थकामानां सद्गृहिणीमूलत्वात् । तथाहि धर्मः स्वदारसन्तोषाद्यात्मकसंयमलक्षणो देवादिपरिचरणस्वरूपः सत्पात्रदानादिस्वभावश्च । अर्थो वेश्यादिव्यसनव्यावर्तनेन निष्प्रत्यूहमर्थस्योपार्जनादुपार्जितस्य च रक्षणाद्रक्षितस्य च वर्ध्दनाद्यथाभाग्यं ग्रामसुवर्णादिसम्पत्तिः । संकल्परमणीयस्य प्रीतिसम्भोगशोभिनो रुचिरस्याभिलाषस्य नाम काम इति स्मृतिरिति वचनात् । कामश्च यथेष्टमाभिमानिकरसानुविद्धसर्वेन्द्रियप्रीतिहेतुः कुल्याङ्गनासङ्गिनां सुप्रतीतः । हि यस्मात् । आहुः ब्रुवान्ति विद्वांसः किं गृहं । कां गृहिणीं कुलपत्नीं । न आहुः । किं तत् गृहं । कुड्यकटसंहतिं भित्तिवंशादिच्छादनसङ्घातम् ॥

---

स्वजात्यैव विशुद्धानां वर्णानामिह रत्नवत् ॥
तत्क्रियाविनियोगाय जैनागमविधिः परम् ॥ ३ ॥

अर्थः—रत्न हें जातीचें शुद्ध असलें तरी त्याला विशेष शोभा येण्याकरितां कुशल कारागिराकडून निराळे संस्कार ( छेद पाडणें कोरणें वगैरे ) करावे लागतात. त्याप्रमाणें जात्याच शुद्ध असलेले जे ब्राह्मण वगैरे वर्ण, त्यांना विशेष महत्व येण्याकरितां जैनशास्त्राचा विधि करणें योग्य होय.

यद्भवभ्रान्तिनिर्मुक्तिहेतुर्धीस्तत्र दुर्लभा ॥
संसारव्यवहारे तु स्वतःसिद्धे वृथाऽऽगमः ॥ ४ ॥

अर्थः—संसाराचा जो व्यवहार आहे तो स्वतःसिद्ध आहे त्याला कांहीं शास्त्रांची गरज नाहीं. कारण तिकडे लोकांची प्रवृत्ति स्वभावतःच असते. संसारचक्राच्या फेऱ्यांतून सुटका होण्यास कारण असा जो धर्ममार्ग त्याविषयीं बुद्धि होणें दुर्लभ आहे.

अर्थः—ज्यानें उत्तम अशी कन्या समानधर्मी श्रावकास दिली; त्यानें धर्म अर्थ व काम या तीन पुरुषार्थांनीं युक्त असा गृहाश्रमच त्यास दिला असें समजावें. कारण, भिंत व वेळवाचे वासे यांची जी रचना तें घर नव्हें. तर, गृहिणी ह्मणजे कुलाचार पाळणारी जी स्त्री तेंच घर होय.

---

१ धर्मः स्वदारसंतोषाद्यात्मकः संयमलक्षणो देवादिपरिचरणस्वरूपः सत्पात्रदानादिस्वभावः ॥

अर्थः—स्वस्त्रीच्याठायींच रत होऊन संतोष मानणें, मन स्वाधीन ठेवणें, देव व गुरु यांची सेवा करणें, सत्पात्रदान वगैरे करणें हा सगळा श्रावकाचा धर्म होय.

२ अर्थो वेश्यादिव्यसनव्यावर्तनेन निष्प्रत्यूहमर्थस्योपार्जनादुपार्जितस्य च रक्षणाद्रक्षितस्य च वर्धनाद्यथाभाग्यं ग्रामसुवर्णादिसंपत्तिः ॥

अर्थः—वेश्या वगैरे व्यसन नसल्यामुळें निर्विघ्नपणें द्रव्य मिळवून, मिळविलेल्याचें रक्षण करणें व रक्षिलेलें वाढविल्यानें आपल्या भाग्याप्रमाणें प्राप्त झालेली ग्राम, सुवर्ण वगैरे जी संपत्ति तिला अर्थ म्हणतात.

३ कामश्च यथेष्टमाभिमानिकरसानुविद्धसर्वेन्द्रियप्रीतिहेतुः कुलयांगनासंगिनां सुप्रतीतः ॥

अर्थः—आत्मविचारास झांकून टाकणाऱ्या अशा प्रेमरसानें युक्त अशी सगळ्या इंद्रियांची जी प्रीति तिला कारण असा जो पदार्थ तो काम. त्याचा कुलांगनेशीं संग करणाऱ्यांस चांगला अनुभव असतो.

कुलस्त्रीपरिग्रहं लोकद्वयाभिमतफलसम्पादकत्वात् त्रैवर्गिकस्य विधेयतयोपदिशति—

आतां; कुलस्त्रीपरिग्रहाचा उपयोग सांगतात.

धर्मसन्ततिमक्लिष्टां ।
रतिं वृत्तकुलोन्नतिम् ॥
देवादिसत्कृतिं चेच्छन् ।
सत्कन्यां यत्नतो वहेत् ॥ ६० ॥

टीका:—वहेत् परिणयेत् । कोऽसौ श्रावकः । कां सत्कन्यां सती प्रशस्ता सतश्च सज्जनस्य कन्या सत्कन्या तां । कस्मात् यत्नतः प्रयत्नेन तत्परतया । किं कुर्वन् इच्छन् आकांक्षन् । किं किं धर्मसन्ततिं धर्मार्था सन्ततिरपत्यानि अथवा धर्मस्य सन्ततिरविच्छेदो धर्मसन्ततिस्तां । तथा अक्लिष्टामनुपहतां रतिं सम्भोगं । तथा वृत्तकुलोन्नतिं वृत्तस्याचारस्य कुलस्य च वंशस्य गृहस्य वा उन्नतिरुद्धतिस्तां । तथा देवादिसत्कृतिं देवद्विजातिथिबान्धवसत्कारम्

**अर्थः—धर्ममार्गी रत होणारी अशी संतति, अथवा कुलक्रमागत धर्मपरंपरा, क्लेश न देणारें संभोगसुख, आचार, कुलाची उन्नती आणि जिनपूजा व सत्पात्रदान किंवा अतिथिसत्कार वगैरेंची इच्छा बाळगणारानें यत्नें-करून सज्जनाच्या कन्येशीं विवाह करावा.**

दुष्कलत्रस्याकलत्रस्य वा पात्रस्य भूम्यादिदानान्न कश्चिदुपकारः स्यादित्यमुमर्थमवश्यं सत्कन्याविनियोगेन सधर्माणमनुगृह्णीयादिति विधिव्यवस्थापनार्थमर्थान्तरन्यासेन समर्थयते—

**आतां; ज्याला स्त्री नाहीं अथवा स्त्री असून ती दुरा-**

चारिणी आहे अशा गृहस्थास भूमि, सुवर्ण वगैरे पदार्थ दान देऊं नयेत हें सांगतात.

सुकलत्रं विना पात्रे ।
भूहेमादिव्ययो वृथा ॥
कीटैर्दन्दश्यमानेऽन्तः ।
कोऽम्बुसेकात् द्रुमे गुणः ॥ ६१ ॥

टीका—भवति । कोऽसौ भूहेमादिव्ययः भूमिसुवर्णादिदानं । कथम्भूतो वृथा व्यर्थः । क्व पात्रे संयुज्यमानमोक्षकारणगुणे गृहिणि । कथं विना । किं तत् सुकलत्रं सत्पत्नीं । अत्र दृष्टान्तमाह को भवति न कश्चित् । कोऽसौ गुण उपकारः । कस्मादम्बुसेकात् जलसेचनात् । क्व द्रुमे वृक्षे । किं क्रियमाणे दन्दश्यमाने गर्हितं भक्ष्यमाणे । कैः कीटैः घुणैः । क्व अन्तर्मध्ये ॥

अर्थः—ज्याची स्त्री धर्ममार्गानें चालणारी नाहीं अशा पात्रास भूमि, सुवर्ण वगैरे दान देणें व्यर्थ होय. याला दृष्टांत,—ज्याच्या कोटराच्या आंत कीटक लागून पोकरीत आहेत अशा वृक्षास वरून पाण्याचा वर्षाव करण्यांत लाभ कोणता?

विषयसुखोपभोगेनैव चारित्रमोहोदयोद्रेकस्य शक्यप्रतीकारत्वात्तद्वारेणैव तस्मादपवर्त्यात्मानमिव साधर्मिकमपि विषयेभ्यो व्युपरमयेदित्युपदेशार्थमाह—

आतां; विषयसुख भोगूनच चारित्रमोह कर्माच्या उदयाचा उद्रेक नाहींसा करणें शक्य असल्यामुळें; त्याच उपायानें तो उद्रेक नाहींसा करून, आपल्याप्रमाणेंच साधर्मिकासहि विषयापासून विरत करावें हें सांगतात.

विषयेषु सुखभ्रान्तिं ।
कर्माभिमुखपाकजाम् ॥
छित्वा तदुपभोगेन ।
त्याजयेत्तान् स्ववत्परम् ॥ ६२ ॥

टीका:—त्याजयेद्विमोचयेत् । कोऽसौ सद्गृही । कं परं कन्यादिदानेन विषयीक्रियमाणं साधर्मिकं । कान् तान् सुकलत्रादिविषयान् । किंवत् स्ववत् आत्मानं यथा । किं कृत्वा छित्वा प्रशमय्य । कां सुखभ्रान्तिं सुखयन्तीति सुखाः सुखहेतव इमे सुखं वेति विपर्यासमतिं । केषु विषयेषु । किंविशिष्टां कर्माभिमुखपाकजां कर्मणश्चारित्रमोहस्याभिमुखो निजफलदानोद्यतः पाको रसः कर्माभिमुखपाकस्तस्मात् जातां । छित्वा प्रशमय्य । कां सुखभ्रान्तिं । केन तदुपभोगेन विषयानुभवनेन ॥

अर्थः—आपलें फल देण्यास उद्युक्त झालेला जो चारित्रमोह कर्माचा रस त्यामुळें उत्पन्न झालेली जी विषयांच्या ठिकाणीं सुखाची भ्रांति ती विषयसेवनानेंच नाहींशी करून आपण विषयसुखापासून जसा विरत होतो त्याप्रमाणेंच साधर्मिकासहि विरत करावें.

दुष्षमाकालवशात्प्रायेण पुरुषाणामाचारविप्लवदर्शनाद्विचिकित्साकुलिताचित्तस्य दातुः सौचित्यविधानार्थं चतुरः श्लोकानाह—

आतां; विचारवान् लोकहि या पंचमकालच्या दुःस्वभावामुळें बहुतकरून तसे आचारवान् असत नाहींत, त्यामुळें कित्येक दात्यांचें चित्त संशयानें व्याकुळ होतें, तो संशय नाहींसा करण्यास चार श्लोक सांगतात.

दैवाल्लब्धं धनं प्राणैः ।
सहावश्यंविनाशि च ॥
बहुधा विनियुञ्जानः ।
सुधीः समयिकान् क्षिपेत् ॥ ६३ ॥

टीकाः—क्षिपेत् धिगिमान् सम्भाषणमात्रस्याप्ययोग्यानित्याद्यवर्णवादेन तिरस्कुर्यादिति काका न क्षिपेदिति प्रतिषेधे पर्यवस्यति । कोऽसौ सुधीः श्रेयोऽर्थी गृही । कान् समायिकान् समयाश्रितान् गृहस्थान् यतीन् वा । किं कुर्वाणो विनियुञ्जानो व्ययमानः । किं तत् धनं । कतिधा बहुधा बहुभिः प्रकारैः लज्जाभयपक्षपातादिभिः किंविशिष्टं धनं लब्धं प्राप्तं । कस्मात् दैवात्पुण्योदयान्न पुरुषकारात् तस्य संसारे गौणत्वात् । किंविशिष्टं अवश्यंविनाशि नियमेन गत्वरं कथं सह । कैः प्राणैः ॥

अर्थः—पूर्वपुण्याच्या उदयानें इह जन्मीं अनायासें मिळालेलें आणि आपल्या प्राणांबरोबरच नियमानें नाश पावणारें ह्मणजे मरणानंतर आपल्या उपयोगीं न पडणारें अर्थात् आपल्याबरोबर न येणारें असें जें धन; तें लज्जा, भय, पक्षपात वगैरे नानाप्रकारें खर्च करणारा असा कोण बरें बुद्धिमान् मनुष्य जिनमतावलंबी श्रावकांचा व यतींचा तिरस्कार करील! कोणीच करणार नाहीं. तात्पर्यः—आपण स्वतांकरितां जर आयतें मिळालेलें द्रव्य कार्याकार्याचा विचार न करितां हवें तसें खर्चून टाकितो तर आपल्या धर्मबंधूंची विपत्ति दूर करण्याचा समय आला कीं त्यांचे गुणावगुण काढून त्यांची निंदा कां करावी! करूं नये.

किं तर्हि कुर्यादित्याह—

तर काय करावें हें सांगतात.

विन्यस्यैदंयुगीनेषु ।
प्रतिमासु जिनानिव ॥
भक्त्या पूर्वमुनीनर्चेत् ।
कुतः श्रेयोऽतिचर्चिनाम् ॥ ६४ ॥

टीकाः—अर्चेत् पूजयेत् । कोऽसौ सद्गृही । कान् पूर्वमुनीन् प्राक्तनसाधून् कया भक्त्या । किं कृत्वा विन्यस्य नामादिविधिना निक्षिप्य । केषु ऐदंयुगीनेषु अस्मिन् युगे साधुषु । कास्विव कान् प्रतिमासु जिनानिव प्रतिबिम्बेष्वर्हतो यथा । यतः कुतो भवति न कुतश्चित् । किं तत् श्रेयः पुण्यं । केषां अतिचर्चिना अतिमात्रं क्षोदकाराणाम् ॥

अर्थः—आपण जशी रत्न पाषाणादिकांची मूर्ति करून तिला वृषभ, अजित वगैरे नांव देऊन तिची स्थापना करून पूजा करितों; त्याचप्रमाणें या पंचमकालांतल्या मुनींच्या ठायीं पूर्वकालच्या मुनींची कल्पना करून भक्तीनें त्यांचा यथायोग्य सत्कार करावा. कारण, फारच चौकशी

---

१ ॥ अत्राहुः श्रीसोमदेवपण्डिताः ॥

याविषयीं श्रीसोमदेव पंडित असें सांगतात कीं,—

भुक्तिमात्रप्रदाने तु का परीक्षा तपस्विनाम् ॥
ते सन्तः सन्त्वसन्तो वा शूद्रो दानेन शुध्यति ॥ १ ॥

अर्थः—नुसतें अन्नच जर द्यावयाचें आहे 'तर तपस्व्यांची परीक्षा काय करावयाची? ते तपस्वी चांगले असोत, कीं वाईट

करणारांस सुख कोठून मिळणार? मिळणार नाहीं. ह्मणून अशा कामांत गृहस्थानें फारसें खोदूं नये. कारण,--

पुनस्तदर्थसमर्थनार्थमाह—

भावो हि पुण्याय मतः ।
शुभः पापाय चाशुभः ॥
तद्दुष्यन्तमतो रक्षे- ।
द्धीरः समयभक्तितः ॥ ६५ ॥

---

असोत; तिकडे आपण लक्ष ठेऊं नये. कारण, दान देऊन शूद्रही शुद्ध होतो.

सर्वारम्भप्रवृत्तानां गृहस्थानां धनव्ययः ॥
बहुधाऽस्ति ततोऽत्यर्थं न कर्त्तव्या विचारणा ॥ २ ॥

अर्थः—सर्व प्रकारचे आरंभ ह्मणजे शेतकी वगैरे उद्योग करणाऱ्या गृहस्थांच्या द्रव्याचा व्यय या संसारांत पाहिजे त्या कामाकडे पाहिजे तितका होतो; तिकडे जर लक्ष पुरवीत नाहीं, तर दान देण्याविषयीं फारसा खोल विचार कां करावा? करूं नये.

यथा यथा विशिष्यन्ते तपोज्ञानादिभिर्गुणैः ॥
तथा तथाऽधिकं पूज्या मुनयो गृहमेधिभिः ॥ ३ ॥

अर्थः—तप, ज्ञान वगैरे गुणांनीं तपस्वी ज्या ज्या प्रमाणानें अधिक योग्यतेचे असतील त्या त्या मानानें आदर करून गृहस्थांनीं यतींची पूजा करावी.

दैवाल्लब्धं धनं धन्यैर्वप्तव्यं समयाश्रिते ॥
एको मुनिर्भवेल्लभ्यो न लभ्यो वा यथागमम् ॥ ४ ॥

अर्थः—जे पुण्यवान् पुरुष आहेत त्यांनीं आपणास पूर्वपुण्यानें

**टीका :**— हि यस्मात् । पुनरिष्टः । कोऽसौ भावः परिणामः । कस्मै पुण्याय सुकृतनिमित्तं । किंविशिष्टः शुभः प्रशस्तः । तथा मतः । कोऽसौ भावः । किंविशिष्टोऽशुभोऽप्रशस्तः । कस्मै पापाय पातकनिमित्तं । यत एवमतः एतस्मात्कारणात् । रक्षेन्निवारयेत् । कोऽसौ धीरोऽविकारप्रकृतिः । कं तं भावं । किं कुर्वन्तं दुष्यन्तं विकुर्वाणं । कस्मात् समयभक्तितः जिनशासनं कलौ धारयन्तोऽमी अतो जिनवन्मान्या इत्यनुरागबुध्द्या ॥

---

मिळालेलें द्रव्य, आपल्या धर्माचे जे यति किंवा श्रावक असतील त्यांच्याकरितां यथायोग्य खर्च करीत असावें. शास्त्रांत वर्णिल्याप्रमाणें एकसुद्धां मुनि मिळेल किंवा न मिळेल हें खात्रीनें सांगवत नाहीं; म्हणून त्याबद्दल फारसा विचार न करितां भक्तीनें त्यांना दान द्यावें. कारण,

उच्चावचजनप्रायः समयोऽयं जिनेशिनाम् ॥
नैकस्मिन्पुरुषे तिष्ठेदेकस्तम्भ इवालयः ॥ ५ ॥

अर्थः—हा आपला जिनधर्म उच्च व कनिष्ठ अशा दोन्ही तऱ्हेच्या पुरुषांनीं भरलेला आहे. तेव्हां एका खांबावर घर जसें रहात नाहीं, त्याप्रमाणें एकाच पुरुषावर हा जिनधर्म अवलंबून असावयाचा नाहीं.

ते नामस्थापनाद्रव्यभावन्यासैश्चतुर्विधाः ॥
भवन्ति मनुयः सर्वे दानमानादिकर्मसु ॥ ६ ॥

अर्थः—ते मुनि नाम, स्थापना, द्रव्य व भाव अशा भेदांनीं चार प्रकारचे असतात, ते सगळेही दान मान वगैरे क्रियेस पात्र होत. पण त्यांत विशेष हाच कीं,

उत्तरोत्तरभावेन विधिस्तेषु विशिष्यते ॥
पुण्यार्जने गृहस्थानां जिनप्रतिकृतिष्विव ॥ ७ ॥

अर्थः—भाव ह्मणजे मनाचा परिणाम, तो शुभ असला ह्मणजे पुण्य घडतें आणि अशुभ असला तर पाप घडतें. याकरितां तो भाव जर आपल्या चित्तास विकार करूं लागला ह्मणजे तो अशुभ होऊं लागला, तर धैर्यवंतानें जिनधर्मावर भक्ति ठेवून त्याचें निवारण करावें. पुण्य व पाप हीं दोन्ही भावावर अवलंबून आहेत ह्मणून भाव हे शुभ ठेवावे.

ज्ञानतपसोः पृथक् समुदितयोश्च तद्वतां च पूज्यत्वे युक्तिमाह—

ज्ञानमर्च्यं तपोऽङ्गत्वात् ।
तपोऽर्च्यं तत्परत्वतः ॥
द्वयमर्च्यं शिवाङ्गत्वात् ।
तद्वन्तोऽर्च्या यथागुणम् ॥ ६६ ॥

टीका:— अर्च्यं पूज्यं गृहिणां । किं तत् ज्ञानं साधकस्थं दीक्षायात्राप्रतिष्ठाद्युपयोगि । कुतस्तपोऽङ्गत्वादनशनादितपोनिमित्तत्वात् । तथा अर्च्यं किं तत् तपो नैष्ठिकस्थं कस्मात्तत्परत्वतः ज्ञानातिशयहेतुत्वात् ज्ञानं परमुत्कृष्टं यस्मादिति व्युत्पत्याश्रयणात् । तथा अर्च्यं । किं तत् द्वयं ज्ञानतपोयुगलं गणाधिपस्थं । कस्मात्

---

अर्थः—नाममुनीपेक्षां स्थापना मुनि, स्थापनामुनीपेक्षां द्रव्यमुनि व द्रव्यमुनीपेक्षां भावमुनि याप्रमाणें एकापेक्षां एक अधिक असे ते मुनि गृहस्थांस पुण्यार्जन करण्यास जिनप्रतिमेप्रमाणें पूज्य होत. आणखीं असें कीं—

काले कलौ चले चित्ते देहे चान्नादकीटके ॥
एतच्चित्रं यदद्यापि जिनरूपधरा नराः ॥ ८ ॥

शिवाङ्गत्वान्मोक्षकारणत्वात् । तथा अर्च्याः के ते तद्वन्तो ज्ञानिनस्तपस्विनो ज्ञानतपोयुक्ताश्च । कथं यथागुणं यो यो गुणो यस्याधिकस्तेन तेन तं तं विशेषेण पूजयेर्दित्यर्थः ॥

अर्थः—ज्ञान ह्मणजे दीक्षा, यात्रा, प्रतिष्ठा वगैरे कर्मं कशा प्रकारें करावींत हें ज्यांमुळें समजतें असें शास्त्रज्ञान होय. हें तपश्चर्येचें साधन असल्यामुळें—अर्थात् उपवासादि तपें कोणत्या तऱ्हेनें करावींत हें समजण्यास साधन असल्यामुळें—पूज्य आहे. तप—ह्मणजे उपवासादि तप—हें ज्ञान वाढविणारें असल्यामुळें पूज्य आहे आणि ज्ञान व तप हीं दोन्ही मोक्षाचीं साधनें असल्यामुळें पूज्य आहेत. त्यांत प्रथम सांगितलेलें ज्ञान हें साधकाच्या ठिकाणीं असतें ह्मणून त्या ज्ञानाच्या पूज्यतेमुळें तोहि पूज्य आहे. तप हें नैष्ठिकाच्या ठिकाणीं असतें ह्मणून तपाच्या पूज्यतेमुळें तो नैष्ठिक सुद्धां पूज्य होय. आणि ज्ञान व तप हीं दोन्हीं गणधरांच्या ठिकाणीं असतात, तेव्हां त्या दोहोंच्या पूज्यतेमुळें ते गणधरहि पूज्य होत. ह्यांत साधकापेक्षां नैष्ठिक व त्यापेक्षां गणधर हे क्रमानें अधिकाधिक पूज्य होत; असें जाणावें.

---

अर्थः—हा काल कलीचा आहे, तेव्हां चित्त हें चंचल असतें आणि हा देह ह्मणजे अन्न खाऊन जगणारा एक प्रकारचा किडा आहे, अशा स्थितींतही जिनरूप धारण करणारे पुरुष दृष्टीस पडतात, हेंच आश्चर्य.

यथा पूज्यं जिनेन्द्राणां रूपं लेपादिनिर्मितम् ॥
तथा पूर्वमुनिच्छायाः पूज्याः सम्प्रति संयताः ॥ ९ ॥

अथ मिथ्यादृष्टेश्च सुपात्रेष्वेवान्नदानादुत्पन्नस्य पुण्यस्य फलविशेषमपात्रे चार्थविनियोगस्य वैयर्थ्यं प्रतिपादयितुमाह—

**आता; कोणत्या पात्रास आहारदान देऊन कोणत्या मनुष्यास काय फळ प्राप्त होतें हें वर्णितात.**

न्यङ्मध्योत्तमकुत्स्यभोगजगतीभुक्तावशेषाद्वृषा- ।
त्तादृक्पात्रवितीर्णभुक्तिरसुदृग्देवो यथास्वं भवेत् ॥
सद्दृष्टिस्तु सुपात्रदानसुकृतोद्रेकात्सुभुक्तोत्तम- ।
स्वर्भूमर्त्यपदोऽश्नुते शिवपदं व्यर्थस्त्वपात्रे व्ययः ६७

टीका:— भवेत् जायेत । कोऽसौ असुदृङ्मिथ्यादृष्टिर्जीवः । किं भवेत् देवः सुरः । कथं यथास्वं यद्यत्स्वमात्मीयं दानं तत्तदनतिक्रमेणेत्यर्थः । किंविशिष्टः सन् तादृक्पात्रवितीर्णभुक्तिः तादृग्भ्यो न्यग्मध्योत्तमकुत्सितेभ्यः पात्रेभ्यो वितीर्णा दत्ता भुक्तिराहारो येन स तथोक्तः । कस्माद्भवेत् वृषात् पुण्यविशेषात् । किंविशिष्टात् न्यगित्यादि न्यक् जघन्य एकपल्योपमभोग्यत्वात् । उत्तमास्त्रिपल्योपमभोग्यत्वात् । कुत्स्यः सुस्वादुमृत्पुष्पफलाशनवृत्तित्वादेकोरुकादिदेहयोगाच्च । न्यक्च मध्यश्च उत्तमश्च कुत्स्यश्च न्यग्मध्योत्तमकुत्स्यास्ते च ते भोगाश्च न्यग्मध्योत्तमकुत्स्यभोगास्तैरुपलक्षिता जगत्यो भूमयो जघन्यभोगभूमिर्मध्यमभोगभूमिरुत्तमभोगभूमिः कुभोगभूमिश्चेति चतस्रस्तासु भुक्तः कल्पवृक्षादिसम्पादितेष्टविष-

---

अर्थः—ज्याप्रमाणें आपण जिनाचें चित्र काढून त्याची पूजा करितों; त्याप्रमाणें हल्लींचे जे तपस्वी आहेत ते पूर्वकाळच्या मुनींचे प्रतिरूप होत असें जाणून त्यांची पूजा करावी.

योपभोगमुखेन निर्जीर्णश्चासाववशेषश्चोध्दृतो यो वृषस्तमात् । तत्र मिथ्यादृष्टिर्जघन्यपात्राय सुदृष्टिलक्षणायाहारदानं दत्वा जघन्यभोगभूमौ मध्यमपात्राय सम्यक्त्वाणुव्रतपवित्राय मध्यमभोगभूमावुत्तमपात्राय सम्यग्दर्शनमहाव्रतभूषिताय चोत्तमभोगभूमौ निरातङ्कभोगान् भुक्त्वा स्वायुःक्षये यथाभाग्यं स्वर्गे गच्छेत् । तत्तत्पात्रसान्निधानात्तथाविधशुभपरिणामविशेषोपपत्त्या तादृक्पुण्यप्रचयानुभावात् स एव च कुपात्राय सम्यक्त्वरहितव्रततपोयुक्तायाहारं दत्वा कुभोगभूमौ निर्भूषविवस्त्रगुहावृक्षमूलनिवास्येकोरुकादिशरीरो भूत्वा स्वसमानपत्न्या सह यथास्वं निराबाधतया भोगं भुक्त्वा पल्योपममात्रस्वायुःक्षये मृत्वा स्वर्गे वाहनदेवो वा ज्योतिषो वा व्यन्तरो वा भवनवासी वा भूत्वा दीर्घं दुर्गतिदुःखानि भुञ्जन् संसरति । किं च ये भोगभूमिषु ये च मानुषोत्तरपर्वताद्बहिः प्राक् स्वयम्प्रभपर्वतात्तिर्यञ्चो ये च म्लेच्छराजगजतुरगादयो वेश्यादयो वा नीचात्मानो भोगभाजो दृश्यन्ते ते सर्वे कुपात्रदानतो यथापरिणाममुत्पन्नेन मिथ्यात्वसहचारिणा पुण्येन तथा स्युरिति निर्णयः । अश्नुते प्राप्नोति । कोऽसौ सद्दृष्टिः सम्यक्त्वविशुद्धो जीवः । तुर्विशेषे । किं शिवपदं । किम्भूतो भूत्वा सुष्टु यथेष्टं भुक्तानि उत्तमानि महर्द्धिकानि स्वर्भुवां कल्पोपपन्नदेवानां मर्त्यानां च चक्रवर्त्यादीनां पदानि येन स सुभुक्तोत्तमस्वर्भूमर्त्यपदः । कस्मात् सुपात्रदानसुकृतोद्रेकात् सुपात्राय महातपोधनाय त्रिविधपात्राय वा दानमनुग्रहार्थं स्वस्यातिसर्गस्तस्माज्जातं सुकृतं पुण्यं तस्योद्रेकादुदयात् । भवेत् । कोऽसौ व्ययः अर्थविनियोगः । क्व अपात्रे सम्यक्त्वव्रतरहितप्राणिनि । किंविशिष्टो व्यर्थो विपरीतफलो निष्फलो वा ॥

**अर्थः—जघन्य, मध्यम, उत्तम व कुत्सित या चार**

प्रकारच्या पात्रांस आहारदान देणारा मिथ्यादृष्टि मनुष्य मरणानंतर जघन्य, मध्यम, उत्तम व कुत्सित या चार प्रकारच्या भोगभूमींत जन्म घेऊन तेथील कल्पवृक्षांपासून मिळणारें इच्छितसुख भोगून तेथील आयुष्य संपल्यावर उरलेल्या पुण्यानें पूर्वी जसें दान दिलें असेल त्या मानानें सुख जेथें आहे, अशा स्वर्गांतील देवपदास पोंचतो.

---

१ पात्रापात्रे लक्षणशास्त्रं यथा।

पात्र व अपात्र यांचें लक्षण —

उत्कृष्टपात्रमनगारमणुव्रताढ्यं।
मध्यं व्रतेन रहितं सुदृशं जघन्यम्॥
निर्दर्शनं व्रतनिकाययुतं कुपात्रं।
युग्मोज्झितं नरमपात्रमिदं हि विद्धि॥ १ ॥

अर्थः---अनगार ह्मणजे महाव्रती दिगंबर मुनि उत्तम पात्र होय. अणुव्रती सम्यग्दृष्टि मध्यमपात्र होय. व्रतरहित सम्यग्दृष्टि जघन्य पात्र होय. हे तिघे सत्पात्र होत. सम्यग्दर्शनरहित व्रती जीव कुपात्र होय आणि व्रत व सम्यक्त्व हीं दोन्हीं ज्यास नाहींत तें अपात्र जाणावें.

उत्तमपत्तं साहू मज्झमपत्तं च सावया भणिया॥
अविरदसम्माइट्ठी जहण्णपत्तं मुणेयव्वम्॥ २ ॥

अर्थः—उत्तम पात्र साधु, मध्यम पात्र अणुव्रती श्रावक आणि जघन्य पात्र व्रतहीन सम्यग्दृष्टि असें जाणावें.

मिथ्यात्वग्रस्तचित्तेषु चारित्रा××भागिषु॥
दोषायैव भवेद्दानं पयःपानमिवाहिषु॥ १ ॥

अर्थः—जे मिथ्यात्वी व्रतिक आहेत त्यांना दान देणें ह्मणजे

स्पष्टीकरण—जघन्यपात्रास दान देणारा मिथ्यादृष्टि जीव मरणानंतर जघन्य भोगभूमींत जन्म पावतो. तेथें एक पल्योपम आयुष्य असतें. त्यानंतर तो स्वर्गीं देव होऊन जन्मतो. मध्यमपात्रास दान देणारा मिथ्यादृष्टि जीव मरणानंतर मध्यम भोगभूमींत जन्मतो. तेथें दोन पल्योपम आयुष्य असतें. त्यानंतर तो स्वर्गीं देवपदास पावतो. उत्तमपात्रास दान देणारा मनुष्य मरणानंतर उत्तम भोगभूमींत जन्म पावतो. तेथें तीन पल्योपम आयुष्य असतें. त्यानंतर तो स्वर्गीं देवपदास पावतो. कुत्सित ह्मणजे कुपात्रास दान देणारा मिथ्यादृष्टि मनुष्य मरणानंतर कुभोगभूमींत जन्म पावतो. जेथें जीव पशु होऊन जन्मतात त्याला कुभोगभूमि ह्मणतात. तेथें एक पल्योपम आयुष्य असतें. आणि रहावयास चांगल्या

---

सर्पास दूध पाजाविणें होय. म्हणजे मोठा अपराधच होय. असें असूनही—

कारुण्यादथवौचित्यात्तेषां किञ्चिद्दिशन्नपि ॥
दिशेदुध्दृतमेवान्नं गृहे भुक्तिं न कारयेत् ॥ २ ॥

अर्थः—जर कदाचित् करुणाबुद्धीनें अगर मित्रत्वानें त्यांस कांहीं द्यावेंसें वाटलें तर उचललच द्यावें. घरीं जेवावयास घालूं नये.

सत्कारादिविधावेषां दर्शनं दूषितं भवेत् ॥
यथा विशुद्धमप्यम्बु विषभाजनसंगमात् ॥ ३ ॥

अर्थः—यांचा ह्मणजे या मिथ्यादृष्टि व्रतिकांचा सत्कार वगैरे केल्यास, करणाराचें सम्यक्त्व–विषपात्रांत ठेविलेल्या जलाप्रमाणें–दूषित होईल.

चांगल्या गुहा, दरी व वृक्षांचे आश्रय असतात आणि खावयास स्वादिष्ट गवत, माती, फळें, फुलें वगैरे असतात. कुभोगभूमींतील एक पल्योपम आयुष्य संपल्यावर ते जीव स्वर्गी वाहनदेव, ज्योतिष्कदेव, व्यंतरदेव भवनवासी देव होऊन शेवटीं दुर्गतीस जातात. भोगभूमींत, मानुषोत्तर पर्वताच्या पलीकडे व स्वयंप्रभ पर्वताच्या अलीकडे जे कांहीं सुखी तिर्यंच, म्लेंछ राजे व गज, तुरग आणि वेश्या वगैरे सुखी जीव दृष्टीस पडतात, ते सगळे कुपात्रदानानें तसे झालेले आहेत असें समजावें. आणि सम्यग्दृष्टि जीव सुपात्रास ह्मणजे उत्तम, मध्यम व जघन्य यांपैकीं कोणत्याही सत्पात्रास दान देऊन त्या योगानें प्राप्त झालेल्या पुण्योदयामुळें उत्तम भोगभूमींत अनायासें सुख भोगून त्या नंतर स्वर्गीं उत्तम देव होतो. आणि त्यानंतर मनुष्य लोकीं उत्तम राजपदाचा अनुभव घेऊन शेवटीं जिनदीक्षा

---

१ पात्राय विधिना दत्वा दानं मृत्वा समाधिना ॥
अच्युतान्तेषु कल्पेषु जायन्ते शुद्धदृष्टयः ॥ १ ॥

ज्ञात्वा धर्मप्रसादेन तत्र प्रभवमात्मनः ॥
पूजयन्ति जिनार्च्यास्ते भक्त्या धर्मस्य वृद्धये ॥२॥

अर्थः—सत्पात्रास विधिपूर्वक दान देऊन शेवटीं जे सम्यग्दृष्टि जीव समाधीनें (चित्त शांत ठेऊन धर्मध्यानानें) मरण पावतात; ते अच्युत स्वर्गापर्यंत खालच्या कोणत्याही स्वर्गांत देव होऊन जन्मतात. तेथें जन्मतांच त्या देवांना असें कळून येतें कीं, “आपण येथें धर्मप्रभावानें देव होऊन जन्मलों.” मग ते धर्मवृद्धीकरितां भक्तीनें जिनेंद्राची पूजा करितात.

घेऊन शिवपदास पोंचतो. असा सत्पात्रदानाचा महिमा आहे. जे अपात्र आहेत ह्मणजे सम्यग्दर्शनरहित व व्रतरहितही असे जे जीव आहेत, त्यांनां दान देणें व्यर्थ ह्मणजे निष्फळ होय.

इदानीं पात्रदानपुण्योदयफलभाजां भोगभूमिजानां जन्मप्रभृति सप्ताहसप्तकभाविनीरवस्था निर्देष्टुमाह—

आतां; भोगभूमींत जन्मणाऱ्या प्राण्यास सात सप्ताह पर्यंत होणाऱ्या अवस्थांचें वर्णन करितात.

सप्तोत्तानशया लिहन्ति दिवसान् स्वांगुष्ठ-
मार्यास्ततः। कौ रिङ्गन्ति ततः पदैः कलगिरो
यान्ति स्खलद्भिस्ततः॥ स्थेयोभिश्च ततः
कलागुणभृतस्तारुण्यभोगोद्गताः। सप्ताहेन
ततो भवन्ति सुदृगादानेऽपि योग्यास्ततः॥६८॥

टीका—लिहन्ति आस्वादयन्ति। के आर्याः भोगभूमिज-

---

१ अपात्रदानतः किञ्चिन्न फलं पापतः परम्॥
लभ्यते हि फलं खेदो वालुकापुञ्जपेषणे॥१॥

अर्थः—अपात्रदानापासून पातकावांचून दुसरें फळ नाहीं. वाळूचा ढीग पिसण्यांत खेदावांचून दुसरें कांही मिळेल काय? त्याप्रमाणें अपात्रदानापासून खेदच होणार.

अपात्राय धनं दत्ते यो हित्वा पात्रमुत्तमम्॥
साधुं विहाय चौराय तदर्पयति स स्फुटम्॥२॥

अर्थः—जो गृहस्थ सत्पात्रास सोडून अपात्रास धन देतो, तो साधूस सोडून चोरास धन देतो, असें जाणावें.

मनुजाः । कं स्वांगुष्ठं । कान् दिवसान् । कति सप्त जन्मानन्तरं सप्ताहमित्यर्थः । किंविशिष्टाः सन्तः उत्तानशया उत्तानमनधोमुखं शेरते । ततः प्रथमसप्ताहानन्तरं । रिङ्गन्ति पद्भ्यां सर्पन्ति । के आर्याः । कस्यां कौ भूमौ । कान् सप्तदिवसान् । ततो द्वितीयसप्ताहानन्तरं । यान्ति सञ्चरन्ति । के आर्याः । कस्यां कौ । कैः पदैः पादन्यासैः । किं कुर्वद्भिः स्खलद्भिर्यत्रतत्रपतद्भिः । किंविशिष्टाः सन्तः कलगिरो मनोहरवाचः । ततस्तृतीयसप्ताहानन्तरं आर्याः सप्ताहेन सप्तभिर्दिनैः स्थेयोभिः स्थिरतरैः पदैः यान्ति गच्छन्ति कस्यां कौ पृथिव्यां । ततश्चतुर्थसप्ताहानन्तरमार्याः सप्ताहेन सप्तभिर्दिनैः कलगीतादिगुणाँश्च लावण्यादीन् बिभ्रतो भवन्ति । ततः पञ्चमसप्ताहानन्तरं सप्ताहेनार्याः तारुण्यभोगोद्भता उदितोदितयौवना अविच्छिन्नमद्यादीष्टविषयाश्च भवन्ति । ततः षष्ठसप्ताहानन्तरं सप्ताहेनार्याः योग्या भवन्ति । क सुदृगादाने सम्यक्त्वग्रहणे । अपिर्विस्मये ॥

**अर्थः**—भोगभूमींत जन्मलेल्यांस आर्य ह्मणतात. १ ते आर्य जन्म झाल्या दिवसापासून सात दिवसपर्यंत उताणे ह्मणजे वर तोंड करून निजून आपले अंगुष्ठ चोखितात. २ त्यानंतर सात दिवसपर्यंत जमिनीवर रांगतात. ३ त्यानंतर सात दिवस ते आर्य मधुर भाषणें करीत अडखळत अडखळत चालतात. ४ त्यानंतर सात दिवसपर्यंत न अडखळतां जमिनीवर चालतात. ५ त्यानंतर सात दिवसांत गायन वगैरे कला व लावण्य वगैरे गुण प्राप्त होतात. ६ त्यानंतर सात दिवसांत तारुण्य प्राप्त होतें आणि त्यामुळें तेथील सर्व भोग भोगण्यास समर्थ होतात. ७ आणि त्यानंतर सात दिवसांत सम्यक्त्व

ग्रहण करण्यास समर्थ होतात!

अथ मुनिदेयनिर्णयार्थमाह—

आतां; मुनीला दान देण्याचे पदार्थ सांगतात.

तपःश्रुतोपयोगीनि ।
निरवद्यानि भक्तितः ॥
मुनिभ्योऽन्नौषधावास- ।
पुस्तकादीनि कल्पयेत् ॥ ६९ ॥

टीका—कल्पयेदुपकारयेत् । सद्गृही । कानि अन्नौषधावासपुस्तकादीनि । आदिशब्देन पिच्छिकाकमण्डल्वादीनि । केभ्यो मुनिभ्यः संयतेभ्यः । कस्मात् भक्तितः । किंविशिष्टानि तपःश्रुतोपयोगीनि तपसः श्रुतज्ञानस्य चोपकारकाणि । पुनः किंविशिष्टानि निरवद्यानि पिण्डशुध्युक्तोद्गमोत्पादनादिदोषरहितानि ॥

अर्थः—तप आणि शास्त्र ह्यांच्या उपयोगी आणि निर्दोष असें अन्न, औषध, आवास ह्मणजे रहाण्यास एकांत असें ठिकाण, पुस्तक, आदिशब्दानें पिंछ, कमंडलु वगैरे पदार्थ मुनींस द्यावे.

अन्नादिदानफलानां क्रमेण निदर्शनान्याह—

आतां; अन्नादिदानाचें फळ क्रमानें सांगतात.

भोगित्वाद्यन्तशान्तिप्रभुपदमुदयं संयतेऽन्नप्रदाना- । च्छ्रीषेणो रुग्निषेधाद्धनपतितनया प्राप सर्वौषधर्धिम् ॥ प्राक्तज्जन्मर्षिवासावनशुभकरणात्सूकरः स्वर्गमग्र्यं । कौण्डेशः

पुस्तकार्चावितरणविधिनाऽप्यागमाम्भोधि-
पारम् ॥ ७० ॥

टीकाः—प्राप लब्धवान् । कोऽसौ श्रीषेणो नाम राजा । कमुदयमभ्युदयं । किंविशिष्टं भोगित्वाद्यन्तशान्तिप्रभुपदं भोगित्वमुत्तमभोगभूमिजत्वमादावन्ते च शान्तिप्रभोः शान्तिनाथतीर्थङ्करस्य पदं यस्य तं । कस्मादन्नप्रदानात् विधिवदाहारवितरणात् । क्व संयते संयमभाजि आदित्यगत्याख्यारिञ्जयसंज्ञचारणर्षियुगले । बीजत्वमात्रविवक्षाऽत्र । तथाविधाभ्युदयस्योत्तरपुण्यविशेषोदयसम्पाद्यत्वात् तथा प्राप काऽसौ धनपतितनया वृषभसेनाभिधाना पूर्वभवे राज्ञो देवकुलस्य सम्मार्जिका । कां प्राप सर्वौषधर्द्धिं सर्वेषां ज्वरातिसारादिव्याधीनामौषधं चिकित्सितं तस्य ऋद्धिरव्याहतसिद्धिस्तां कस्मात् रुग्निषेधात् व्याधिप्रतीकारादौषधादेः दोषनिषेधात् । क्व संयते तपोधने । तथा प्राप । कोऽसौ सूकरो वराहः । कं स्वर्गं किंविशिष्टमग्र्यं सौधर्मे महर्द्धिकदेवत्वमित्यर्थः । कस्मात् प्रागित्यादि प्राक्च पूर्वं तच्च तात्कालिकं च प्राक्ते । प्राक्ते च ते जन्मनी च प्राक्तज्जन्मनी तयोः । ऋषेर्वासावने निवासरक्षणे तयोः शुभकारणः शुभाभिसन्धिपरिणामस्तस्मात् । पूर्वभवे मुनेरावासदानाभिप्रायेण तद्भवे च रक्षणाभिप्रायेणेत्यर्थः । तथा कौण्डेशोऽपि गोविन्दाख्यगोपालचरो ग्रामकूटपुत्रः सन् कौण्डेशो नाम मुनिश्च । प्राप । कं आगमाम्भोधिपारं द्वादशाङ्गश्रुतसागरपर्यन्तं । केन पुस्तकस्य अर्चायाः पूजायाः वितरणस्य च दानस्य विधिना करणेन ॥

**अर्थः—श्रीषेण नांवाचा कोणी एक राजा होता. त्यानें प्रथम आदित्यगति व अरिंजय या दोघां चारण मुनींस विधिपूर्वक आहार दिला होता, त्यामुळें तो**

उत्तम भोगभूमींत जन्मून नंतर स्वर्गलोकीं सुख भोगून त्यानंतर शेवटीं तो शांतिनाथ नांवाचा तीर्थंकर झाला. पूर्वभवांत एका राजाच्या देवघरांत झाडलोट करणारी कोणी एक बाई होती; तिणें औषधदान केलें होतें त्यामुळें ती पुढें धनपति नांवाच्या श्रेष्ठीची वृषभसेना नांवाची कन्या झाली आणि त्या वेळीं तिला औषध नांवाची ऋद्धि प्राप्त झाली. ह्मणजे तिच्या हातच्या औषधांनीं कोणतेही रोग तत्काल बरे होत असत. एक सूकर ( रानडुकर ) होता, तो शुभ अंतःकरणानें मुनींच्या गुहेचें रक्षण करीत असे, त्यामुळें तो पुढें सौधर्म स्वर्गांत महर्द्धिक देव झाला. गोविंद नांवाचा कोणी एक गुराखी होता, तो शास्त्रदान करीत होता, त्यामुळें तो पुढें कौण्डेश नांवाचा मुनी होऊन शास्त्ररूपी समुद्रांत पारंगत झाला.

जिनधर्मानुबन्धार्थमसतां मुनीनामुत्पादने सतां च गुणातिशयसम्पादने प्रयत्नविधापनार्थमाह—

आतां; जिनधर्माची परंपरा नीट चालण्याकरितां मुनिलोकांची उत्पत्ति करावी; आणि जे असतील त्यांचा उत्कर्ष करावा, ह्मणून उपदेश करतात.

जिनधर्मं जगद्बन्धु- ।
मनुबध्दुमपत्यवत् ॥
यतीन् जनयितुं यस्येत् ।
तथोत्कर्षयितुं गुणैः ॥ ७१ ॥

टीकाः—यस्येत् प्रयतेत । सद्गृही । किं कर्तुं जनयितुं अपूर्वोनुत्पादायितुं । कान् यतीन् साधून् । किंवत् अपत्यवत् पुत्रा-

न्यथा । किं कर्तुं अनुबध्दुं सन्तत्या प्रवर्तयितुं । कं जिनधर्मं । किंविशिष्टं जगद्बन्धुं लोकानामुपकारकं । तथा यस्येत् । किं कर्तुं उत्कर्षयितुं उत्कृष्टान् कर्तुं । कान् वर्तमानान् यतीन् । कैर्गुणैः श्रुतज्ञानादिभिः । जिनधर्ममित्यादि पूर्ववदत्रापि योज्यम् ॥

**अर्थ;—आपल्या कुलाची परंपरा सतत चालण्याकरितां आपण पुत्राकरितां जशी खटपट करितों—त्याचप्रमाणें जगावर उपकार करणारा जो जिनधर्म तो सतत चालावा ह्मणून नवीन साधु निर्माण करावे; ह्मणजे चांगले चांगले सज्जन पाहून त्यांना दीक्षा घ्यावयास सांगून मुनि बनवावे आणि असलेले जे मुनि त्यांचा ज्ञान वगैरे गुणांनीं उत्कर्ष करण्यास यत्न करावा.**

सम्प्रति पुरुषाणां दुष्कर्मगुणत्वाद्गुणातिशयासिद्धेर्दर्शनात्तदुत्पादने निष्फलः प्रयत्न इति गृहिणां मनोभङ्गनिषेधार्थमाह—

**आतां; या पंचम कालांत मुनि झाले तरी त्यांच्या ठिकाणीं उत्कृष्ट गुण सिद्ध होत नाहींत; ह्मणून त्यांची उत्पत्ति करणें व्यर्थ आहे, असें ह्मणणारांस सांगतात.**

श्रेयो यत्नवतोऽस्त्येव ।
कलिदोषाद्गुणद्युतौ ॥
असिद्धावपि तत्सिद्धौ ।
स्वपरानुग्रहो महान् ॥ ७२ ॥

टीका:—अस्त्येव नियमेन भवति । किं तत् श्रेयः पुण्यं । कस्य यत्नवतः प्रयतमानस्य गृहस्थस्य । कस्मिन्विषये गुणद्युतौ गुणातिशयशालिनां विषये । कस्यां सत्यां असिद्धावपि आवृत्त्या गुण-

द्युतावनिष्पत्तावपि । कस्मात् कलेः पञ्चमकालस्य पापकर्मणो वा दोषादपराधात् प्रातिलोम्यादित्यर्थः । तत्सिद्धौ महालाभमाह । भवति कोऽसौ स्वपरानुग्रहः स्वस्य वैय्यावृत्यकरस्य परस्य च साधर्मिकस्य सामान्यजनस्य च अनुग्रह उपकारः । किंविशिष्टो महान् विपुलः । कस्यां सत्यां तत्सिद्धौ तेषां गुणद्युतां निष्पत्तौ । कस्मात् कलिदोषाद्दुष्कर्मप्रतिघातात् दैवदुर्योगादित्यर्थः ॥

**अर्थ—या कलिकालाच्या ( पंचमकालाच्या ) दोषामुळें जरी गुणांनीं शोभणारे असे मुनि सिद्ध झाले नाहींत तरी त्याविषयीं ह्मणजे गुणवान् मुनि व्हावेत ह्मणून यत्न करणारांस श्रेय ह्मणजे पुण्य आहेच, आणि जर कदाचित् त्यांच्या ठिकाणीं चांगले गुण सिद्ध झाले तर आपल्यावर व आपल्या समानधर्मी श्रावकांवर मोठा अनुग्रहच होणार.**

महाव्रतमणुव्रतं वा बिभ्रत्यः स्त्रियोऽपि धर्मपात्रतयाऽनुग्राह्या इति समर्थयितुमाह—

**आतां; आणखीं कोणाचा सत्कार करावा हें सांगतात.**

**आर्यिकाः श्राविकाश्चापि ।**
**सत्कुर्याद्गुणभूषणाः ॥**
**चतुर्विधेऽपि सङ्घे यत् ।**
**फलत्युसमनल्पशः ॥ ७२ ॥**

**टीकाः**—सत्कुर्याद्यथोक्तविनयप्रतिपत्त्यादिना आवर्जयेत् सद्गृही । काः आर्यिका उपचरितमहाव्रतधराः स्त्रीः । न केवलं ताः श्राविकाश्च यथाशक्तिमूलोत्तरगुणभृतः तदुपासिकाश्च । अपिशब्दान्न केवलं व्रतिन्योऽव्रतिनीरपि सन्मानयेदित्यर्थः । किंविशिष्टाः गुणभूषणाः गुणाः श्रुततपःशीलादयो भूषणान्यलङ्करणानि यासां ताः । यद्यस्मात्

फलति इष्टं सम्पादयति । किं तत् उप्तं विधिवत्प्रयुक्तं भक्तवस-त्यादि । क सङ्घे गुणसङ्घाते प्राणिगणे । किंविशिष्टे चतुर्विधे यत्यार्यिकाश्रावकश्राविकाप्रकारे । न केवलमर्हच्चैत्यचैत्यालयश्रुतेषु विधिवत्प्रयुक्तमात्मीयं धनमल्पशः प्रभूतं भूत्वा फलति किं तर्हि सङ्घेऽपीत्यपिशब्दार्थः । एतेन सप्त गृहिणो धनव्ययस्थानानीत्यु-पदिष्टं वेदितव्यम् ॥

**अर्थः**— उपचारानें महाव्रत पाळणाऱ्या अशा ज्या आर्यिका आणि गुण, शील वगैरे पाळणाऱ्या ज्या श्राविका त्यांचा दान मानानें यथायोग्य सत्कार करावा. कारण, जिनबिंब, जिनालय वगैरे निर्माण करण्यांत द्रव्य खर्चिलें ह्मणजे जसें पुष्कळ फळ प्राप्त होतें, त्याप्रमाणेंच ऋषि (मुनि), आर्यिका, श्रावक व श्राविका या चार प्रकारच्या संघाच्या हिताकरितांही खर्चिलेलें द्रव्य पुष्कळसें फळ देतें.

एवं धर्मपात्रानुग्रहं गृहस्थस्यावश्यकार्यतयोपदिश्य सम्प्रति कार्यपात्रानुग्रहविध्युपदेशार्थमाह—

याप्रमाणें धर्मपात्रावर अनुग्रह करणें हें गृहस्थांचें अवश्य कर्तव्य आहे, हें सांगून आतां कार्यपात्रावर अनुग्रह करण्याचा विधि सांगतात.

धर्मार्थकामसध्रीचो ।
यथौचित्यमुपाचरन् ॥
सुधीस्त्रिवर्गसम्पत्त्या ।
प्रेत्य चेह च मोदते ॥ ७४ ॥

**टीकाः**—मोदते प्रल्हादते । कोऽसौ सुधीः सद्बुध्दिः । कया त्रिवर्गसम्पत्त्या धर्मार्थकामसम्पदा । क प्रेत्य जन्मान्तरे । इहास्मि-

ज्जन्मनि । द्वौ च शब्दौ जन्मद्वयेऽपि तुल्यकक्षतां सूचयतः । किं कुर्वन्नुपाचरन् उपकुर्वन् ऋणीकमन्यान् कुर्वन् । कान् धर्मार्थकामसध्रीचः त्रिवर्गसहकारिणः पुरुषान् । कथं यथौचित्यं यद्यद्यस्य यस्य योग्यं दानमानादिकं तत्तत्तस्य तस्य कुर्वन्नित्यर्थः ॥

अर्थः—जो बुद्धिवान् मनुष्य धर्म, अर्थ व काम हे तीन पुरुषार्थ साधण्यास प्रयत्न करणाऱ्या पुरुषांस त्यांच्या त्यांच्या गरजेप्रमाणें दानमानादिकानें सत्कार करितो, तो त्रिवर्गसम्पत्तीनें ह्मणजे धर्म, अर्थ व काम या तीन पुरुषार्थाच्या योगानें इहलोकीं व परलोकींहि सुखानें नांदतो.... सर्वदा आनंदांत असतो.

एवं समदत्तिं पात्रदत्तिं च प्रबन्धेनाभिधायेदानीं दयादत्तिं विधेयतमत्वेनोपादिशन्नाह—

याप्रमाणें समानदत्ति व पात्रदत्ति सांगून आतां दयादत्तिहि[1] गृहस्थानें अवश्य करावी हें सांगतात.

---

१ तेनाधीतं श्रुतं सर्वं तेन तप्तं परं तपः ॥
तेन कृत्स्नं कृतं दानं यः स्यादभयदानवान् ॥ १ ॥

अर्थः—ज्यानें अभयदान दिलें त्यानें प्रथमपासून सगळें द्वादशांग शास्त्र अधयन केलें, आणि आहार वगैरे सगळीं दानें केलीं असें जाणावें.

धर्मार्थकाममोक्षाणां जीवितं मूलमिष्यते ॥
तद्रक्षता न किं दत्तं हरता तन्न किं हृतम् ॥ २ ॥

अर्थः—धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चार पुरुषार्थांचें मूळ काय तें जीवित ( जगणें ) तें ज्यानें रक्षिलें त्यानें सर्व कांहीं दिलें. आणि तें ज्यानें हरण केलें त्यानें सर्वच हरण केलें.

सर्वेषां देहिनां दुःखा- ।
द्विभ्यतामभयप्रदः ॥
दयार्द्रो दातृधौरेयो ।
निर्भीः सौरूप्यमश्नुते ॥ ७५ ॥

**टीकाः**—अश्नुते प्राप्नोति । कोऽसावभयप्रदः प्राणादिभयापसारकः । केषां देहिनां प्राणिनां । किं कुर्वतां बिभ्यतां त्रस्यतां । कस्मात् दुःखात् देहमनस्तापात् । कियतां सर्वेषां । किमश्नुते सौरूप्यं रूपातिशयं । उपलक्षणात्स्थैर्यं गाम्भीर्यं तेजस्वित्वमादेयत्वं सौभाग्यं सौम्यत्वं त्यागित्वं भोगित्वं यशस्वित्वं निरामयत्वं चिरजीवित्वमित्यादिलोकोत्तरगुणग्रामं । किंविशिष्टः सन् निर्भीः सर्वतो भयरहितः । किंविशिष्टोऽसौ दयार्द्रः करुणामृदुहृदयः । पुनः किंविशिष्टो दातृधौरेयः अन्नादिदातृणामग्रणीः । धर्मार्थकाममोक्षाणां जीवितमूलत्वाज्जीवितप्रदः किमभिमतं न ददातीति भावः ॥

---

दानमन्यद्भवेन्मा वा नरश्चेदभयप्रदः ॥
सर्वेषामेव दानानां यतस्तद्दानमुत्तमम् ॥ ३ ॥

अर्थः—मनुष्य जर अभयदान देत आहे तर इतर दान देवो किंवा न देवो, त्यानें सगळें दिलेंच ह्मणून समजावें. कारण, सर्व प्रकारच्या दानांहून अभदान हें श्रेष्ठ आहे.

यो भूतेष्वभयं दद्यात् भूतेभ्यस्तस्य नो भयम् ॥
यादृग्वितीर्यते दानं तादृगाध्यास्यते फलम् ॥ ४ ॥

अर्थः—जो सर्व जंतूवर दया करतो त्याला मग कोणत्याही प्राण्यापासून भय होणार नाहीं. कारण, जसें दान द्यावें तसेंच फळ प्राप्त होतें.

अर्थः—कोणत्याहि प्राण्याच्या मनाला किंवा देहाला त्रास झाला असतांना त्याला त्या दुःखापासून दूर करणारा दयाळु मनुष्य सर्व दात्यांमध्यें श्रेष्ठ होय. आणि त्या पुण्योदयानें तो मनुष्य अन्यजन्मीं निर्भय होऊन मोठा सुंदर होतो.

अथ कर्मधर्म्यमित्यादि प्राक् सूत्रितं प्रपञ्चयन् श्रितभरणकृपादानपुरस्सरं दिवाभोजनमुपदिशन्नीरादीनां रात्रावप्यप्रत्याख्येयतामाख्याति ॥

आतां; आश्रितांचें पोषण व निराश्रितावर दया करून गृहस्थानें दिवसां भोजन करावें व रात्रीं प्रत्याख्यान करावें, हें सांगतात.

भृत्वाऽऽश्रितानवृत्त्याऽऽर्तान् ।
कृपयाऽनाश्रितानपि ॥
भुञ्जीतान्ह्यम्बुभैषज्य- ।
ताम्बूलैलादि निश्यपि ॥ ७६ ॥

टीकाः—भुञ्जीत ओदनादिकमुपयुञ्जीत गृही । क्व अन्हि दिने । किं कृत्वा भृत्वा पोषयित्वा । कान् आश्रितान् अनन्यस्वामिकान् मानुषान् तिरश्चश्च । किंविशिष्टान् अवृत्त्या जीवनाभा-

---

सौरूप्यमभयादाहुराहाराद्भोगवान्भवेत् ॥
आरोग्यमौषधाज्ज्ञेयं श्रुतात्स्यात् श्रुतकेवली ॥ ९ ॥

अर्थः—अभयदानानें सुंदर रूप, आहारदानानें सुखोपभोग, औषधदानानें आरोग्य आणि शास्त्रदानानें केवलज्ञान हीं प्राप्त होतात.

वेनार्ता अनवस्थिताचित्तास्तान् । न केवलमाश्रितानना श्रितानपि भृत्वा । कया कृपया करुणया । न केवलं तथा कृत्वा दिवा भक्तादिकं भुञ्जीत । निश्यपि रात्रावपि भुञ्जीत । किं तत् अम्ब्वादि अम्बु जलं भैषज्यमौषधं ताम्बूलं क्रमुकं एला प्रसिध्दा । आदि-शब्देन जातीफलकर्पूरादिमुखवासनप्रायद्रव्यपरिग्रहः ॥

**अर्थः—जगण्यास दुसरा उपाय नसल्यामुळें ज्याचें चित्त व्याकुल झालें आहे आणि ह्मणूनच जे आपल्या आश्रयास आले आहेत ह्मणजे ज्यांना आपल्याशिवाय दुसरा कोणी रक्षिणारा नाहीं अशा आश्रित मनुष्यांस ह्मणजे सेवकांस व पशूंस आणि अनाश्रित ह्मणजे ज्यांना आपला व दुसऱ्याचाहि आश्रय नाहीं अशा**

---

मनोभूरिव कान्ताङ्गः सुवर्णाद्रिरिव स्थिरः ॥
सरस्वानिव गम्भीरो विवस्वानिव भासुरः ॥ ६ ॥

आदेयः सुभगः सौम्यस्त्यागी भोगी यशोनिधिः ॥
भवत्यभयदानेन चिरजीवी निरामयः ॥ ७ ॥

अर्थः—अभयदान देणारा मनुष्य अन्यजन्मीं मदनाप्रमाणें सुंदर, मेरूप्रमाणें स्थिर, समुद्राप्रमाणें गंभीर, सूर्याप्रमाणें तेजस्वी, दयाळू, भाग्यवान्, शांत, उदार, यशस्वी, पुष्कळ वर्षें जगणारा व निरोगी असा होतो.

१ ताम्बूलमौषधं तोयं मुक्त्वाऽऽहारादिकां क्रियाम् ॥
प्रत्याख्यानं प्रदीयेत यावत्प्रातर्दिनं भवेत् ॥ १ ॥

अर्थः—तांबूल, औषध आणि जल असले पदार्थ सोडून अन्नसेवन वगैरे क्रिया रात्र झाल्यापासून सूर्योदयापर्यंत न करण्याचा नियम द्यावा.

मनुष्यांस व पशूंसहि कृपेनें पोषण करून; गृहस्थानें दिवसा अन्न जेवावें. रात्रीं भोजन करूं नये. तरी पाणी, औषध व तांबूल (पान, सुपारी, वेलदोडा, कात वगैरे) हे पदार्थ रात्रींहि घेण्यास हरकत नाहीं.

सेव्यानामप्यर्थानां सेवायामसम्भवत्त्यां कालपरिस्थित्या प्रत्याख्येयतामुपदिश्य तत्प्रत्याख्यानं फलवत्तया समर्थयते—

आतां; सेव्य ह्मणजे स्वस्त्री, पुष्पमाला, तांबूल वगैरे जे पदार्थ ते जोंपर्यंत ग्रहण करावयाचे नसतात तितक्या कालाची मर्यादा करून व्रत करावें, आणि तसें केल्यानें होणारें फलही सांगतात.

यावन्न सेव्या विषया- ।
स्तावत्तानाप्रवृत्तितः ॥
व्रतयेत्सव्रतो दैवा- ।
न्मृतोऽमुत्र सुखायते ॥ ७७ ॥

टीका:— आप्रवृत्तितो व्रतयेत् आप्रवृत्तेर्निवृत्तिर्मेऽस्य ताम्बूलादेरिति नियमयेद्गृही। कान् तान् ताम्बूलकामिन्यादिविषयान्। कथं तावत् तावन्तं कालं। यावत्किं यावन्तं कालं। न सेव्या न सेवितुं सम्भाव्याः। के ते विषयाः। एवं कृते किं फलं स्यादित्याह—सुखायते सुखमनुभवति। कोऽसौ स तथाकृतनियमः। क्व अमुत्र परलोके। किंविशिष्टो मृतः। कस्माद्दैवात् कर्मवशात्। किंविशिष्टः सन् सव्रतस्तथाव्रतभावितः॥

**अर्थः**—आपण सेविण्याचे जे स्वस्त्री वगैरे विषय आहेत ते (आपण सर्वदां सेवीत नाहींच ह्मणून) जोंपर्यंत

आपण सेवीत नाहीं तितक्या कालाची मर्यादा करून ते विषय न सेविण्याचें व्रत करावें. असें केल्यानें दैवयोगानें कदाचित् तशा व्रतांतच मरण आल्यास त्या योगानें अन्यजन्मीं सुख होईल.

तपश्चर्यं च शक्तित इत्युक्तं तद्विशेषविधिमभिधत्ते—

आतां; यथाशक्ति तप करावयास सांगतात.

पञ्चम्यादिविधिं कृत्वा ।
शिवान्ताभ्युदयप्रदम् ॥
उद्द्योतयेद्यथासम्प- ।
न्निमित्ते प्रोत्सहेन्मनः ॥ ७८ ॥

टीकाः— उद्द्योतयेत् उद्यापयेत् । कं पञ्चम्यादिविधिं पञ्चम्यां पुष्पाञ्जलिमुक्तावलिरत्नत्रयादिविधानं । किंविशिष्टं शिवान्ताभ्युदयप्रदं निःश्रेयसावसानशक्रचक्रधरादिपदसम्पादकं । किं कृत्वा यथाम्नायं परिसमाप्य । कथमुद्द्योतयेत् यथासम्पद्यथाविभवं । ननु नित्यानुष्ठाने सत्यपि किमिदमनुष्ठीयते इत्याह—प्रोत्सहेत् नित्यानुष्ठानापेक्षया प्रकर्षेणोत्साहं गच्छेत् । मनश्चित्तं । क निमित्ते नैमित्तिकानुष्ठाने ॥

अर्थः—पाक्षिक श्रावकांनीं पंचमी, पुष्पांजली, मुक्तावली, रत्नत्रय वगैरे व्रतें करून आपल्या संपत्तीच्या मानानें त्या व्रतांचें उद्यापन करावें. हीं व्रतें स्वर्ग वगैरे अभ्युदय सुख आणि शेवटीं निर्वाण पद देणारीं आहेत. हीं व्रतें ह्मणजे श्रावकांच्या नैमित्तिक क्रिया आहेत. या नैमित्तिक क्रिया करितांनाहि नित्य क्रियेपेक्षां आपलें मन उत्सुक ठेवावें.

अथ व्रतग्रहणरक्षणच्छेदोपस्थापनविधीनुपदिशति—

आतां; व्रतग्रहण, घेतलेल्या व्रतांचें रक्षण व कदाचित् व्रतभंग झाल्यास प्रायश्चित्तानें पुनः त्याचें स्थापन करावयास सांगतात.

समीक्ष्य व्रतमादेय- ।
मात्तं पाल्यं प्रयत्नतः ॥
छिन्नं दर्पात्प्रमादाद्वा ।
प्रत्यवस्थाप्यमञ्जसा ॥ ७९ ॥

टीकाः—आदेयं ग्राह्यं श्रेयोऽर्थिना । किं तत् व्रतं । किं कृत्वा समीक्ष्य आत्मानं देशकालस्थानसहायादींश्च सम्यगालोच्य । तथा पाल्यं रक्षणीयं व्रतं । किंविशिष्टमात्तं तथा गृहीतं । कस्मात्प्रयत्नतः प्रकृष्टयतनया । तथा प्रत्यवस्थाप्यं प्रायश्चित्तविधिना पुनरनुसन्धेयं व्रतं । कथं अञ्जसा सद्य एव । किंविशिष्टं तत् छिन्नं अतिचरितं । कस्मात् दर्पात् मदावेशात् प्रमादाद्वाऽनवधानात् ॥

अर्थः—आपला व देश, काल व अनुकूलता वगैरेचा विचार करून कोणतेंही व्रत घ्यावें. आणि तें घेतलेलें व्रत यत्नपूर्वक पाळावें. कदाचित् मदाच्या आवेशानें अथवा प्रमादानें (बेसावधपणानें) त्या व्रताचा भंग झाल्यास तत्काल शास्त्रोक्त विधीनें प्रायश्चित्त घेऊन पुनः पूर्वीप्रमाणें तें व्रत पाळावें.

किं व्रतमित्याह —

आतां; व्रत ह्मणजे काय हें सांगतात.

सङ्कल्पपूर्वकः सेव्ये ।

नियमोऽशुभकर्मणः ॥
निवृत्तिर्वा व्रतं स्याद्वा ।
प्रवृत्तिः शुभकर्मणि ॥ ८० ॥

टीका—स्याद्भवेत् । किं तत् व्रतं । किं नियमः प्रत्याख्यानं । क्व सेव्ये स्वदारताम्बूलादौ । किंविशिष्टः संकल्पपूर्वकः इदमियदेतावन्तं कालं न सेविष्येऽहमिति मनसाऽध्यवसायं कृत्वा इत्यर्थः । अथवा अहमिदमियदेतावन्तं कालं सेविष्याम्येवेति सङ्कल्पेन नियमः प्रतिज्ञा व्रतं स्यात् । अथवा व्रतं स्यात् । किं निवृत्तिः विरतिः । कस्मादशुभकर्मणो हिंसादेः । किंविशिष्टा सङ्कल्पपूर्विकेति लिङ्गपरिणामेन सम्बन्धः । अथवा व्रतं स्यात् । किं प्रवृत्तिराचरणं । क्व शुभकर्मणि पात्रदानादौ । सङ्कल्पपूर्विकेत्यत्रापि योज्यम् ॥

अर्थः— सेव्य ह्मणजे स्वस्त्री, तांबूल, गंध वगैरे जे भोगोपभोगाचे पदार्थ ते मी अमुककालपर्यंत किंवा अमुक पर्वाच्या दिवशीं सेविणार नाहीं, असा संकल्प करून जो नियम करणें त्याला व्रत ह्मणतात; अथवा अशुभकर्मापासून ह्मणजे पापाचरणापासून दूर होणें अर्थात् पापाचरण न करणें अथवा शुभ ह्मणजे जिनपूजा, सत्पात्रदान वगैरे सत्कर्मे करणें याला व्रत ह्मणतात.

विशिष्टागमप्रत्ययावष्टम्भात्प्राणिरक्षाविधिमनुशास्ति—

आतां; जीवरक्षण करण्याचा विधि सांगतात.

न हिंस्यात्सर्वभूतानी- ।
त्यार्षं धर्मं प्रमाणयन् ॥
सागसोऽपि सदा रक्षे- ।
च्छक्त्या किं नु निरागसः ॥ ८१ ॥

टीका:—रक्षेत् पालयेत् । कोऽसौ धर्मी धार्मिकः । कान् सागसोऽपि सापराधानपि जीवान् । कया शक्त्या यथाशक्ति । किंनिमित्तं धर्मे धर्मनिमित्तं । क्व सदा सर्वस्मिन् काले । किंनु निरागसो निरपराधान् विशेषतो रक्षेदित्यर्थः । किं कुर्वन् प्रमाणयन् अविसंवादयन् इदमेवमित्थमेवेति प्रतिपद्यमानः । किं तत् आर्षं ऋषिभिः प्रोक्तं शास्त्रं । किंरूपमित्याह इति एवंरूपं । न हिंस्यात् न हन्यात् । कोऽसौ श्रेयोऽर्थी । कानि सर्वभूतानि सर्वान् त्रसस्थावरजीवान् ॥

अर्थ:—सर्व ह्मणजे त्रस व स्थावर ह्यांपैकीं कोणत्याहि जीवांस मारूं नये हें जिनाचें वाक्य प्रमाण मानून, धार्मिकानें अपराधी प्रण्यांचेंहि सर्वकाल शक्त्यनुसार रक्षण करावें. मग निरपराधी जीवांचें रक्षण केलेंच पाहिजे हें पुनः सांगावयास नकोच.

साङ्कल्पिकहिंसापरित्यागमुपदिश्यार्थान्तरन्यासेन समर्थयते—

आतां; सांकल्पिक हिंसेचा त्याग सांगतात.

आरम्भेऽपि सदा हिंसा ।
सुधीः साङ्कल्पिकीं त्यजेत् ॥
घ्नतोऽपि कर्षकादुच्चैः ।
पापोऽघ्नन्नपि धीवरः ॥ ८२ ॥

टीका:—त्यजेत् परिहरेत् । कोऽसौ सुधीः शास्त्रबलेन हिंसायाः फलमेतादिति निश्चितमतिः । कां हिंसां प्राणातिपातं । किंविशिष्टां साङ्कल्पिकीं अमुं जन्तुमासाद्यार्थित्वेन हन्मीति सङ्कल्पपूर्विकां । आरम्भजा तु हिंसाऽशक्यप्रत्याख्यानेति तत्र यतनामेव कुर्या-

दिति भावः । क सति आरम्भेऽपि कृष्यादिकर्मण्यपि प्रवर्तमानः । कथं सदा नित्यं । हि यस्मात् भवति । कोऽसौ धीवरो मात्स्यिकः । किंविशिष्टः उच्चैःपापः उत्कृष्टपातकी । किं कुर्वन्नपि बहून्मत्स्यान् हनिष्यामीत्यभिध्यानेन प्रवृत्तोऽमारयन्नपि । कस्मात्कर्षकात् कर्षणप्रवृत्तात् । किं कुर्वतो घ्नतोऽपि देवब्राह्मणकुटुम्बाद्यर्थं धान्यमुत्पादयिष्यामीति अभिध्यानविशेषेण प्रवृत्ताद्बहूनपि मारयतः ॥

अर्थः—शास्त्रबलानें, ज्याला हिंसेचें फळ अमुक आहे हें चांगलें कळलें आहे तो सुधी ह्मणजे विद्वान् होय. त्यानें, कुटुंबपोषणाकरितां व सत्पात्रदान वगैरे करण्याकरितां सर्वदा कृषि वगैरे उद्योग केले तरी, त्यांत हिंसेचा संकल्प ठेवूं नये. कारण, हिंसा करण्याचा संकल्प ह्मणजे हेतु नसून कुटुंबपोषणाकरितां व गृहस्थधर्म चालविण्याकरितां शेतकींत हिंसा (स्थावर जीवांची) करणारा जो शेतकरी, त्याच्यापेक्षां मासे मारण्याचा हेतु मनांत धरून जाळें टाकणारा जो कोळी, तो हिंसा न करूनहि (जाळ्यांत मासे न सांपडल्यामुळें हिंसा झाली नाहीं तरी) अधिक पापी होय.

परैर्विधेयतया व्यवस्थाप्यमानं हिंस्रादिप्राणिनां वधं प्रतिविधातुमाह—

आतां; मिथ्यामतावलंबी पंडितांनीं जी हिंस्र वगैरे तीन प्रकारच्या जीवाची हिंसा करावी ह्मणून सांगितली आहे; तिच्या निराकरणार्थ सांगतात.

हिंस्रदुःखिसुखिप्राणि- ।
घातं कुर्यान्न जातुचित् ॥

अतिप्रसङ्गश्चभ्रार्ति- ॥
सुखोच्छेदसमीक्षणात् ॥ ८३ ॥

टीकाः—न कुर्यात् श्रेयोऽर्थी । कं हिंस्रदुःखिसुखिप्राणिघातं । कथं जातुचित् कदाचिदपि । कुतः अतीत्यादि—हिंस्रा व्याघ्रादयः अत्र केचिदाहुः हिंस्रजीवा हन्तव्याः । हिंस्रे ह्येकस्मिन्हते भूयसां रक्षा कृता भवति । ततश्च धर्माधिगमः पापोपरमश्च स्यात् तदयुक्तमतिप्रसङ्गात् । सर्वेषां प्राणिनां हिंस्रतया हन्तव्यतानुषङ्गात् । तथा च लाभमिच्छतां तथावादिनां मूलोच्छेदः स्यात् । न च बहुरक्षणाभिप्रायेणापि हिंस्रं हिंसतो धर्मः पापोच्छेदो वा युज्येत दयामूलत्वात्तयोः । यच्च संसारमोचकः प्रचक्षते दुःखिनो जीवा हन्तव्यास्तेषां विनाशे दुःखविनाशसम्भवादिति; तदप्ययुक्तं । तेषां स्वल्पदुःखानां निहतानां नरकेऽनन्तदुःखे संयोजनाया दुर्निवारत्वात् अन्ये त्वाहुः— सुखिनो हन्तव्याः यतः संसारे सुखं दुर्लभं । सुखिनश्च हताः सुखिन एव भवन्तीति तदप्यसङ्गतं । सुखिनां हन्यमानानां दुःखावेशेन सुखोच्छेदस्यावश्यम्भावात् । दुःखमृत्युना च दुर्ध्यानानुसन्धानाद्दुरन्तदुर्गतिदुःखावर्तनिर्वर्तनात् । तदलमतिप्रसङ्गेन । स्वगता परगता वा यथाकथञ्चित्क्रियमाणा हिंसा न धर्माय स्यात् । किं तर्हि पातकसम्भवायैवेति प्रतिपद्यमानैर्यथाशक्ति तत्परित्यागे धर्मार्थिभिः सन्ततं यतितव्यमिति आप्तसूक्तोपनिषत् ॥

**अर्थः—"कित्येकांचें मत असें आहे कीं; सिंह, व्याघ्र, सर्प वगैरे जे हिंसक पशु आहेत, त्यांचा अवश्य वध करावा. कारण, ते सर्वदा आपल्याहून अशक्त जीवांस मारीत असतात; त्यामुळें त्यांच्या हातून पुष्कळ हिंसा घडते आणि त्यायोगें ते दुर्गतीस जातील. तेव्हां तसले हिंसक जीव मारून टाकिले ह्मणजे पापें कमीं होतील,**

व इतर जीवही सुखी रहातील." पण, हें त्यांचें ह्मणणें चुकीचें आहे. तें कसें ह्मणाल तर,— हिंसक जीव मारून टाकावे असें सांगणारा जो आहे तोहि (हिंसेचा उपदेश करणारा ह्मणून) हिंसकच जाणावा. मग त्याचाहि वध करावा लागेल, अर्थात् अतिप्रसंग होईल. म्हणून हिंस्रजीवांचाहि वध कधींच करूं नये. आणखी कित्येकांचें मत असें आहे कीं, "जे जीव दुःखी आहेत त्यांचा वध करून त्यांना दुःखांतून सोडवावें" हेंहि ह्मणणें असंगतच होय. कारण, इहलोकीं असलेलें दुःख हें कसेंतरी सोसलें जातें. पण, त्या दुर्मरणानें मरून नरकीं पडल्यावर तेथलें असह्य दुःख पुष्कळ वर्षें सोसावें लागतें; तेव्हां, थोडक्या दुःखांतून सोडवून अधिक दुःखांत मुद्दाम टाकल्यासारखें झालें. याकरितां किती दुःख झालें तरी त्या जीवाचा वध करूं नये. आतां, आणखी एकाचें ह्मणणें असें आहे कीं, "जे जीव सुखी आहेत त्यांचा वध करावा. कारण, संसारांत सुख हें अनित्य आहे; तेव्हां हें सुख सरल्यावर पुनः दुःख होणारच; ह्मणून सुखी आहे तोंवरच त्याला मारून टाकल्यास त्याला दुःख सोसण्याचा प्रसंग येणार नाहीं." हेंहि ह्मणणें चुकीचें आहे. कारण, सुखी प्राणी मरूं लागला ह्मणजे त्याच्या मनाला तर फारच तळमळ होत असते, आणि त्यामुळें तो दुःखी होतो, व आर्त्तध्यानानें मरून दुर्गतीस जातो. अर्थात् सुखी जीवास मुद्दाम दुर्गतींतल्या दुःखांत ढकलून, सुखाचा उच्छेद केल्यासारखें होतें. ह्मणून सुखी जीवांचाहि वध करूं नये. आणि दुःख असो कीं सुख असो आत्महत्याहि करून घेऊं नये.

अथ पाक्षिकस्य दृग्विशुध्द्यर्था लोकानुवृत्त्यर्थाश्च क्रियाः कृत्यतयोपदिशति—

**आतां; पाक्षिक श्रावकानें सम्यग्दर्शनाच्या शुद्धीकरितां व लौकिकाकरितां काय करावें हें सांगतात.**

स्थूललक्षः क्रियास्तीर्थ- ।
यात्राद्या दृग्विशुद्धये ॥
कुर्यात्तथेष्टभोज्याद्याः ।
प्रीत्या लोकानुवृत्तये ॥ ८४ ॥

टीका:—कुर्यात् । कोऽसौ स्थूललक्षः स्थूलं व्यवहारं लक्षयत्यालोचयतीति स्थूललक्षो व्यवहारप्रधानो बहुप्रदश्च गृही । काः क्रियाः । किंविशिष्टाः तीर्थयात्राद्याः तीर्थान्यूर्जयन्तादीनि पुण्यपुरुषाध्युषितस्थानानि तेषु यात्रा गमनं आद्यशब्देन रथयात्राक्षपकयात्रानिषिद्धिकागमनादयः । तीर्थयात्रा आद्या यासु ताः । किमर्थं दृग्विशुध्दये सम्यक्त्वनिर्मलीकरणार्थं । तथा स्थूललक्षः क्रियाः कुर्यात् । किंविशिष्टाः इष्टभोज्याद्याः इष्टाः सधर्माणः स्वजना मित्रादयो भोज्यन्ते स्वगृहे भोजनं कार्यन्ते यस्यां सा इष्टभोज्या क्रिया, सा आद्या आसु अतिथिपूजनभूतबल्यादिक्रियासु ताः । कया प्रीत्या हर्षेण नोद्वेगेन । किमर्थं लोकानुवृत्तये लोकचित्तावर्जनार्थम् ॥

**अर्थः—करावें कोणतें व करूं नये कोणतें हें ज्याला चांगलें कळतें, व जो उदार आहे अशा पाक्षिक श्रावकानें सम्यग्दर्शनाच्या शुद्धीकरितां तीर्थयात्रा, बिंबप्रतिष्ठा, पाठशाळा घालणें वगैरे क्रिया कराव्या. आणि लोकांच्या संतोषाकरितां समानधर्मी श्रावक, इष्ट, मित्र, अतिथी**

वगैरे जनांस भोजन वगैरे देऊन त्यांचा सत्कार करावा.

श्रेयोऽर्थिनः कीर्तेरप्यर्जनीयत्वमाह—

आतां; कीर्तिहि सुखाला कारण आहे ह्मणून तीहि मिळविण्याविषयीं सांगतात.

अकीर्त्या तप्यते चेत- ।
श्चेतस्तापोऽशुभास्रवः ॥
तत्तत्प्रसादाय सदा ।
श्रेयसे कीर्तिमर्जयेत् ॥ ८५ ॥

टीकाः—तप्यते संक्लिश्यते । किं तत् चेतश्चित्तं । कया अकीर्त्या अयशसा । भवति च कोऽसौ चेतस्तापो मनःकालुष्यं । किंविशिष्टोऽशुभास्रवः पापहेतुः । यत एवं तत्तस्मात्कारणात् । अर्जयेत् उपार्जयेत् । गृही । कां कीर्तिं । कथं सदा । कस्मै तत्प्रसादाय चेतःप्रसत्त्यर्थम् । कस्मै तत्प्रसादः श्रेयसे । अथवा श्रेयसे । पुण्यकारणाय तत्प्रसादायेति व्याख्येयम् ॥

अर्थ—अकीर्तीनें ह्मणजे अपयशानें मनास संताप होतो, आणि मनाचा संताप हा पापाला कारण आहे. ह्मणून मन हें प्रसन्न ठेवण्याकरितां अर्थात् पुण्य मिळविण्याकरितां कीर्ति मिळवावी.

कीर्त्युपार्जनोपायमाह—

आतां; कीर्ति मिळविण्याचा उपाय सांगतात.

परासाधारणान् गुण्य- ।
प्रगण्यानघमर्षणान् ॥

गुणान् विस्तारयेन्नित्यं ।
कीर्तिविस्तारणोद्यतः ॥ ८६ ॥

टीका— विस्तारयेद्विपुलीकुर्यात् । कोऽसौ कीर्तिविस्तारणोद्यतो यशःप्रसारणतत्परः । कान् गुणान् दानसत्यशौचशीलादीन् । किंविशिष्टान् परासाधारणान् अनन्यसदृशान् । पुनः किंविशिष्टान् गुण्यप्रगण्यान् गुणवद्भिः प्रकर्षेण माननीयान् । पुनरपि किंविशिष्टान् अघमर्षणान् पापविध्वंसिनः ॥

अर्थः—ज्याला आपली कीर्ति पसरावी ह्मणून इच्छा आहे; त्यानें, जे इतर साधारण मनुष्यांजवळ असूं शकत नाहीत, जे पातकांचा नाश करण्यास समर्थ आहेत व गुणवान् लोक ज्यांना मान देतात असे जे गुण (दान, सत्य, शौच, शील वगैरे गुण) ते धारण करूनः ते सर्वदा निर्मळ ठेवावे.

एवंविधाचारपरस्य श्रावकस्योत्तरोत्तरभूमिकाश्रयणेन सकलविरतिपदाधिरोहणविधिमुपदिशति—

याप्रमाणें सदाचरणी श्रावकानें क्रमानें एकेक पायरी चढून शेवटीं यतिधर्म स्वीकारावा याविषयीं सांगतात.

सैषः प्राथमकल्पिको जिवनचोऽभ्यासामृतेनासकृ- ।
न्निर्वेदद्रुममावपन् शमरसोद्गारोध्दुरं बिभ्रति ॥
पाकं कालिकमुत्तरोत्तरमहान्त्येतस्य चर्याफला- ।
न्यास्वाद्योद्यतशक्तिरुद्धचरितप्रासादमारोहतु ॥ ८७ ॥

टीका—आरोहतु चटतु । कोऽसौ सैषः स एवेत्यर्थः । पादपूरणेऽत्र सेर्लोपः । कोऽसौ प्राथमकल्पिकः प्रारब्धदेशसंयमः । कं आरोहतु उद्धचरितप्रासादं सल्लेखनान्तयतिधर्मसौधं । किंविशिष्टः

सन् उद्यतशक्तिरुद्भूतसामर्थ्यः । किं कृत्वा आस्वाद्यानुभूय । कानि चर्याफलानि दर्शनिकादिप्रतिमाफलानि । कस्य एतस्य निर्वेदद्रुमस्य । किंविशिष्टानि उत्तरोत्तरमहान्ति यथोत्तरं पृथूनि । किं कुर्वन्ति बिभ्रति धारयन्ति । किं पाकमात्मीयपरिणतिं परिपाकं च । किंविशिष्टं कालिकं कालकृतं । पुनः किंविशिष्टं शमरसोद्धारोध्दुरं शमः प्रशमसुखं स एव रसो रसनेन्द्रियग्राह्यो गुणस्तस्योद्धारोऽभिव्यक्तिस्तेनोध्दुरमुत्करं । स एव वा उध्दुरो यत्र किं कुर्वन् आवपन् सिञ्चन् पोषयन् । कं निर्वेदद्रुमं संसारशरीरभोगवैराग्यवृक्षं । केन जिनवचोऽभ्यासामृतेन जिनागमभावनापीयूषेण । कथमसकृदभीक्ष्णमिति भद्रम् ॥

**अर्थः**—तो हा ह्मणजे ज्यानें एकदेश ( थोडा थोडा ) संयम पाळण्यास आरंभ केला आहे असा पाक्षिक श्रावक,—जिनवचनाचा अभ्यास रूपी अमृतानें वारंवार निर्वेद ( संसार, शरीर व भोग यांविषयींचें वैराग्य ) रूपी वृक्षास सिंचन करीत व—प्रशमसुख ( शांति ) रूपी रसानें भरलेलीं, पक्क झालेलीं व उत्तरोत्तर मोठीं होणारीं अशीं—ह्या निर्वेदरूपी वृक्षांचीं दर्शनिक, व्रतिक वगैरे प्रतिमारूपीं फळें सेवन करून, त्यामुळें ज्याला सामर्थ्य चांगलें आलें आहे असा होऊन, तो ज्यांत शेवटीं सल्लेखना ( सद्विचारानें अंतीं देहत्याग करणें ) करावयास सांगितलें आहे अशा यतिधर्मरूपी प्रासादावर चढू दे. इति भद्रम् ॥

इत्याशाधरविरचितायां स्वोपज्ञधर्मामृतसागारधर्मदीपिकायां
भव्यकुमुदचान्द्रिकासञ्ज्ञायामादित एकादशः
प्रक्रमाच्च द्वितीयोऽध्यायः समाप्तः ॥

**अध्याय दुसरा समाप्त.**

## ॥ अथ तृतीयोऽध्यायः ॥

### ॥ अथ नैष्ठिकलक्षणम् ॥

देशयमघ्नकषाय- ।
क्षयोपशमतारतम्यवशतः स्यात् ॥
दर्शनिकाद्येकादश- ।
दशावशो नैष्ठिकः सुलेश्यतरः ॥ १ ॥

टीका—स्याद्भवेत् । कोऽसौ नैष्ठिकः श्रावकः । किंविशिष्टो दर्शनिकाद्येकादशदशावशः दर्शनं निर्मलमद्यादिविरत्याहितातिशयं सम्यक्त्वमस्यास्तीति, अतिशायने ठावत इति ठः । एवं व्रतिकादित्रयो व्युत्पाद्याः । दर्शनिक आदिर्यासां व्रतिकादीनां ता दर्शनिकादय एकादशदशाः श्रावकसंयमस्थानानि, तासां वशः पारतंत्र्यं यस्य स घटमानदेशसंयम इत्यर्थः । कस्मात् देशेत्यादि देशयमघ्ना अप्रत्याख्यानावरणाख्याः कषायाः क्रोधादयस्तेषां क्षयेनोदयाभावेन प्रत्याख्यानावरणकषायोदयविशिष्टेन युक्त उपशमः सदवस्था, तत्क्षयोपशमस्तस्य तारतम्यं यथोत्तरमुत्कर्षस्तद्वशतस्तत्पारतन्त्र्यात् । पुनः किंविशिष्टः स्यात् सुलेश्यतरः लिंशति स्वीकरोति पुण्यपापे

---

१ लिम्पति स्वीकरोति पुण्यपापे स्वयं जीवो यया सा लेश्या ।

लिम्पत्यात्मीकरोत्यात्मा पुण्यपापे यया स्वयम् ।
सा लेश्येत्युच्यते सद्भिर्द्विविधा द्रव्यभावतः ॥ १ ॥

अर्थः—जिच्या योगानें आत्मा आपण पुण्य किंवा पाप स्वीकारितो तिला लेश्या ह्मणतात. ती द्रव्य व भाव अशा भेदानें दोन प्रकारची आहे. अथवा—

स्वयं जीवो यया सा लेश्या । अथवा लिशत्यल्पीकरोत्यात्मानमिति लेश्या कषायोदयरञ्जिता योगप्रवृत्तिः सैषा भावतः । द्रव्यवतस्तु शरीरच्छविर्लेश्या । सा च द्वितय्यपि षोढा । कृष्णा नीला कापोती

---

लिश्यत्यल्पीकरोत्यात्मानमिति लेश्या । कषायानुरञ्जिता योगप्रवृत्तिः । सैषा भावतः । द्रव्यतस्तु शरीरच्छविर्लेश्या । सा च द्वितय्यपि कृष्णादिभेदेन षोढा ॥ उक्तञ्च—

प्रवृत्तिर्यौगिकी लेश्या कषायोदयराञ्जिता ॥
भावतो द्रव्यतो देहच्छाविः षोढोभयी मता ॥ २ ॥

अर्थः—कषायाच्या उदयानें अनुरक्त झालेली जी योगप्रवृत्ति ( काय, वाक्, मन यांची जी क्रिया तिची प्रवृत्ति ) ती भावलेश्या जाणावी. व तशी प्रवृत्ति झाली ह्मणजे त्या समयीं जी देहाची कांति होते ती द्रव्यलेश्या जाणावी. ह्या दोन्ही लेश्या सहा प्रकारच्या आहेत.

कृष्णा नीलाऽथ कापोती पीता पद्मा सिता स्मृता ॥
लेश्या षड्भिः सदा ताभिर्गृह्यते कर्म जन्मिभिः ॥ ३ ॥

अर्थः—ह्या सहा लेश्यांच्या योगानें संसारी जीव सर्वदा कर्मग्रहण करीत असतात. अपि च—

योगाविरतिमिथ्यात्वकषायजनितोऽङ्गिनाम् ॥
संस्कारो भावलेश्याऽस्ति कल्माषास्रवकारणम् ॥ ४ ॥

अर्थः—काय, वाचा आणि मन यांचे दुर्व्यापार बंद न ठेवून, मिथ्यात्व व कषाय यांच्यापासून उत्पन्न झालेला संसारी जीवाचा जो संस्कार ती भावलेश्या पापास्रवाला ( पापें येण्याला ) कारण आहे.

पीता पद्मा शुक्ला चेति । प्रशस्ता लेश्या यस्यासौ सुलेश्यः प्रकृष्टः पाक्षिकापेक्षया सुलेश्यः । सुलेश्यतरः अथवा सर्वेऽपि यथोत्तरं विशुद्धतरलेश्याः स्युः ॥

**अर्थ—अप्रत्याख्यानावरण ( थोडेंहि चारित्र न पाळूं देणारे ) नांवाचे जे क्रोध, मान, माया व लोभ हे कषाय, त्यांचा जो क्षय, त्यानें युक्त असा उपशम ( असून नसल्यासारखें बसणें ), त्याचा जो उत्तरोत्तर उत्कर्ष,**

---

कापोती कथिता तीव्रो नीला तीव्रतरो जिनैः ॥
कृष्णा तीव्रतमो लेश्या परिणामः शरीरिणाम् ॥ ५ ॥
पीता निवेदिता मन्दः पद्मा मन्दतरो बुधैः ॥
शुक्ला मन्दतमस्तासां वृद्धिः षट्स्थानयायिनी ॥ ६ ॥

अर्थः—देहधारी जीवांचा जो तीव्र परिणाम ती कापोती लेश्या होय; अतिशय तीव्र जो परिणाम ती नील लेश्या, आणि त्याहूनहि अतितीव्र जो परिणाम ती कृष्ण लेश्या होय. मंद जो परिणाम तिला पीतलेश्या ह्मणतात, अतिशय मंद जो परिणाम ती पद्मा आणि त्याहूनही अतिमंद जो परिणाम ती शुक्ललेश्या होय, असें जिनांनीं सांगितलें आहे. ह्या लेश्यांची वृद्धि सहा ठिकाणीं असते.

निर्मूलस्कन्धयो(?) द्वे(?) भाषाशाखोपशाखयोः ॥
उच्चये पतितादाने भावलेश्या फलार्थिनाम् ॥ ७ ॥

अर्थः—नुसत्या फळाकरितां; मूळासकट झाड तोडणारा प्राणी कृष्णलेश्येचा जाणावा. फांद्या तोडणारा प्राणी नीललेश्येचा होय, आणि लहान फांदी तोडणारा कापोतलेश्येचा होय असें समजावें. फळें जिला आहेत अशी लहान डहाळी

त्याच्या आधीनतेमुळें, दर्शनिक, व्रतिक वगैरे अकरा प्रकारच्या अवस्थांस ( श्रावकांच्या संयम पाळण्याच्या पायऱ्या ) वश झालेला व पीत, पद्म व शुक्ल ह्या तिन्हींपैकीं कोणत्याहि लेश्या ज्याच्या पाक्षिक श्रावकापेक्षां उत्कृष्ट

---

तोडणारा पीतलेश्येचा, फळच तेवढें तोडणारा पद्मलेश्येचा आणि आपोआप पडलेल्या ढिगांतून लागेल तितकेंच फळ घेणारा शुक्लेश्येचा होय असें जाणावें. ही भावलेश्या जाणावी.

षट्षट् चतुर्षु विज्ञेयास्तिस्रस्तिस्रः शुभास्त्रिषु ॥
शुक्ला गुणेषु षट्स्वेका लेश्या निर्लेश्यमान्तिमम् ॥ ८ ॥

अर्थः––पहिल्या चार गुणस्थानांत सहा सहा लेश्या जाणाव्या. पुढच्या तीन गुणस्थानांत तीन तीन लेश्या जाणाव्या, आणि त्याच्या पुढच्या सहा गुणस्थानांत एक शुक्लेश्या असते, आणि शेवटच्या गुणस्थानांत कोणतीच लेश्या नसते ( इत्यनुमीयते गुणशद्बात् ).

रागद्वेषग्रहाविष्टो दुर्ग्रहो दुष्टमानसः ॥
क्रोधमानादिभिस्तीव्रैर्ग्रस्तोऽनन्तानुबन्धिभिः ॥ १ ॥
निर्दयो निरनुक्रोशो मद्यमांसादिलम्पटः ॥
सर्वदा कदनासक्तः कृष्णलेश्यान्वितो जनः ॥ २ ॥

अर्थः—राग व द्वेष रूपी ग्रहांनीं गिळिलेला; दुराग्रही; दुष्ट मनाचा; अनंतानुबंधी नांवाच्या तीव्र अशा क्रोध, मान, माया व लोभ ह्या चार कषायांनीं भरलेला; निर्दय; कठोर ( पर दुःख पाहून न हळहळणारा ) मद्य, मांस वगैरे सेवन करण्यास लंपट असलेला; सर्वदा कलह करण्यांत तत्पर असा जो मनुष्य तो कृष्णलेश्येचा जाणावा.

आहेत असा जो श्रावक, त्याला नैष्ठिक श्रावक ह्मणतात. [ एकापासून अकरा प्रतिमापर्यंतच्या कोणत्याहि प्रतिमेचा श्रावक नैष्ठिक समजावा. त्यांत विशेष हा कीं, पहिल्या प्रतिमेपासून वरच्या वरच्या प्रतिमेंत लेश्या अधिकप्रमाणानें

---

कोपी मानी मायी लोभी । रागी द्वेषी मोही शोकी ॥
हिंस्रः क्रूरश्चण्डश्चौरो । मूर्खः स्तब्धः स्पर्धाकारी ॥ ३ ॥
निद्रालुः कामुको मन्दः कृत्याकृत्याविचारकः ॥
महामूर्च्छो महारम्भो नीललेश्यो निगद्यते ॥ ४ ॥

अर्थ—रागीट, मानी, कपटी, लोभी, रागी ( विषयांत प्रीति ठेवणारा ), द्वेष करणारा, मोह बाळगणारा, शोक करणारा, हिंसा करणारा, क्रूर, भयंकर, चोरी करणारा, मूर्ख, अभिप्राय न कळूं देणारा, मत्सर करणारा, पुष्कळशी झोंप घेणारा, विषयासक्त, जड, बऱ्या वाइटाचा विचार न करणारा, अधिक परिग्रह बाळगणारा असा जो मनुष्य तो नीललेश्येचा जाणावा.

शोकभीमत्सरासूयापरनिन्दापरायणः ॥
प्रशंसति सदाऽऽत्मानं स्तूयमानः प्रहृष्यति ॥ ५ ॥
वृद्धिहानी न जानाति न मूढः स्वपरान्तरम् ॥
अहङ्कारग्रहग्रस्तः समस्तां कुरुते क्रियाम् ॥ ६ ॥
श्लाघितो नितरां दत्ते रणे मर्तुमपीहते ॥
परकीययशोध्वंसी युक्तः कापोतलेश्यया ॥ ७ ॥

अर्थः—शोक करणारा; भित्रा; मत्सर, असूया, परनिंदा वगैरे करण्यांत तत्पर; सर्वदा आपली प्रशंसा करणारा व दुसऱ्यांनीं प्रशंसा केली कीं अधिकच आनंद मानणारा; लाभ व हानि न जाणणारा; आपल्यांत व दुसऱ्यांत अंतर काय हें न जाणणारा;

**शुद्ध असतात. व अप्रत्याख्यानावरण कषायाचा ( क्रोध, मान, माया, लोभ यांचा ) क्षयोपशम उत्तरोत्तर अधिक-प्रमाणानें झालेला असतो. ]**

---

अहंकार रूपी ग्रहानें ग्रासिलेला; काय पाहिजे तें करणारा; प्रशंसा केली कीं तत्काल मागितलेलें देणारा व रणांत मरण्यास देखील तयार होणारा; दुसऱ्याचें यश नाश करणारा असा जो मनुष्य तो कापोत लेश्येचा जाणावा.

समदृष्टिरविद्वेषो हिताहितविवेचकः ॥
वदान्यः सदयो दक्षः पीतलेश्यो महामनाः ॥ ८ ॥

अर्थः—सारखे पहाणारा ह्मणजे पक्षपात न करणारा, द्वेष न करणारा, हित व अहित जाणणारा, दानशूर, दयाळू, सत्कार्यदक्ष मोठ्या मनाचा असा जो मनुष्य तो पीतलेश्येचा जाणावा.

शुचिर्दानरतो भद्रो विनीतात्मा प्रियंवदः ॥
साधुपूजोद्यतः साधुः पद्मलेश्यो नयक्रियः ॥ १६ ॥

अर्थः—आचारानें व मनानें शुद्ध, सत्पात्रीं दान देण्यांत तत्पर, शुभ चिंतणारा, विनयशील, प्रिय भाषण करणारा, सज्जनांचा सन्मान राखण्यास झटणारा, न्यायानें वागणारा असा जो सज्जन तो पद्मलेश्येचा जाणावा.

निर्णिदानोऽनहङ्कारः पक्षपातोज्झितोऽशठः ॥
रागद्वेषपराचीनः शुक्ललेश्यः स्थिराशयः ॥ १७ ॥

अर्थः—अमुक एक प्रकारचें संसारिक सुख मला व्हावें अशी इच्छा न धरणारा, अहंकार न करणारा, पक्षपातापासून सुटलेला, सज्जन, राग व द्वेष हे दोन्ही न करणारा आणि स्थिरबुद्धीचा जो महात्मा, तो शुक्ललेश्येचा जाणावा.

दर्शनिकादीनुद्दिशँस्तेषां गृहित्वब्रह्मचारित्वभिक्षुकत्वानि जघन्य-मध्यमोत्तमत्वाच्च विभक्तुमार्याद्वयमाह—

**आतां दर्शनिक वगैरे श्रावकांस उद्देशून; त्यांचें गृहित्व, ब्रह्मचारित्व व भिक्षुत्व आणि जघन्यत्व मध्यमत्व व उत्तमत्व सांगतात.**

दर्शनिकोऽथ व्रतिकः ।
सामयिकी प्रोषधोपवासी च ॥
सचित्तदिवामैथुन- ।
विरतो गृहिणोऽणुयमिषु हीनाः षट् ॥२॥
अब्रह्मारम्भपरि- ।
ग्रहविरता वर्णिनस्त्रयो मध्याः ॥
अनुमतिविरतोद्दिष्टवि- ।
रतावुभौ भिक्षुकौ प्रकृष्टौ च ॥ ३ ॥

टीका—अथशब्दोऽत्रानन्तर्यार्थः प्रत्येकं योज्यः । भवन्ति के श्रावकाः । कति षट् । किंविशिष्टा भवन्ति हीना जघन्याः । केषु मध्ये अणुयमिषु श्रावकेषु । न केवलं हीनाः गृहिणश्च । कः कः दर्शनिकोऽथानन्तरं व्रतिकस्ततः सामयिकी तदनु प्रोषधोपवासी

---

तेजः पद्मा तथा शुक्ला लेश्यास्तिस्रः प्रशास्तिकाः ॥
संवेगमुत्तमं प्राप्तः क्रमेण प्रतिपद्यते ॥ १८ ॥

अर्थः—उत्तम संवेग ह्मणजे धर्म व धर्मफलाविषयीं प्रीति, ती ज्याला प्राप्त झाली आहे असा भव्य पुरुष पीत, पद्म व शुक्ल ह्या तीन प्रशस्तलेश्या क्रमानें प्राप्त करून घेतो.

तदनन्तरं सचित्तविरतोऽपि दिवामैथुनविरतश्च । भवन्ति । के ते त्रयः । किंविशिष्टा मध्याः अणुयमिषु मध्ये मध्यमाः । पुनः किंविशिष्टा वर्णिनो ब्रह्मचारिणः । कति त्रयः । किमाख्या अब्रह्मारम्भपरिग्रहविरता अब्रह्मविरतः आरम्भविरतः परिग्रहाविरतश्च । तदनन्तरं भवतः कौ उभौ । किंविशिष्टौ प्रकृष्टौ अणुयमिष्णु मध्ये उत्कृष्टौ । पुनः किंविशिष्टौ भिक्षुकौ अल्पा भिक्षा यत्यपेक्षया ययोस्तौ । किमाख्यौ अनुमतिविरतोद्दिष्टविरतौ ॥

अर्थः— दर्शनिक, व्रतिक, सामयिक, प्रोषधोपवासी, सचित्तत्यागी व दिवामैथुनत्यागी हे सहा प्रतिमाधारी श्रावक देशसंयतां—(एकदेश ह्मणजे थोडें चारित्र पाळणारां)— मध्यें जघन्य ह्मणजे कनिष्ठ प्रतीचे होत. यांना गृहस्थ अशी संज्ञा आहे. ह्मणजे हे गृहस्थाश्रमी होत. अब्रह्मविरत आरंभविरत व परिग्रहविरत हे तीघे मध्यम होत. यांना ब्रह्मचारी अशी संज्ञा आहे. आणि अनुमतिविरत व उद्दिष्ट-

---

१ षडत्र गृहिणो ज्ञेयास्त्रयः स्युर्ब्रह्मचारिणः ॥
भिक्षुकौ द्वौ तु निर्दिष्टौ ततः स्यात्सर्वतो यतिः ॥

अर्थः—या अकरा प्रतिमापैकीं पहिले सहा प्रतिमाधारी गृहस्थ होत, त्या नंतरचे तिघे ब्रह्मचारी होत: आणि शेवटचे दोघे भिक्षुक होत. त्यांच्या पलीकडचा महात्मा पूर्ण यति होय.

आद्यास्तु षड्जघन्याः स्युर्मध्यमास्तदनु त्रयः ॥
शेषौ द्वावुत्तमावुक्तौ जैनेषु जिनशासने ॥

अर्थः—जैनामध्यें पहिले सहा प्रतिमाधारी जघन्य श्रावक होत त्या नंतरचे तिघे मध्यम श्रावक होत. आणि बाकीचे दोघे उत्तम होत. असें जिनशासनांत सांगितलें आहे.

विरत हे दोघे उत्कृष्ट होत. यांना भिक्षुक अशी संज्ञा आहे. हे भिक्षु यतीच्या अपेक्षेनें अल्प ह्मणजे कमीप्रतीचे होत ह्मणून यांना भिक्षुक असें ह्मटलें आहे.

नैष्ठिकोऽपि यादृशः सन् पाक्षिकव्यपदेशमेव लभते तादृशं दर्शयति—

आतां, नैष्ठिक श्रावकही कसा वागूं लागला ह्मणजे त्याला पाक्षिकच ह्मणावें लागेल; हें सांगतात.

दुर्लेश्याभिभवाज्जातु ।
विषये क्वचिदुत्सुकः ॥
स्खलन्नपि क्वापि गुणे ।
पाक्षिकः स्यान्न नैष्ठिकः ॥ ४ ॥

टीका—स्याद्भवेत् गृही । किंविशिष्टः पाक्षिको न नैष्ठिकः । किंविशिष्टः सन् उत्सुकः सोत्कण्ठाभिलाषः । क्व विषये इन्द्रियार्थे । किंविशिष्टे क्वचित् कामिन्यादीनामन्यतमे न सर्वत्र । कदा जातु कदाचिन्न सर्वदा । कस्मात् दुर्लेश्याभिभवात् दुर्लेश्यया कृष्णनील-कापोतीनामन्यतमया अभिभवः कुतश्चिन्निमित्ताच्चेतनशक्तेस्तादृक्सं-स्कारोद्बोधस्तस्माद्धेतोः तं वाऽऽश्रित्य । न केवलं तथा भवन् स्खल-न्नपि अतिचारं गच्छंश्च अनभ्यस्तपूर्वत्वात्संयमस्य दुर्धरत्वाद्वा मनसः । क्व गुणे । किंविशिष्टे क्वापि मद्यविरत्यादीनामन्यतमे न सर्वत्र ॥

अर्थः—नैष्ठिक श्रावक, कृष्ण नील व कापोत ह्या तीहीं पैकीं कोणत्याही दुर्लेश्यांच्या योगानें जिंकिला जाऊन, जर कदाचित् पंचेंद्रियांपैकीं एकाद्या इंद्रियाच्या विषयांत

उत्सुक होऊन, मद्यविरति वगैरे गुणाचा अतिचार करील तर तो पाक्षिक समजावा. त्याला नैष्ठिक ह्मणूं नये. पाक्षिकाचें लक्षण मागच्या अध्यायांत सांगितलें आहे.

दर्शनिकादीनामा स्वस्वानुष्ठानदार्ढ्याद्द्रव्यत एव दर्शनिकादि-व्यपदेशः स्याद्भावतस्तु पूर्वपूर्वोऽसाविति बोधयन्नाह—

आतां दर्शन वगैरे अकरा प्रतिमांपैकीं कोणत्याहि एका प्रतिमेंत असून त्यांतील एकाद्या गुणाचा जर अतिचार घडला, तर त्या श्रावकास द्रव्यापेक्षया त्या प्रतिमेचा धारक ह्मटलें तरी भावापेक्षया त्या त्या प्रतिमेच्या पूर्वीचा होय असें समजलें पाहिजे हें सांगतात.

तद्वद्दर्शनिकादिश्च ।
स्थैर्यं स्वे स्वे व्रतेऽव्रजन् ॥
लभते पूर्वमेवार्था- ।
द्व्यपदेशं न तूत्तरम् ॥ ५ ॥

**टीका**—लभते । कोऽसौ दर्शनिकादिश्च दर्शनिकव्रतिकादि-रपि श्रावकविकल्पः । कं व्यपदेशं सञ्ज्ञां । किंविशिष्टं पूर्वमेव प्राक्तनमेव । न तु न पुनः । उत्तरं परापेक्षया परं । कस्मात् अर्थात् परमार्थतो व्यवहारादुत्तरमपि लभते । किंवत् तद्वत् नैष्ठिकमात्रवत् । किं कुर्वन् अव्रजन् अगच्छन् । किं तत् स्थैर्यं स्थिरत्वं क्वचित्कदाचित्कथंचिदचलनं । क्व स्वे स्वे व्रते निरतिचाराष्टमूलगुणादिलक्षणे ॥

**अर्थः**—त्याचप्रमाणें दर्शनिक वगैरे श्रावक आपापल्या मद्यविरति वगैरे मूलगुणांत व उत्तर गुणांतही जर कदाचित् अस्थिर होऊं लागतील तर त्यांना त्या प्रतिमेच्या पूर्वीच्या प्रतिमेचे धारक ह्मणून संज्ञा प्राप्त होईल.

परमार्थतः पुढील प्रतिमेची पदवी त्यांस असूं शकणार नाहीं.

एतदेव समर्थयितुमाह—

आणखी तेंच सांगतात.

प्रारब्धो घटमानो ।
निष्पन्नश्चार्हतस्य देशयमः ॥
योग इव भवति यस्य ।
त्रिधा स योगीव देशयमी ॥ ६ ॥

टीका—भवति । कोऽसौ स देशयमी श्रावकः । कतिधा त्रिधा त्रिप्रकारः । क इव योगीव यथा प्रारब्धयोगो घटमानयोगो निष्पन्नयोगश्चेति नैगमादिनयापेक्षया त्रिविधो योगी तथा प्रारब्धदेशसंयमो घटमानदेशसंयमो निष्पन्नदेशसंयमश्चेति त्रिविधः श्रावकोऽपि स्यादित्यर्थः । यस्य किं यस्यार्हतस्य जिनैकशरणस्य सतो भवति । कोऽसौ देशयमो देशसंयमः । किंविशिष्टः प्रारब्ध उपक्रान्तः । तथा घटमानः सम्पद्यमानः । तथा निष्पन्नः पर्यन्तं प्राप्तः । क इव योग इव समाधिर्यथा ॥

अर्थः—नैगमादि तीन नयांच्या अपेक्षेनें योगी जसा प्रारब्धयोग घटमानयोग व निष्पन्नयोग अशा भेदानें तीन प्रकारचा असतो; त्याचप्रमाणें, जिनच ज्याला देव आहे अशा श्रावकाचा देशसंयम,--(एकदेशचारित्र) प्रारब्ध (आरंभिलेला) देशसंयम, घटमान (संपादन केला जाणारा) देशसंयम आणि निष्पन्न (पूर्णपणें प्राप्त झालेला) देशसंयम अशा भेदानें तीन प्रकारचा असतो.

एवं स्थलशुद्धिं विधायाधुना दर्शनिकस्वरूपनिरूपणार्थं श्लोकद्वयमाह—

आतां, दर्शनिकाचें लक्षण कळण्याकरितां दोन श्लोक सांगतात.

पाक्षिकाचारसँस्कार- ।
दृढीकृतविशुद्धदृक् ॥
भवाङ्गबोधनिर्विण्णः ।
परमेष्ठिपदैकधीः ॥ ७ ॥
निर्मूलयन्मलान्मूल- ।
गुणेष्वग्रगुणोत्सुकः ॥
न्याय्यां वृत्तिं तनुस्थित्यै ।
तन्वन् दर्शनिको मतः ॥ ८ ॥

**टीका**—मतः एवम्भूतनयादिष्टः सूरिभिः । एतेन नैगमनयादेशात्पाक्षिकस्यापि दर्शनिकत्वमनुज्ञातं भवति । ततो न श्रावकपदानि देवैरेकादश देशितानीत्यनेन विरोधः पाक्षिकस्य द्रव्यतो दर्शनिकत्वात् । कोऽसौ मतः दर्शनिकः । किंलक्षणः पाक्षिकाचारस्य पूर्वाध्याये प्रपञ्चेनोक्तस्य संस्कार उत्कर्षस्तेन दृढीकृता निश्चलत्वं नीता विशुद्धा निर्दोषा दृक् दर्शनं येन स पाक्षिकाचारसंस्कारदृढीकृतविशुद्धदृक् । तथा भवाङ्गभोगनिर्विण्णः भवाङ्गभोगाः संसारशरीरेष्टविषयाः । अथवा भवाङ्गं संसारकारणं यो भोगो गृद्धिपूर्वकं कामिन्यादिविषयसेवनं ततो निर्विण्णो विरक्तः प्रत्याख्यानावरणाख्यचारित्रमोहकर्मविपाकवशात् कामिन्यादिविषयान् भजन्नपि तत्राकृतसेवानिर्बन्ध इत्यर्थः । तथा परमेष्ठिपदैकधीः परमेष्ठिपदेषु अर्हदादिपञ्चगुरुचरणेषु एका धीरन्तर्दृष्टिर्यस्य स तथोक्तः । आपदाकुलितोऽपि दर्शनिकस्तन्निवृत्त्यर्थं शासनदेवतादीन् कदाचिदपि न

भजते । पाक्षिकस्तु भजत्यपीत्येवमर्थमेकग्रहणं । तथा निर्मूलयन् मूलादपि निरस्यन् । कान् मलान् अतिचारान् । केषु मूलगुणेषु । तथा अग्रगुणोत्सुकः अग्रगुणे व्रतिकपदे उत्सुकोऽनुष्ठातुमुत्कण्ठितः । तथा तन्वन्ननुबध्नन् । कां वृत्तिं कृष्यादिवार्तां । किंविशिष्टां न्याय्यां स्ववर्णकुलव्रतानुरूपां । किमर्थं तनुस्थित्यै शरीरवर्तनार्थं न विषयोपसेवनार्थं । एवंविधलक्षणो दर्शनिको नाम श्रावको मन्यते ॥

**अर्थः—पूर्व अध्यायांत वर्णिलेला जो पाक्षिकश्रावकाचा आचार त्याच्या संस्कारानें ह्मणजे उत्कर्षानें ज्याचें निर्मल सम्यग्दर्शन दृढ झालें आहे असा, संसारास कारणीभूत जे विषयभोग त्यांस कंटाळलेला, कोणत्याही संकटसमयींही पंचपरमेष्ठीशिवाय इतरांस ह्मणजे जिनशासनदेवतांसही मनांत न आणणारा, मद्यविरति वगैरे जे आठ मूलगुण त्यांचे अतिचार मूळासकट नाहींसे करणारा, उत्तर गुण स्वीकारण्याविषयीं उत्सुक झालेला व विषयसेवनाकरितां नसून केवळ देहरक्षणाकरितां न्याय्य अशी वृत्ति**

---

१ आदावेते स्फुटमिह गुणा निर्मला धारणीयाः ।
पापध्वंसि व्रतमपमलं कुर्वता श्रावकीयम् ॥
कर्तुं शक्यं स्थिरमुरुभरं मन्दिरं गर्त्तपूरं ।
न स्थेयोभिर्दृढतममृते निर्मितं ग्रावजालैः ॥१॥

अर्थः – पापाचा ध्वंस करणारीं श्रावकांचीं व्रतें निर्मळ ठेवूं इच्छिणारानें प्रथम मद्यविरति वगैरे गुण निर्दोषपणें पाळिले पाहिजेत. त्याशिवाय पुढील व्रतें पाळिलीं जाणार नाहींत. मोठमोठ्या दगडांनीं निर्माण केलेलें घर चांगला खळगा काढून बळकट पाया घातलेला असल्याशिवाय स्थिर करणें शक्य नाहीं.

(कृषि वगैरे) धारण करणारा जो श्रावक तो दर्शनिक होय. असें एवंभूतनयाच्या अपेक्षेनें मानिलें आहे. ह्मणजे त्याला नैष्ठिक दर्शनिक श्रावक ह्मणण्यास कोणतीच हरकत नाहीं. व या श्लोकांतील पहिल्या चरणावरून नैगमनयाच्या अपेक्षेनें पाक्षिक श्रावकासही दर्शनिक पदवी देण्यास हरकत नाहीं.

अथ मद्यादिव्रतद्योतनार्थं तद्विक्रयादिप्रतिषेधार्थमाह—

आतां, मद्यविरति वगैरे व्रतांच्या उद्योताकरितां, मद्य-विक्रय वगैरे करूं नये हें सांगतात.

मद्यादिविक्रयादीनि ।
नार्यः कुर्यान्न कारयेत् ॥
न चानुमन्येत मनो- ।
वाक्कायैस्तद्व्रतद्युते ॥ ९ ॥

टीका—न कुर्यात् कोऽसौ आर्यो दर्शनिकः । कानि मद्यादि-विक्रयादीनि मद्यादीनां मद्यमांसमधुनवनीतप्रभृतीनां विक्रयादीनि आदिशब्दात्सन्धानकसंस्कारोपदेशाद्युपादानं । तथा न कारयेत् । न

---

१ कृषिं वणिज्यां गोरक्ष्यमुपायैर्गुणिनं नृपम् ॥
लोकद्वयाविरुद्धां च धनार्थी संश्रयेत् क्रियाम् ॥ २२ ॥

अर्थः—ज्याला द्रव्य पाहिजे त्यानें गुणी जनाच्या आश्रयास राहून; शेतकी, व्यापार, गोरक्षण वगैरे उपाय करावे. आणि इहलोकीं व परलोकीं विरुद्ध नसलेली क्रिया करावी. म्हणजे धर्म संभाळून धन मिळवावें. कारण, इहलोकीं व परलोकीं सुख देणारा धर्मच आहे. केवळ देहाच्या रक्षणाकरितां कृषि वगैरे उद्योग करावे. ह्मणजे विषयोपसेवनाकरितां करूं नयेत.

चानुमन्येत नाप्यनुमतिं दद्यात् । कैर्मनोवाक्कायैः मनसा वाचा कायेन च । किमर्थं तद्व्रतद्युते मद्यविरत्याद्यष्टमूलगुणनिर्मलीकरणार्थम् ॥

**अर्थ—मद्यविरति वगैरे जे आठ मूलगुण, ते निर्मल ठेवण्याकरितां, आर्य ह्मणजे दर्शनिक, त्यांनें मद्य, मांस, मधु, नवनीत (लोणी) वगैरे पदार्थांचा विक्रय, उपदेश (तें तयार करण्याची रीति सांगणें) वगैरे करूं नये; सांगून करवूं नये; करणारांस बरें मानूं नये.**

यच्छीलनान्मद्यादिव्रतक्षतिः स्यात्तदुपदेशार्थमाह—

भजन्मद्यादिभाजस्स्त्री- ।
स्तादृशैः सह संसृजन् ॥
भुक्त्याऽऽदौ चैति साकीर्तिं ।
मद्यादिविरतिक्षतिम् ॥ १० ॥

**टीका**—एति गच्छति । कोऽसौ व्रती पुमान् । कां मद्यादिविरतिक्षतिं अष्टमूलगुणहानिं । किंविशिष्टां साकीर्तिं वाच्यतासहितां । किं कुर्वन् भजन् सेवमानः । काः स्त्रीः । किंविशिष्टाः मद्यादिभाजो मद्यमांसादिसेविनीः । न केवलं ता भजन् संसृजंश्च संसर्गं कुर्वन् । कैः सह तादृशैर्मद्यादिभाग्भिः पुम्भिः । क्व भुक्त्यादौ भोजनभाजनासनादौ ॥

**अर्थः—मद्यपान व मांसभक्षण वगैरे करणाऱ्या स्त्रियांशीं**

---

१ मद्यादिस्वादिगेहेषु पानमन्नं च नाचरेत् ॥
तदामत्रादिसम्पर्कं न कुर्वीत कदाचन ॥ २३ ॥

**अर्थः—मद्य, मांस वगैरे सेवन करणाऱ्यांच्या घरीं अन्नपान आचरूं नये व त्यांचीं भांडीं वगैरे केंव्हाही शिवूं नयेत.**

रत होणारा व तशा पुरुषांसह भोजन, शयन वगैरे करणारा मनुष्य मद्यविरति वगैरे व्रतांपासून भ्रष्ट होतो व अपकीर्तीस पोंचतो. त्याची सर्वत्र निंदा होते.

एवं सामान्यतो मूलव्रतातिचारनिवृत्तिमभिधाय मद्यादिव्रतातिचारनिवृत्त्यर्थमाह—

याप्रमाणें मूलव्रतातिचार सामान्यपणें सांगून आतां मद्यविरति व्रताचे अतिचार टाळण्याकरितां सांगतात.

सन्धानकं त्यजेत्सर्वं ।
दधि तक्रं द्व्यहोषितम् ॥
काञ्जिकं पुष्पितमपि ।
मद्यव्रतमलोऽन्यथा ॥११॥

टीका—त्यजेत् । कोऽसौ दर्शनिकः । किं तत् सन्धानकं । किंविशिष्टं सर्वं । एतेन काञ्जिकवटकादेरपि हेयत्वं दर्शयति । उक्तं च—जायन्तेऽनन्तशो यत्र प्राणिनो रसकायिकाः ॥ सन्दानानि न वल्भ्यन्ते तानि सर्वाणि भाक्तिकाः ॥ १ ॥ तथा त्यजेत् किं तत् दधितक्रं दधि च मथितं च । किंविशिष्टं द्व्यहोषितं अहोरात्रिद्वयमतिक्रान्तं । तथा त्यजेत् । काञ्जिकं धान्याम्लं । किंविशिष्टं पुष्पितं सपुष्पमिव जातं । अपिशब्दाद्व्यहोषितं च । अन्यथा उक्तविपर्यये । भवति कोऽसौ मद्यव्रतमलः मद्यविरत्यतिचारः ॥

अर्थः— दर्शनिक श्रावकानें, मद्यासारखे सर्व प्रकारचे मादक पदार्थ-(कुजत घालून किंवा शिजवून तयार केलेले पेय पदार्थ ), दोन रात्रींच्या नंतरचें दहि व ताक आणि

---

१ जायन्तेऽनन्तशो यत्र प्राणिनो रसकायिकाः ॥
सन्धानानि न वल्भ्यन्ते तानि सर्वाणि भाक्तिकाः ॥२४॥

नासलेली तांदूळ नाचणे वगैरेची कांजी ( अंबील ) इत्यादि पदार्थ सेवन करूं नयेत. हीं सेवन केल्यास मद्यव्रताचा अतिचार होतो. [ 'अपि' शब्दानें कांजी सुद्धां दोन रात्रीं-नंतरची सेवूं नये असें दर्शविलें आहे. ]

मांसविरत्यतिचारानाह—

आतां, मांसविरतीचे अतिचार सांगतात.

चर्मस्थमम्भः स्नेहश्च ।
हिंग्वसँहृतचर्म च ॥
सर्वं च भोज्यं व्यापन्नं ।
दोषः स्यादामिषव्रते ॥ १२ ॥

टीका—स्यात् भवेत् । किं तत् चर्मस्थमम्भःप्रमुखमुपयुज्यमानं । किं स्यात् दोषोऽतिचारः । क्व आमिषव्रते मांसविरतौ प्रतिपन्नायां । किं किं तदित्याह—अम्भो जलं । स्नेहश्च घृतादिकं दोषः स्यात् । किंविशिष्टं चर्मस्थं दृत्यादिस्थं जलं कुतुपादिस्थं च घृतादिकमुपयुज्यमानं । एतेन खट्टिकायादिस्थबच्चटिकादिस्थचूतफलादीनां चर्मोपनद्धचालनीशूर्पटिकाद्युपस्कृतकणिकादीनां च त्याज्यतामुपलक्षयति । तथा हिंगु रामठं दोषः स्यात् । किंविशिष्टं असंहृतचर्म असंहृतं स्वस्वभावेनापरिणामितं चर्म येन तत् । असंवृतचर्मेति वा पाठः । तत्र चर्मणा छादितं चर्मणि बद्धं प्रसारितं वा रामठं न गृह्णीयादिति भावः । उपलक्षणमेतत् । तेन तथाभूतं लवणाद्यपि । तथा भोज्यं भक्तघृतादि सर्वं । किंविशिष्टं व्यापन्नं कुथितं स्वादचलितमिति यावत् ॥

अर्थः—चर्मपात्रांत ठेविलेलें जल, तेल, तूप व चर्मानें

---

अर्थः—ज्यांत रसकायिक जीव अनंत उत्पन्न होतात अशीं सर्वप्रकारचीं पेयें दर्शनिक श्रावक पीत नाहींत.

आच्छादिलेला हिंग, आणि नासलेलें सर्व प्रकारचें अन्न हीं सेवणें मांसविरतिव्रताचे अतिचार होत. शिवाय, चर्मनिर्मित सूप चाळण वगैरे पात्रांतील कणीक घेऊं नये. आणि तसेंच चर्मपात्रांत ठेविलेलें मीठ, आंबे वगैरे पदार्थही सेवूं नयेत.

मधुव्रतातिचारनिवृत्त्यर्थमाह—

**मधुव्रताचे अतिचार टाळण्यास सांगतात.**

**प्रायः पुष्पाणि नाश्नीया- ।**
**न्मधुव्रतविशुद्धये ॥**
**बस्त्यादिष्वपि मध्वादि- ।**
**प्रयोगं नार्हति व्रती ॥ १३ ॥**

**टीका**—नाश्नीयात् न भक्षयेत् मधुविरतः । कानि पुष्पाणि । किमर्थं मधुव्रतविशुद्धये । क्षौद्रविरत्यातिचारनिवृत्त्यर्थं । कथं प्रायः । तेन मधूकभल्लातकपुष्पाणां शक्यशोधनत्वान्नात्यंतनिषेधः । शुष्कत्वान्नागकेसरादीनामपीति लक्षयति । तथा नार्हति न कर्तुं योग्यो भवति । कोऽसौ व्रती मधुमांसमद्येभ्योऽतिशयेन निवृत्तः । कं मध्वादिप्रयोगं माक्षिकमांसमद्योपयोगं । केषु बस्त्यादिषु बस्तिकर्मपिण्डप्रदाननेत्राञ्जनसेचनलूताग्रासादिषु । किं पुनः स्वास्थ्यानुवृत्तिवाजीकरणादिविधिष्वित्यपिशब्दार्थः ॥

**अर्थः**—मधुव्रताच्या विशुद्धीकारितां ह्मणजे अतिचार न होण्याकारितां; मधुत्यागी श्रावकानें, बहुतकरून कोणतींही भल्लातक ( बिबा ) वगैरेचीं फुलें शोधून पहाण्यास शक्य आहेत ह्मणून व नागकेसर वगैरेचीं फुलें शुष्क असतात ह्मणून तीं खाण्यास फारसा निषेध केलेला नाहीं.

त्याप्रमाणेंच व्रती श्रावकानें बस्तिकर्म, पिंडप्रदान, नेत्रांजन वगैरे करण्याच्या कामीं मधु, मांस व मद्य वगैरेचा उपयोग करूं नये. 'अपि' शब्दाचा अर्थ असा आहे कीं, देहास स्वास्थ्य व्हावें ह्मणून व वाजीकरण वगैरे करण्याकारितांही मद्यादिकांचा उपयोग करूं नये.

पञ्चोदुम्बराविरत्यतिचारपरिहारार्थमाह—

पंचोदुंबरविरति व्रताचे अतिचार टाळण्याचें सांगतात.

सर्वं फलमविज्ञातं ।
वार्ताकादि त्वदारितम् ॥
तद्वद्भल्लादिसिम्बीश्च ।
खादेन्नोदुम्बरव्रती ॥ १४ ॥

टीका— न खादेन्न भक्षयेत् । कोऽसौ उदुम्बरव्रती पिप्पलादिफलनिवृत्तः । किं तत् फलं सर्वं । किंविशिष्टमविज्ञातमज्ञातनाम । तथा न खादेत् । किं तत् वार्ताकादि । आदिशब्देन कर्चरबदरपूगफलादि । किंविशिष्टं अदारितमभिन्नं अशोधितमध्यमित्यर्थः । तथा भल्लादिसिम्बीः भल्लराजमाषप्रमुखफलिका न खादेत् । किंवत् तद्वत् अदारिता इत्यर्थः ॥

अर्थः—उदुंबरत्यागी श्रावकानें, ज्याचें नांव ठाऊक नाहीं असें कोणतेंहि फळ खाऊं नये. डोरली (रानवांगी), सुपारी, बोर वगैरे पदार्थ चिरून पाहिल्याशिवाय खाऊं नयेत. त्याचप्रमाणें पावटे, उडीद शेंगा वगैरे पदार्थ फोडून चांगले पाहिल्याशिवाय खाऊं नयेत.

अनस्तमितभोजनातिचारमाह—

आतां, रात्रिभोजनत्याग व्रताचे अतिचार सांगतात.

मुहूर्तेऽन्त्ये तथाऽऽद्येऽह्नो ।
वल्भाऽनस्तमिताशिनः ॥
गदच्छिदेऽप्याम्रघृता- ।
द्युपयोगश्च दुष्यति ॥ १५ ॥

टीका— दुष्यति दोषो भवति । कोऽसौ वल्भा भोजनं । क मुहूर्ते घटिकाद्वये । कस्य अह्नो दिनस्य । किंविशिष्टेऽन्त्ये पर्यन्तवर्तिनि । तथा आद्ये प्रथमे । कस्यानस्तमिताशिनः अनस्तमिते सूर्येऽश्नातीत्येवंव्रतस्य । तथा दुष्यति । कोऽसौ आम्रघृताद्युपयोगः चूतचारचोचमोचादिफलानां घृतक्षीरेक्षुरसादीनां च सेवनं । कस्यै गदच्छिदे रोगनिवृत्त्यर्थं । किं पुनः स्वास्थ्यानुवृत्त्याद्यर्थमित्यपिशब्दार्थः ॥

अर्थः—सूर्यास्त होण्याच्या पूर्वींच भोजन करण्याचें व्रत ज्याला आहे अशा श्रावकानें दिवसांच्या पाहिल्या व शेवटच्या मुहूर्तांवर ह्मणजे सकाळीं दोन घटिकेच्या आंत व संध्याकाळीं सूर्यास्त होण्याच्या पूर्वीं दोन घटिकेच्या आंत अन्न सेवन करूं नये. फारतर काय, रोगाच्या नाशाकरितां आम्र वगैरे फळें व तूप, दूध, पाणी वगैरे पदार्थ सेवणेंही दोष आहे. मग, नीरोग अवस्थेंत सेवन करणें दोषाचें होईल हें सांगावयास नकोच.

जलगालनव्रतातिचारनिवृत्त्यर्थमाह—

आतां, जलगालन व्रताचे अतिचार टाळण्यास सांगतात,

मुहूर्तयुग्मोर्ध्वमगालनं वा ।
दुर्वाससा गालनमम्बुनो वा ॥

अन्यत्र वा गालितशोषितस्य ।

न्यासो निपानेऽस्य न तद्व्रतेऽर्च्यः॥१६॥

टीका— अर्च्य इति लिङ्गविपरिणामेन सन्बन्धः । न अर्च्यं निन्द्यमित्यर्थः । किं तत् अगालनमश्रावणं । कस्याम्बुनो जलस्य । कथं मुहूर्तयुग्मोर्ध्वं घटिकाचतुष्टयादुपरि । क्व तद्व्रते गालितजलपाननिष्ठायां । वाशद्धास्त्रयोऽपि परस्परसमुच्चये । तथा नार्च्यं । किं तत् अम्बुनो गालनं । केन दुर्वाससा अल्पसच्छिद्रजर्जरादिवस्त्रेण । तथा नार्च्यः । कोऽसौ न्यासः स्थापनं । कस्याम्बुनः । किंविशिष्टस्य गालितशोषितस्य वस्त्रस्रावितादुद्धरितस्य । क्व निपाने जलाशये । किंविशिष्टेऽन्यत्र स्वाधारजलाशयादन्यस्मिन् ॥ अथ "पंचुंबरसहियाइं सत्तवि वसणाइ जो विवज्जेइ । सम्मत्तविसुद्धमई सो दंसणसावओ भणिओ ॥ १ ॥" इति वसुनन्दिसैद्धान्तिमते ॥

अर्थः—एकदां गाळिलेलें असलें तरी त्यानंतर चार घटिकांनीं पुनः न गाळणें, मळकट कपड्यानें गाळणें व गाळल्यानंतर कापडांत उरलेलें पाणी शोधून आणिलें तेथें न टाकितां दुसऱ्या ठिकाणच्या पाण्यांत टाकणें, जमिनीवरच सांडणें हे जलगालन व्रताचे अतिचार होत.

दर्शनिकस्य द्यूतादिव्यसननिवृत्तिमुपदेष्टुं तेषामिहामुत्र चापावद्यप्रायत्वमुदाहरणद्वारेण व्याहरन्नाह—

आतां, दर्शनिक श्रावकानें सप्तव्यसनें टाळावींत ह्मणून उपदेश करण्याकरितां, त्यापासून इहपरलोकीं होणारा अपाय उदाहरणानें सांगतात.

द्यूताद्धर्मतुजो बकस्य पिशितान्मद्याद्यदूनां विप- ।

चारोः कामुकया शिवस्य चुरया यद्ब्रह्मदत्तस्य च ॥
पापर्द्ध्या परदारतो दशमुखस्योच्चैरनुश्रूयते ।
द्यूतादिव्यसनानि घोरदुरितान्युज्झेत्तदार्यस्त्रिधा ॥१७॥

**टीका**—उज्झेत् त्यजेत् । कोऽसावार्यः सद्व्रती गृही । कथं त्रिधा मनोवाक्कायकृतकारितानुमतैः । कानि द्यूतादीनि व्यसनानि । द्यूतमांसमद्यवेश्याचौर्यपापर्द्धिपरदारोपसेवनानि । किंविशिष्टानि घोर-दुरितानि घोराणि दुर्गतिदुःखकारणानि दुरितानि पापानि येभ्य-स्तानि । कथं तत्तस्मात् । यद्यस्मादनुश्रूयते वृद्धपरम्परया आकर्ण्यते । काऽसौ विपत् । कथम्भूता उच्चैः प्रकृष्टा । कस्मात् द्यूतात् द्यूतक्रीडनात् । कस्य धर्मतुजो धर्मपुत्रस्य युधिष्ठिरस्य । तथोच्चैर्विपदनुश्रूयते । कस्य बकस्य बकनाम्नो राज्ञः । कस्मात् पिशितात् मांसभक्षणात् । तथोच्चैर्विपदनुश्रूयते । केषां यदूनां यदोरपत्यानां यादवानां । कस्मात् मद्यात् मद्यपानात् । तथा उच्चै-र्विपदनुश्रूयते । कस्य चारोः चारुदत्तनाम्नः श्रेष्ठिनः । कया कामुकया वेश्योपसेवनया । तथा उच्चैर्विपदनुश्रूयते । कया चुरया चौरिकया । कस्य शिवभूतिनाम्नो द्विजस्य । तथा उच्चैर्विपदनु-श्रूयते । कस्य ब्रह्मदत्तस्य ब्रह्मदत्तनाम्नोऽन्त्यचक्रवर्तिनः । कया पापर्द्ध्या आखेटकेन । तथा उच्चैर्विपदनुश्रूयते । कस्य दशमुखस्य रावणस्य । कुतः परदारतः परस्त्रीगमनाभिलाषनिर्बन्धेन ॥

**अर्थः**—जुगारापासून युधिष्ठिराला, मांसभक्षणापासून बकराजाला, मद्यपानापासून यादवांनां, वेश्यासंगानें चारु-दत्तश्रेष्ठीला, चौर्यकर्मानें शिवभूति ब्राह्मणाला, शिकारीनें ब्रह्मदत्तराजाला, आणि परस्त्रीगमनाभिलाषानें रावणाला मोठी विपत्ति आली हें परंपरेनें सर्वांच्या ऐकण्यांत आलें

आहेच. याकरितां ज्यांना भयंकर पातकें ह्मणतात अशीं हीं जुगार वगैरे ७ व्यसनें सत्पुरुषानें सर्वथा सोडून द्यावीं.

व्यसनशब्दनिरुक्तिद्वारेण द्यूतादेर्घोरदुरितश्रेयःप्रत्यावर्तनहेतुत्वं समर्थ्य तद्विरतस्य तत्समानफलत्वाद्धातुपाताद्युपव्यसनानामपि दूरपरिहरणीयतामुपदिशति —

आतां, व्यसनशब्दाची निरुक्ति वगैरे सांगून, उपव्यसनेंही टाळण्यास सांगतात.

जाग्रत्तीव्रकषाककर्कशमनस्कारार्पितैर्दुष्कृतै- ।
श्चैतन्यं तिरयत्तमस्तरदपि द्यूतादि यच्छ्रेयसः ॥
पुँसो व्यस्यति तद्विदो व्यसनमित्याख्यान्त्य-
तस्तद्व्रतः । कुर्वीतापि रसादिसिद्धिपरतां
तत्सोदरीं दूरगाम् ॥ १८ ॥

**टीका**— आख्यान्ति व्यपदिशन्ति । के ते विदो विद्वाँसः । किं तत् द्यूतादिसप्तकं । किमाख्यान्ति व्यसनं व्यसनमितिशब्देन व्यवहरन्तीत्यर्थः । कथं तत् तस्मात् । यद्यस्मात् व्यस्यति प्रत्यावर्तयति । किं तत् द्यूतादि कान् पुँसः पुरुषान् । कस्मात् श्रेयसः अकल्याणं प्रापयतीत्यर्थः । किं कुर्वत् तिरयत् छादयत् । किं तत् चैतन्यमन्तस्तत्त्वं । कैः दुष्कृतैः पापैः । किंविशिष्टैः जाग्रदित्यादि जाग्रद्भिर्नित्योदितैस्तीव्रैर्दुर्निवारैः कषायैः क्रोधादिभिः कर्कशः कठोरो दृढकर्मबन्धसम्पादनोद्यतो मनस्कारश्चित्तप्रणिधानं तेनार्पितैरात्मना संयोजितैः । किं कुर्वदपि तरदपि अतिक्रामत् । किं तत् तमो मिथ्यात्वं । किं पुनर्मिथ्यात्वे विवर्तमानमित्यपिशब्दार्थः । यत एवं तत एतस्मात् कारणात् कुर्वीत विदधीत । कोऽसौ तद्व्रतः द्यूतादिविरतिं प्रतिपन्नः ।

कां रसादिसिद्धिपरतामपि, न परं द्यूतादिपरतामित्यपिशब्दार्थः। किंविशिष्टां दूरगां दूरवर्तिनीं। किंविशिष्टां यतस्तत्सोदरीं द्यूतादिव्यसनसदृशीं। दुरन्तदुष्कृतबन्धश्रेयःप्रत्यावर्तनहेतुत्वाविशेषात्। रसादीत्यादिशब्देनाञ्जनगुटिकापादुकाविवरप्रवेशादि गृह्यते॥

अर्थः—सतत उदय पावलेले व दुर्निवार असे जे क्रोध वगैरे कषाय त्यांच्या योगानें कर्कश झालेला जो मनाचा परिणाम; त्यामुळें घडूं लागलेल्या दुष्कृत्यांच्या योगानें चैतन्यास (आत्मस्वरूपास) झांकणारें व मिथ्यात्वास पोंचविणारें हें द्यूतादि व्यसन मनुष्यास कल्याणापासून परतवितें ह्मणून विद्वान् लोक त्याला व्यसन असें ह्मणतात. याकरितां द्यूतत्यागी श्रावकानें चित्तभ्रामक असे किमया करणें, पारा सिद्ध करणें वगैरे नादही सोडून द्यावेत.

द्यूतनिवृत्त्यतिचारमाह—

आतां, द्यूतविरति व्रताचे अतिचार टाळण्यास सांगतात.

दोषो होढाद्यपि मनो- ।
विनोदार्थं पणोज्झिनः ॥
हर्षामर्षोदयाङ्गत्वात् ।
कषायो ह्यंहसेऽञ्जसा ॥ १९ ॥

टीका—भवति। किं तत् होढादि। होढा परस्परस्पर्धया धावनादि। आदिशब्देन द्यूतदर्शनादि। किं भवति दोषोऽतिचारः। कस्य पणोज्झिनः पणं द्यूतमुज्झतीत्येवंव्रतस्य। किमर्थं मनोविनोदार्थमपि मनोऽपि रमयितुं प्रयुज्यमानं दोषः किं पुनर्धनाद्यर्थं। कुतो हर्षामर्षोदयाङ्गत्वात् प्रमोदक्रोधोद्भवहेतुत्वात्। एतदपि समर्थयितुमाह हि यस्माद्भवति। कोऽसौ कषायो रागद्वेषपरिणामः। कस्मै

अंहसे पापनिमित्तं । केन अञ्जसा परमार्थेन ॥

**अर्थः**—पण ह्मणजे जुगार, तें ज्यानें सोडिलें आहे अशा मनुष्यानें मनोरंजनाकरितांही पैज मारणें ( ईर्षेनें पळणें, उडी मारणें वगैरे ) व तसले खेळ पाहाणें हा दोष आहे. कारण, पैज मारण्यापासून व असले खेळ पाहण्यापासून हर्ष व क्रोध इत्यादि विकार उत्पन्न होतात. आणि कषाय ह्मणजे रागद्वेषरूप परिणाम, हाच खरोखर पापाला कारण होतो.

वेश्याव्यसनव्रतातिचारनिवृत्त्यर्थमाह—

आतां, वेश्याविरति व्रताचे अतिचार टाळण्यास सांगतात.

त्यजेत्तौर्यत्रिकासक्तिं ।
वृथाट्यां षिड्गसङ्गतिम् ॥
नित्यं पण्याङ्गनात्यागी ।
तद्गेहगमनादि च ॥ २० ॥

**टीका**—त्यजेत् । कोऽसौ पण्याङ्गनात्यागी वेश्यानिवृत्तिव्रतः । किं किं तौर्यत्रिकासक्तिं गीतनृत्यवाद्येषु सेवानिबन्धं । आसक्तिग्रहणाच्चैत्यालयादौ धर्मार्थं गीतश्रवणं न दोष इति लक्षयति । तथा वृथाट्यां प्रयोजनं विना विचरणां त्यजेत् । तथा षिङ्गसङ्गतिं विटैः सह साङ्गत्यं त्यजेत् । षिङ्ग इति षिट् सिट् अनादरे । सेटनं सिट् अनादरः । सिटा अनादरेण गायति गच्छति वा । अन्यतोऽपि चेति डः । पृषोदरादित्वात्सस्य च षत्वं । तथा तद्गेहगमनादि वेश्यागृहगमनसम्भाषणसत्कारादि त्यजेत् । नित्यमित्यनेन सर्वदा अत्र व्रते यत्नं कुर्यात् दुर्निवारत्वादित्युपदिशति ॥

**अर्थः**—वेश्याव्यसनाचा त्याग ज्यानें केला आहे अशा गृहस्थानें गीत नृत्य व वाद्य यांच्या ठिकाणीं आसक्ति ठेवणें ( पण जिनालयांत जिनगुणगायन, वादन व नर्तन करण्यास व बघण्यास हरकत नाहीं ), विनाकारण रस्त्यानें हिंडणें, जारपुरुषाची संगति व वेश्यांच्या घरीं जाणें येणें, त्यांचा सत्कार वगैरे हीं केव्हांही करूं नयेत.

चौर्यव्यसनमलोपदेशार्थमाह—

आतां, चौर्यविरति व्रताचे अतिचार सांगतात.

दायादाज्जीवतो राज- ।
वर्चसाद्गृह्णतो धनम् ॥
दायं वाऽपन्हुवानस्य ।
क्काचौर्यव्यसनं शुचि ॥ २१ ॥

**टीका**—क्व कस्मिन्देशे काले च । अचौर्यव्यसनं चोरिकापरिहारव्रतं । शुचि निरतिचारं भवति न क्वापीत्यर्थः । कस्य पुंसः । किं कुर्वतो गृह्णतः स्वीकुर्वतः । किं तत् धनं ग्रामसुवर्णादिद्रव्यं । कस्मात् दायादात् दायं कुलसाधारणं द्रव्यमादत्ते इति दायादो भ्रात्रादिस्तस्मात् । किं कुर्वतो जीवतः । मृतस्य तु यथान्यायं स्वीकुर्वतो नास्ति दोषः । कस्माद्गृह्णतो राजवर्चसात् नृपतेजसः न जातिकुलदेशकालाद्यनुरोधात् । तथा अपन्हुवानस्य भ्रात्रादिभ्यः अपलपतः । कं दायम् ॥

**अर्थः**—भाऊबंद जीवंत असून त्यांचें द्रव्य राजसत्तेनें ( जबरदस्तीनें ) हरण करणाऱ्या व आपल्या भाऊबंदास द्यावयाचा वांटा छपवून ठेवणाऱ्या श्रावकांचें अचौर्यव्रत कोठून शुद्ध असणार!

पापर्द्धिविरत्यतीचारनिषेधार्थमाह—

आतां, पापर्द्धिविरति व्रताचे अतिचार सांगतात.

वस्त्रनाणकपुस्तादि- ।
न्यस्तजीवच्छिदादिकम् ॥
न कुर्यात्त्यक्तपापर्द्धि- ।
स्तद्धि लोकेऽपि गर्हितम् ॥ २२ ॥

टीका—न कुर्यात् । कोऽसौ त्यक्तपापर्द्धिः मृगयाविरतः । किं तत् वस्त्रेत्यादि वस्त्राणि पञ्चरङ्गपटादीनि । नाणकानि सीतारामटङ्कादीनि । पुस्तादीनि च लेप्यचित्रकाष्ठाश्मदन्तधात्वादिशिल्पानि । वस्त्राणि च नाणकानि च पुस्तादीनि च वस्त्रनाणकपुस्तादीनि तेषु न्यस्तो नामोच्चारणपूर्वकः सोऽयमिति स्थापितो जीवः प्राणी गजतुरगादिस्तस्य छिदादिकं खण्डनावर्तनभञ्जनादि । हि यस्मात् । भवति । किं तत् वस्त्रादिन्यस्तजीवच्छेदादिकं । किंविशिष्टं गर्हितं निन्दितं । क्व लोकेऽपि व्यवहर्तृजनमध्येऽपि न परं शास्त्रे ॥

अर्थः—मृगयेचा ( शिकारीचा ) ज्यानें त्याग केला आहे अशा गृहस्थानें मातीचीं व वस्त्रावर काढलेलीं चित्रें, नाणीं, काष्ठ, पाषाण इत्यादिकांवर कोरलेलीं प्राण्यांचीं चित्रें फोडून, फाडून किंवा पुसून नाश करूं नयेत. परमार्थ तर राहूंदेच. पण, व्यवहारांतसुद्धां असलें काम करणारांस लोक निंदितात.

परदारव्यसनदोषनिषेधार्थमाह—

आतां, परस्त्रीव्यसनत्याग व्रताचे अतिचार टाळण्यास सांगतात.

कन्यादूषणगान्धर्व- ।
विवाहादि विवर्जयेत् ॥
परस्त्रीव्यसनत्याग- ।
व्रतशुद्धिविधित्सया ॥ २३ ॥

टीका—विवर्जयेत् । कोऽसौ परदारवर्जी । किं तत् कन्येत्यादि कन्यादूषणं कुमार्या अभिगमनं स्वविवाहनार्थे दोषोद्भावनं वा । गान्धर्वविवाहो यो मातुः पितुर्बन्धूनां चाप्रामाण्यात्परस्परानुरागेण मिथः समवायाद्वधूवराभ्यां क्रियते । आदिशब्देन हरविवाहो हरणादि । कया परस्य स्त्री परस्त्री तत्र तदेव वा व्यसनं तस्य त्यागः स एव व्रतं तस्य शुद्धिर्निर्दोषता तत्र विधित्सा कर्तुमिच्छा तया ॥

अर्थः—परस्त्रीव्यसनाचा त्याग नावाचें व्रत शुद्ध ठेवण्याकरितां, कुमारीशीं गमन करूं नये, गांधर्व ( गुरुजनांस न कळवितां एकमेकांच्या संमतीनें ) विवाह करूं नये; व दुसऱ्याची मुलगी बलात्कारानें आणणें किंवा पैसे देऊन आपला विवाह करणें ह्या गोष्टी करूं नयेत.

मद्यमांसव्यसननिवृत्त्योस्त्वतीचाराः प्रागेवोक्ताः । इदानीं यतो लोकद्वयविरुद्धबुध्द्या आत्मना विरतिः क्रियते परस्मिन्नपि तत्प्रयोगं तद्व्रतविशुध्द्यर्थं न विदध्यादित्यनुशास्ति—

सप्तव्यसनांपैकीं मद्य व मांस यांचे अतिचार पूर्वीं सांगितले आहेतच. आतां, वरील सर्व व्रतांच्या विशुद्धीकरितां एक विशेष नियम सांगतात.

व्रत्यते यदिहामुत्रा- ।
प्यपायावद्यकृत्स्वयम् ॥

तत्परेऽपि प्रयोक्तव्यं ।
नैव तद्व्रतशुद्धये ॥ २४ ॥

**टीका**—व्रत्यते संकल्पपूर्वं प्रत्याख्यायते । किं तत् यत् वस्तु । किंविशिष्टं अपायावद्यकृत् अपायोऽभ्युदयनिःश्रेयसभ्रंशनोपायः । अवद्यं गर्ह्यं अपायश्चावद्यं चापायावद्ये ते करोति तत् । क्व इहास्मिञ्जन्मनि । तथाऽमुत्र परजन्मनि । केन व्रत्यते स्वयं आत्मना । तत् व्रतविषयीकृतं वस्तु । नैव प्रयोक्तव्यं प्रयोज्यं । क्व परेऽपि आत्मनीव पुरुषान्तरेऽपि । कस्यै व्रतशुद्धये प्रकृतव्रतनिर्मलीकरणार्थम् ॥

**अर्थः**—इहलोकीं व तसेंच परलोकींही अपाय (सुखाचा नाश) करणारी व निंद्य अशी जी वस्तू आपण सोडून देतों, ती अन्य पुरुषासहि आपण होऊन उपयोगास देवूं नये. ह्मणजे त्यायोगानें आपण त्या वस्तूविषयीं केलेलें व्रत शुद्ध असतें.

एवं प्रतिपन्नदर्शनप्रतिमस्य श्रावकस्य स्वप्रतिज्ञानिर्वाहार्थमुत्तरेण प्रबन्धेन शिक्षां प्रयच्छन्नाह—

याप्रमाणें व्रतें पाळून ज्याला दर्शन प्रतिमा प्राप्त झाली आहे अशा श्रावकाला त्याच्या प्रतिज्ञांच्या निर्वाहाकरितां पुढील श्लोकांत उपदेश करितात.

---

पंचुम्बरसहियाइं सत्तइ वसणाइ जो विवज्जेइ ॥
सम्मत्तविसुद्धमई सो दंसणसावयो भणियो ॥ २ ॥

**अर्थः**—पांच प्रकारचीं उदुंबराचीं फळें व सात व्यसनें हीं सोडून देऊन, ज्याची बुद्धि सम्यक्त्वानें शुद्ध झाली आहे तो दर्शनप्रतिमाधारी श्रावक होय असें सांगितलें आहे.

अनारम्भवधं मुञ्चेत् ।
चरेन्नारम्भमुध्दुरम् ॥
स्वाचारप्रतिलोम्येन ।
लोकाचारं प्रमाणयेत् ॥ २५ ॥

**टीका**—मुञ्चेत् त्यजेत् । दर्शनिकः । कं अनारम्भवधं तपःसंयमादिसाधनतनुस्थित्यर्थायाः कृष्णादिक्रियाया अन्यत्र प्राणिहिंसां । एतेन यदुक्तं स्वामिसमन्तभद्रदेवैर्दर्शनिकस्तत्वपथगृह्य इति दर्शनप्रतिमालक्षणं तदपि संगृहीतं । तथाविधहिंसाविरतिविध्युपदेशेन पञ्चाणुव्रतानुसरणविधानोपदेशात् । तथा न चरेत् न कुर्यात् । कमारम्भं कृष्यादिकं किंविशिष्टं उध्दुरं आत्मनिर्वाह्यभरं । परेण हि कृष्यादिक्रियां कारयतो द्वन्द्वलाघवान्न तादृशी प्रतिज्ञातधर्मकर्मानुष्ठाने गृहिणो विहस्तता भवति यादृशी तामात्मना कुर्वतः सा स्यात् द्वन्द्वावर्तविवर्तनात् । तथा प्रमाणयेत् प्रमाणं कुर्यात् न विसंवादयेदित्यर्थः । कं लोकाचारं स्वामिसेवाक्रयाविक्रयादिकं । केन स्वाचाराप्रातिलोम्येन आत्मप्रातिपन्नव्रतानुष्ठानानुपघातेन ॥

**अर्थः**—तपश्चरण व संयम इत्यादिकांचें साधन जो आपला देह त्याच्या रक्षणाकरितां अवश्य तितक्या कृषि वगैरे क्रियेशिवाय अन्यत्र प्राणिहिंसा करूं नये. स्वदेहरक्षणास पुरेल इतक्यापेक्षां अधिक आरंभ ( कृषि वगैरे उद्योग ) स्वतां आचरूं नयेत. कारण, तेंणेंकरून परिग्रह अधिक वाढून आपल्या व्रतानुष्ठानास अडचण पडते. फार तर दुसऱ्याकडून करवावेत. आपण स्वीकारलेल्या व्रताचा भंग न होईल अशा रीतीनें लोकाचार ( मालकाची सेवा, क्रय, विक्रय वगैरे ) पाळावा.

धर्मे पत्न्याः सुतरां व्युत्पादनविधिमुपदिशति—

व्युत्पादयेत्तरां धर्मे ।
पत्नीं प्रेम परं नयन् ॥
सा हि मुग्धा विरुद्धा वा ।
धर्माद् भ्रंशयते तराम् ॥ २६ ॥

**टीका**—व्युत्पादयेत् तरां । अर्थादिव्युत्पाद्यात् धर्मेऽतिशयेन व्युत्पन्नां कुर्यात् । अथवा धर्मविषये सर्वमपि परिवारं च पत्नीं च व्युत्पादयन् पत्नीं ततोऽतिशयेन तत्र व्युत्पादयेदिति व्याख्येयं । कोऽसौ दर्शनिकः । कां पत्नीं भार्यां । क धर्मे । किं कुर्वन्नयन् प्रापयन् । कां पत्नीं । किं तत् प्रेम स्वस्मिन् धर्मे च स्नेहं । किंविशिष्टं परमुत्कृष्टं । हि यस्मात् भ्रंशयते तरां परिवारा(दा)दतिशयेन प्रच्यावयति । काऽसौ सा पत्नी । कं पुरुषं । कस्मात् धर्मात् । किंविशिष्टा सती मुग्धा धर्मे मूढा धर्ममजानन्तीत्यर्थः । तथा विरुद्धा पुंसि धर्मे वा द्वेषिणीत्यर्थः । इदमत्र तात्पर्यं धर्ममजानानो विरक्तश्च परिजनो नरं धर्मात्प्रच्यावयति । ततोऽप्यतिशयेन तादृग्विधा गृहिणी । तदधीनत्वाद्गृहिणो धर्मकार्याणाम् ॥

**अर्थः**—आपल्या स्त्रीशीं स्नेहानें वागून तिला धर्ममार्गानें चालण्यास निपुण करावें. कारण, ती जर धर्माची अजाणती असेल व आपलें प्रेम नसल्यामुळें विरुद्ध होईल; तर आपणास धर्मापासून भ्रष्ट व्हावें लागेल.

प्रेम परं नयन्नित्यस्य समर्थनार्थमाह—

**आतां, स्त्रियांच्या विरोधाचें कारण सांगतात.**

स्त्रीणां पत्युरुपेक्षैव ।

परं वैरस्यका-रणम् ॥
तन्नोपेक्षेत जातु स्त्रीं ।
वाञ्छन् लोकद्वये हितम् ॥ २७ ॥

टीका--भवति । किं तत् वैरस्यकारणं वैरस्यस्य विरागताया हेतुः । अथवा वैरस्य विरोधस्य कारणं । किंविशिष्टं परमुत्कृष्टं । कासां स्त्रीणां । किं तत् उपेक्षैव अनादरो न तु वैरूप्यनिर्धनत्वादि । कस्य पत्युर्भर्तुः । यत एवं तत्तस्मात् । नोपेक्षेत नोपेक्षणीयत्वेन पश्येत् । कोऽसौ पुमान् । कां स्त्रीं स्त्रियं । कदा जातु कदाचिदपि धर्माद्यनुष्ठानकाले । किं कुर्वन् वाँच्छन् अभिलषन् । किं तत् हितं सुखं सुखकारणं च । क्व लोकद्वयेऽपि इहलोके परलोके च ॥

अर्थः--पतीनें स्त्रियांचा अनादर करणें हेंच त्यांच्या अप्रीतीचें किंवा विरोधाचें कारण होय, पति कुरूप किंवा निर्धन असणें हें कांहीं कारण नव्हे. ह्मणून, इहलोकीं व परलोकीं हित इच्छिणारानें केव्हांही स्त्रीची उपेक्षा करूं नये. तिच्याशीं स्नेहानें वागावें.

कुलस्त्रियाऽपि धर्मादिकमिच्छन्त्या भर्तृच्छन्दानुवृत्तिरेव कर्तव्येति प्रासङ्गिकीं स्त्रियाः शिक्षां प्रयच्छान्नाह—

आतां, स्त्रीनें पतीशीं कसें वागावें हें सांगतात.

नित्यं भर्तृमनीभूय ।
वर्तितव्यं कुलस्त्रिया ॥
धर्मश्रीशर्मकीर्त्येक- ।
केतनं हि पतिव्रताः ॥ २८ ॥

टीका--वर्तितव्यं मनोवाक्कायकर्मभिराचरितव्यं । कया कुल-

स्त्रिया कुलीननार्या । किं कृत्वा भर्तृमनीभूय अभर्तृमना भर्तृमना भूत्वा पतिचित्तानुवर्तनेनैव चिन्त्यं वाच्यं चेष्टितव्यं च । कथं नित्यं सर्वदा । हि यस्मात् । भवन्ति । काः पतिव्रताः पतिसेवैव व्रतं प्रतिज्ञा शुभकर्मप्रवृत्तिर्वा यासां ता इत्यर्थः । किं भवति धर्मे-त्यादि—धर्मस्य पुण्यस्य श्रियो विभूतेर्भारत्याश्च शर्मण आनन्दस्य कीर्तेर्यशसः एकमुत्कृष्टमव्यभिचारि केतनं गृहं ध्वजो वा यास्ताः धर्मश्रीशर्मकीर्त्येककेतनं । नित्यं धर्मादिमत्यो धर्मादिविख्याता वा इत्यर्थः ॥

**अर्थः—कुलस्त्रीनें सर्वदां पतीच्या मनास अनुसरून वागावें, त्याच्या आज्ञेंत असावें. अशी वागणारी जी स्त्री तीच पतिव्रता होय. आणि धर्म, लक्ष्मी, सुख व कीर्ति इत्यादिकांचें माहेर कोणतें ह्मणाल तर पतिव्रता स्त्रियाच होत.**

धर्माद्यार्थिनः कुलस्त्रियामप्यत्यासक्तिं निषेधयन्नाह—

**आतां, पुरुषानें परिमित कामसेवन करावें हें सांगतात.**

भजेद्देहमनस्ताप- ।
शमान्तं स्त्रियमन्नवत् ॥
क्षीयन्ते खलु धर्मार्थ- ।
कायास्तदतिसेवया ॥ २९ ॥

**टीका**—भजेत् सेवेत । कोऽसौ त्रैवर्णिकः विशेषणाद्दर्शनिकः श्रावकः । कां स्त्रियं । कथं यथा भवति देहमनस्तापशमान्तं शरी-रमनसोः सन्तापोपशमो यथा भवति न पुनरत्यासक्त्या । किंवत् अन्नवत् भोजनं यथा । खलु यस्मात् । क्षीयन्ते क्षयं यान्ति । के धर्मार्थकायाः धर्मो धनं शरीरं च त्रीण्यपि । कया तदतिसेवया अन्नस्येव स्त्रिया अप्यतिमात्रोपयोगेन ॥

अर्थः—स्वतांची धर्मपत्नी झाली तरी तिच्या ठायीं अधिक आसक्ति न ठेवितां, देहाचा व मनाचा ताप शांत व्हावा इतक्याच प्रमाणानें अन्नाप्रमाणें तिचें सेवन करावें. अधिक सेवन केल्यास धर्म, अर्थ व देह यांचा नाश होतो.

पुत्रस्योत्पादनादिप्रयत्नविधिमाह—

आतां, सत्पुत्राची आवश्यकता दाखवितात.

---

पुत्रोत्पादनाविधिस्त्वयमष्टाङ्गहृदयोक्तः —

पूर्णषोडशवर्षा स्त्री पूर्णविंशेन सङ्गता ॥
शुद्धे गर्भाशये मार्गे रक्ते शुक्रेऽनिले हृदि ॥ १ ॥
वीर्यवन्तं सुतं सूते ततो न्यूनाब्दयोः पुनः ॥
रोग्यल्पायुरधन्यो वा गर्भो भवति नैव वा ॥ २ ॥
शुक्रं शुक्लं गुरु स्निग्धं मधुरं बहुलं बहु ॥
घृतमाक्षिकतैलाभं सद्गर्भायार्त्तवं पुनः ॥ ३ ॥
लाक्षारसशशास्राभं धौतं यच्च विरज्यते ॥
शुद्धशुक्रार्त्तवं स्वस्थं संरक्तं मिथुनं मिथः ॥ ४ ॥
स्नेहैः पुंसवनैः स्निग्धं शुद्धं शीलितवास्तिकम् ॥
नरं विशेषात्क्षीराद्यैर्मधुरौषधसंस्कृतैः ॥ ५ ॥
नारीं तैलेन माषैश्च पित्तलैः समुपाचरेत् ॥
क्षामप्रसन्नवदनां स्फुरच्छ्रोणिपयोधराम् ॥ ६ ॥
स्रस्ताक्षिकुक्षिं पुंस्कामां विद्यादृतुमतीं स्त्रियम् ॥
पद्मं सङ्कोचमायाति दिनेऽतीते यथा तथा ॥ ७ ॥
ऋतावतीते योनिः स्याच्छुक्रं नातः प्रतीच्छति ॥
मासेनोपचितं रक्तं दमनिभ्यामृतौ पुनः ॥ ८ ॥
ईषत्कृष्णं विगन्धं च वायुर्योनिमुखान्नुदेत् ॥

प्रयतेत सधर्मिण्या- ।
मुत्पादयितुमात्मजम् ॥
व्युत्पादयितुमाचारे ।
स्ववत् त्रातुमथापथात् ॥ ३० ॥

---

ततः पक्षेक्षणादेव कल्याणध्यायिनी त्र्यहम् ॥ ९ ॥
स्रजालङ्काररहिता दर्भसंस्तरशायिनी ॥
क्षैरेयं यावकं स्तोकं कोष्ठशोधनकर्शनम् ॥ १० ॥
पर्णे शरावे हस्ते वा भुञ्जीत ब्रह्मचारिणी ॥
चतुर्थेऽह्नि ततः स्नाता शुक्लमाल्याम्बरा शुचिः ॥ ११ ॥
इच्छन्ती भर्तृसदृशं पुत्रं पश्येत्पुरः पतिम् ॥
ऋतुस्तु द्वादशनिशाः पूर्वास्तिस्रोऽथ निन्दिताः ॥ १२ ॥
एकादशी च युग्मासु स्यात्पुत्रोऽन्यासु कन्यका ॥ १३ ॥

पुत्र उत्पन्न करण्याचा प्रकार वाग्भटांनीं आपल्या अष्टांगहृदय नामक ग्रंथांत सांगितला आहे; तो असा—

जिला सोळा वर्षें पूर्ण झालीं आहेत अशी स्त्री जर गर्भाशय, गर्भाचा मार्ग, रक्त, शुक्र, कोठ्यांतील वायु आणि मन हीं शुद्ध असतांना– ज्याला वीस वर्षें पूर्ण झालीं आहेत अशा पुरुषाशीं समागम करील ॥ १ ॥ तर ती वीर्यवान् अशा पुत्राला प्रसवते. आणि वर जें स्त्रीपुरुषांचें वयोमान सांगितलें आहे, त्यापेक्षां जर त्यांचें वयोमान कमी असेल, तर त्यांच्या समागमानें जो गर्भ उत्पन्न होतो, तो रोगी, अल्पायु आणि पापी अर्थात् असमर्थ असा होतो. किंवा अशांच्या समागमानें गर्भच उत्पन्न होत नाहीं. ॥ २ ॥ पुरुषाचें शुक्र जर शुभ्रवर्ण, जड, स्निग्ध ( बुळबुळीत ),

**टीका—** प्रयतेत परमादरं कुर्यात् । कोऽसौ दर्शनिकः । किं कर्तुमुत्पादयितुं जनयितुं । कमात्मजमौरसं पुत्रं । क्षेत्रजाद्येकादशपुत्राणामनभ्युपगमात् । कस्यां सधर्मिण्यां समानो धर्मो अस्यामस्तीति नित्ययोगे इन् कुलस्त्रियामित्यर्थः । अत्रात्मनो जात आत्मज इत्यन्वर्थतासिध्द्यर्थं कुलस्त्रीरक्षायां नित्यं यतितव्यमिति प्रतिपत्तव्यं । तथा प्रयतेत । कोऽसौ सः । किं कर्तुं व्युत्पादयितुं विविधमुत्कृष्टं ज्ञानं प्रापयितुं । कमात्मजं । क्व आचारे कुललोकसंव्यवहारे । किंवत् स्ववत् आत्मना तुल्यं । तथा प्रयतेतासौ । किं कर्तुं त्रातुं रक्षितुं निवर्तयितुमित्यर्थः । कमात्मजं । कस्मादपथात् धर्मादिभ्रंशनोपायात् दुराचारादित्यर्थः । स्ववदित्यत्रापि योज्यं । अथशब्दः समुच्चये ॥

---

मधुर आणि विपुल असें असून तुपासारखें असेल, तरच तें उत्तम गर्भ उत्पन्न करण्यास कारणीभूत होतें. आणि आर्तव ( स्त्रीचें रक्त ) ॥ ३ ॥ निवळलेल्या लाखेसारखें किंवा सशाच्या रक्तासारखें असून तें वस्त्राला लागलें असतां धुतल्यानें वस्त्राला ज्याचा डाग रहात नाहीं असें असेल तर, तें उत्तम गर्भ उत्पन्न करणारें होतें. अशा प्रकारें ज्याचें शुक्रशोणित शुद्ध आहे असें जें दंपत्य असेल तें नीरोग असून परस्परांवर प्रेम करणारें असलें पाहिजे. ॥ ४ ॥ त्या दंपत्यानें, पुरुषगर्भ उत्पन्न करणारे म्हणून वैद्यशास्त्रांत जे स्निग्ध पदार्थ ( औषधांचा संस्कार केलेले तूप वगैरे पदार्थ ) सांगितले आहेत, ते भक्षण करून कोठा नेहमीं स्निग्ध ठेवावा. व वरचेवर बस्तिप्रयोग ( इनिमा ) करून कोठा शुद्ध ठेवावा. त्यांत पुरुषाला मधुर औषधांचा संस्कार केलेले दूध, तूप हे पदार्थ द्यावेत. ॥५॥ आणि स्त्रीला तेल, उडीद वगैरे पित्तकर पदार्थ भक्षणास द्यावेत. ज्यावेळीं स्त्रीचें मुख सुकलेलें पण स्वच्छ दिसत असेल,

**अर्थः—आपल्या स्त्रीच्या ठिकाणीं पुत्र उत्पन्न व्हावा ह्मणून यत्न करावा, आणि आपणाप्रमाणेंच त्यानेंही धर्माचरणांत निपुण व्हावें, व दुराचारी न व्हावें, ह्मणूनही यत्न करावा. ह्मणजे त्याला तसें शिक्षण द्यावें. कारण,**

---

आणि तिच्या कमरेचा मागचा भाग व स्तन स्फुरण पावत असतील ॥६॥ व तिचे नेत्र व उदर गळल्यासारखें होऊन तिला पुरुषसमागमाची इच्छा होत असेल त्या वेळीं तिला ऋतुमती असें समजावें. ज्याप्रमाणें सूर्य अस्ताला जाऊं लागला ह्मणजे कमल संकुचित होऊं लागतें ॥७॥ त्याप्रमाणें स्त्रीचा ऋतुकाल संपूं लागला ह्मणजे तिचें जननेंद्रिय संकुचित होऊं लागतें. आणि मग तें शुक्रग्रहण करीनासें होतें. एक महिन्यांत स्त्रीच्या गर्भाशयांत जें रक्त संचित होतें, तें रक्त कोठ्यांतील वायु–दोन धमनींच्या द्वारानें—तिच्या जननेंद्रियाच्या मार्गानें ऋतुकालीं पुनः बाहेर फेंकून देतो. तें रक्त थोडेसें काळसर असून दुर्गंधरहित असतें. ह्याप्रमाणें जी स्त्री ऋतुमती झाली असेल तिनें तीन दिवस कोणतेहि वाईट विचार मनांत आणूं नयेत. ॥८॥९॥ तिनें तीन दिवस स्नान करूं नये, व अलंकारहि धारण करूं नयेत. तिनें दर्भाच्या शय्येवर शयन करावें. तिनें कोठा शुद्ध करणारें व त्यांतील मल काढून टाकणारें असें दुधांत शिजविलेलें सातूंचें पीठ पानावर अथवा मातीच्या भांड्यांत किंवा हातावर घेऊन फारच थोडें भक्षण करावें. तिनें त्या तीन दिवसांत पुरुषसमागम करूं नये. मग चवथ्या दिवशीं स्नान करून शुद्ध होऊन शुभ्रवस्त्र परिधान करावें. व शुभ्रपुष्पांच्या माला धारण कराव्यात. मग आपल्या पतीसारखा पुत्र आपल्याला व्हावा अशा इच्छेनें पतीचें मुखावलोकन करावें. स्त्रीचा

सत्पुत्ररहितेन श्रावकेणोत्तरपदं प्रति प्रोत्साहो दुष्करः स्यादिति दृष्टान्तेनोपष्टम्भयन्नाचष्टे—

**विना सुपुत्रं कुत्र स्वं।**
**न्यस्य भारं निराकुलः॥**
**गृही सुशिष्यं गणिवत्।**
**प्रोत्सहेत परे पदे॥ ३१॥**

**टीका**— कुत्र कस्मिन् पुंसि। स्वमात्मीयं। भारं पोष्यादिनिर्वाहभरं। न्यस्य स्थापयित्वा। निराकुलो निर्द्वन्द्वः सन्। प्रोत्सहेत प्रकृष्टमुद्योगं कुर्यात् न क्कापीत्यर्थः। कोऽसौ गृही प्रकृतत्वाद्दर्शनिकः। क्क पदे संयमस्थाने। किंविशिष्टे परे व्रतिकप्रतिमायां वानप्रस्थाद्याश्रमे वा। कथं विना अन्तरेण। कं सुपुत्रं आत्मसमानमात्मजं। किंवत् गणिवत् धर्माचार्यो यथा। कं सुशिष्यमात्मसमानमेवाचार्याद्विना। कुत्र श्रमणे। स्वं भारं सङ्घनिर्वाहलक्षणं। न्यस्य। निराकुलो निर्व्यापेक्षः सन्। परे आत्मसंस्कारादौ मोक्षपदे वा। प्रोत्सहेत न क्कापीत्यर्थः। इदमत्रैदम्पर्यं- दर्शनिकेन धर्माचार्येण च परं पदमाश्रयितुमिच्छता सत्पुत्रः सच्छिष्यश्चात्मवन्निष्पादनीयः॥

**अर्थः—धर्माचार्य जसा संघपोषण करण्याचा आपला भार उत्तम शिष्यावर टाकून, मोकळ्या मनाचा होऊन उत्कृष्ट पद प्राप्त करून घेण्यास उद्योग करतो; त्याप्रमाणें हा दर्शनिक**

---

हा ऋतुकाल बारा रात्रीपर्यंत असतो. त्यांत पहिल्या तीन व अकरावी ह्या रात्री निंद्य आहेत. आणि राहिलेल्या रात्रीपैकीं समरात्रीं समागम केला असतां पुत्र होतो. व विषमरात्रीं समागम केला असतां कन्या होते.

गृहस्थ व्रतिकप्रतिमा किंवा वानप्रस्थ वगैरे आश्रम प्राप्त करून घेण्यास-सुपुत्र असल्याशिवाय कोणावर बरें भार टाकून मोकळ्या मनाचा होऊन-उद्योग करील? ह्मणून सुपुत्र असला पाहिजे.

प्रकृतमर्थमुपसंहरन् व्रतिकप्रतिमारोहणयोग्यतां सूत्रयन्नाह—

आतां, चालू विषयाचा उपसंहार करून; व्रतिकप्रतिमेस चढण्याची योग्यता सांगतात.

दर्शनप्रातिमामित्थ- ।
मारुह्य विषयेष्वरम् ॥
विरज्यन् सत्त्वसज्जः सन् ।
व्रती भवितुमर्हति ॥ ३२ ॥

टीका— अर्हति योग्यो भवति । कोऽसौ श्रावकः । किं कर्तुं भवितुं सम्पत्तुं । किंविशिष्टो व्रती व्रतिकप्रतिमावान् । किंविशिष्टः सन् सत्त्वसज्जः धैर्यादिसात्विकभावनिष्ठः । किं कुर्वन् विरज्यन् स्वयमेव विरक्तिं गच्छन् । केषु विषयेषु कामिन्यादिषु । कथमरं पाक्षिकापेक्षया स्वस्य च प्राक्तनावस्थापेक्षयाऽतिशयेन । किं कृत्वा आरुह्य पर्यन्तं प्राप्य । कां दर्शनप्रतिमां । कथं इत्थमनेन पाक्षिकाचारसंस्कारेत्यादिपूर्वोक्तप्रकारेणेति भद्रम् ॥

अर्थः—पाक्षिकावस्थेच्या अपेक्षेनें किंवा आपल्या पूर्वींच्या अवस्थेच्या अपेक्षेनें दर्शनप्रतिमेस पूर्णपणें चढून-विषयांच्या ठिकाणीं अत्यंत विरक्त झालेला व धैर्य वगैरे सात्विक भावानें युक्त असा झालेला जो श्रावक तो व्रती होण्यास ह्मणजे व्रतें स्वीकारण्यास योग्य होतो. इति भद्रम् ॥

इत्याशाधरविरचितायां स्वोपज्ञधर्मामृतसागारधर्मदीपिकायां

भव्यकुमुदचन्द्रिकासञ्ज्ञायामादितो द्वादशः प्रक्रमाच्च
तृतीयोऽध्यायः समाप्तः ॥

अध्याय तिसरा समाप्त.

---

## ॥ अथ चतुर्थोऽध्यायः ॥

अथ व्रतिकप्रतिमामध्यायत्रयेण प्रपञ्चयिष्यन् प्रथमं तावत्तल्लक्षणं संगृह्णन्नाह—

**सम्पूर्णदृग्मूलगुणो ।**
**निःशल्यः साम्यकाम्यया ॥**
**धारयन्नुत्तरगुणा- ।**
**नक्षूणान् व्रतिको भवेत् ॥ १ ॥**

**टीका**—भवेत्। कोऽसौ व्रतिकः। किं कुर्वन् धारयन् अकृच्छ्रेण दधन्। कान् उत्तरगुणान् वक्ष्यमाणान्। किंविशिष्टान् अक्षूणान् निरतिचारान्। कया साम्यकाम्यया इष्टानिष्टयो रागद्वेषोपरमवाञ्च्छया न पुनर्लाभादीच्छया। किंविशिष्टः सन् सम्पूर्णदृग्मूलगुणः सम्पूर्णा उपयोगमात्राश्रयेणान्तरङ्गेण चेष्टामात्राश्रयेण च बहिरङ्गेणातिचारेण रहितत्वादखण्डा दृक् सम्यक्त्वं मूलगुणाश्च यस्य स तथोक्तः। पुनः किंविशिष्टः निःशल्यः शृणाति हिनस्तीति शल्यं शरीरानुप्रवेशिकाण्डादि, शल्यमिव शल्यं कर्मोदयविकारः शारीरमानसबाधाहेतुत्वात्। तत् त्रिविधं मिथ्यात्वमायानिदानभेदात्। मिथ्यात्वं विपरीताभिनिवेशः। माया वञ्चना। निदानं तपःसंयमाद्यनुभावेन कांक्षाविशेषः। शल्यान्निष्क्रान्तो निःशल्यः ॥ ननु च सम्पूर्णदृग्मूलगुण इत्यनेनैव शल्यपरिहारस्य सिद्धत्वात् व्यर्थमि-

दमिति चेत्सत्यं। किन्त्वचिरप्रतिपन्नव्रतस्य पूर्वविभ्रमसंस्कारारोप्यमाणतत्परिणामानुसरणनिवारणार्थं भूयो यत्नः क्रियते। उपदेशे च पौनरुक्त्यं न दोषः ॥

**अर्थः—ज्याचें सम्यक्त्व पूर्ण ह्मणजे अखंड अर्थात् निर्दोष आहे आणि मद्यविरति वगैरे मूल गुण अखंड आहेत; व मिथ्यात्व, माया (वंचना, कपट) आणि निदान[1] (करीत असलेल्या तपश्चरणादिकाचें अमुक एक**

---

१ तपःसंयमाद्यनुभावेन कांक्षाविशेषो निदानम्। तत् द्वेधा प्रशस्तेतरभेदात्। प्रशस्तं पुनर्द्विविधम्। विमुक्तिसंसारनिमित्तभेदात् तत्र विमुक्तिनिमित्तं कर्मक्षयाद्याकाङ्क्षा ॥ उक्तं च—

तपश्चरण, संयम इत्यादिकाच्या प्रभावाच्या योगानें कोणत्या तरी इष्टफलाची इच्छा करणें याचें नांव निदान. तें दोन प्रकारचें आहे; एक प्रशस्त दुसरें अप्रशस्त. त्यांतही प्रशस्त दोन प्रकारचें आहे; एक मुक्तीला कारण, दुसरें संसाराला कारण. कर्मक्षयाची आकांक्षा करणें हें विमुक्तिनिमित्त (मुक्तीला कारण) प्रशस्त नांवाचें निदान होय. याविषयीं उक्तश्लोक आहे तो असा—

कर्मव्यपायं भवदुःखहानिं। बोधिं समाधिं जिनबोधसिद्धिम् ॥
आकांक्षितं क्षीणकषायवृत्तेर्विमुक्तिहेतुः कथितं निदानम् ॥१॥

अर्थ—ज्याचे कषाय ह्मणजे क्रोध, मान, माया लोभ हे क्षीण झाले आहेत अशा पुरुषानें; कर्मांचा नाश, संसारदुःखाची हानि, बोध, समाधि आणि केवलज्ञानाची सिद्धि व्हावी अशी इच्छा धरणें याला विमुक्तिनिमित्त नांवाचें निदान ह्मणतात.

जिनधर्मसिद्ध्यर्थं तु जात्याद्याकाङ्क्षणं संसारनिमित्तम् ॥

फल प्राप्त व्हावें अशी इच्छा ) हीं तीन शल्यें ज्याला नाहींत अथवा ज्यानें नाहीशीं केलीं आहेत; आणि राग

---

जिनधर्मसिद्धीकारितां उत्तमजाति वगैरेची इच्छा करणें याला संसारनिमित्तनिदान ह्मणतात.

जातिं कुलं बन्धविवर्जितत्वं दरिद्रतां वा जिनधर्मसिध्द्यै ॥
प्रयाचमानस्य विशुध्दवृत्तेः संसारहेतुर्गदितं निदानम् ॥२॥

अर्थः—उत्तमजाती, उत्तमकुल, बंधापासून मुक्ति व जिनधर्मसिद्धीकरितां दारिद्य ह्यांची विशुद्धवृत्तीच्या मनुष्याला जी इच्छा होते ती संसारनिमित्तनिदान असें समजावें. तसेंच अप्रशस्त निदानही " भोगार्थनिदान आणि मानार्थनिदान " असें दोन प्रकारचें आहे. घातकत्वनिदानाचा मानार्थनिदानामध्यें अंतर्भाव होत असल्यामुळें तें निराळें मानण्याचें कारण नाहीं. आतां या वर सांगितलेल्या निदानापैकी ' विमुक्तिनिदान ' हें पहिल्या प्रतिमेमध्यें असलेल्या जीवास उपकारक आहे, परंतु पुढील तीन निदानें ( संसारहेतुनिदान, भोगार्थनिदान आणि मानार्थनिदान हीं साक्षात् व परंपरेनें जन्ममरण दुःखाला कारणीभूत असल्यानें केव्हांही बरीं नव्हेत. कारण—

मोक्षेऽपि मोहादभिलाषदोषो विशेषतो मोक्षनिषेधकारी ॥
यतस्ततोऽध्यात्मरतो मुमुक्षुर्भवेत्किमन्यत्र कृताभिलाषः ॥ ३ ॥

अर्थः—मोहामुळें मोक्षाविषयींही जरी एखाद्यास अभिलाष उत्पन्न झाला तर निश्चयानें तो अभिलाषी जीव मोक्षापासून भ्रष्ट होतो, ह्मणून मुमुक्षु जीवानें निरंतर अध्यात्मरत असावें. दुसऱ्या कशाचाही अभिलाष करणें बरें नाहीं; असें सांगितलें आहे. याप्रमाणें वर सांगितलेल्या शल्यत्रयापासून जो निघून गेला

व द्वेष हे विकार नाहींसे व्हावेत अशा बुद्धीनें अतिचाररहित असे उत्तरगुण ( अहिंसा वगैरे व्रतें ) जो धारण करीत आहे तो व्रतिक होय.

शल्यत्रयोद्धरणे हेतुमाह—

आतां; तीन शल्यें काढून टाकण्याचा हेतु सांगतात.

सागारो वाऽनगारो वा ।
यन्निःशल्यो व्रतीष्यते ॥
तच्छल्यवत्कुदृङ्मायानिदानान्युद्धरेद्धदः ॥ २ ॥

टीका—यद्यस्मात्कारणात् । इष्यते । कोऽसौ व्रती । किंविशिष्टो निःशल्यः । किंविशिष्टः सन् सागारो वा अनगारो वा । अत्रेयं भावना— शल्यापगमे सत्येव व्रतसम्बन्धाद्व्रती मन्यते । न हिंसाद्युपरतिमात्रव्रतसम्बन्धात् । यथा बहुक्षीरघृतो गोमानिति व्यपदिश्यते । बहुक्षीरघृताभावात् सतीष्वपि गोषु न गोमान् । तथा सशल्यत्वात् सत्स्वपि व्रतेषु न व्रती । यस्तु निःशल्यः स व्रतीति । तत्तस्मात् । उद्धरेत् निष्कासयेत् । कोऽसौ व्रतार्थी । कानि

---

( शल्यत्रयानें रहित झाला ) तो निःशल्य समजावा.

उक्तंच चारित्रसारे—

वधादसत्याच्चौर्याच्च कामाद्ग्रन्थान्निवर्त्तनम् ॥
पञ्चधाऽणुव्रतं रात्र्यभुक्तिः षष्ठमणुव्रतम् ॥ ४ ॥

अर्थः—हिंसा, लबाडी, चोरी, मैथुन आणि परिग्रह ह्यांचा त्याग करणें हीं पांच अणुव्रतें आहेत, आणि रात्रीं न जेवणें हें सहावें अणुव्रत आहे.

कुदृङ्मायानिदानानि । कस्मात् हृदो हृदयात् । किंवत् शल्यवत् शल्यानि यथा ॥

अर्थः—गृहस्थ असो कीं यति असो, जो शल्यरहित असेल तोच व्रती समजावा. येथें असें समजावयाचें कीं, शल्य नाहींसें झाल्यावरच व्रतांच्या संबंधानें मनुष्य व्रती ह्मटला जातो. अंतःकरणांत शल्य असून अहिंसा वगैरे व्रतें पाळण्यानेंच त्याला व्रती ह्मणतां येणार नाहीं. जसें— ज्याच्या येथें दूध आणि तूप यांची समृद्धि आहे त्याला गोमान् ( गायीवाला ) ह्मणतात. आणि पुष्कळ गायी असूनहि जर दूधतूप नाहीं, तर त्याला गोमान् ह्मणत नाहींत. त्याप्रमाणें जो शल्यराहित आहे तो हिंसादि पातकें करीत नसला तरी त्याला व्रती ह्मणतां येणार नाहीं. तर जो निःशल्य आहे तोच व्रती होय. ह्मणून अंगांत बोंचणारा कांटा जसा आपण काढून टाकितों त्याप्रमाणें व्रतार्थी मनुष्यानें मिथ्यात्व माया आणि निदान हीं तीन्ही शल्यें हृदयांतून काढून टाकावीं.

शल्यसहचारीणि व्रतानि धिक्कुर्वन्नाह—

आतां, शल्यसहित व्रतांस धिक्कारतात.

आभान्त्यसत्यदृङ्माया- ।
निदानैः साहचर्यतः ॥
यान्यव्रतानि व्रतवत् ।
दुःखोदर्काणि तानि धिक् ॥ ३ ॥

टीका—धिक् निन्द्यानि । कानि तानि अव्रतानि व्रताभासानि । किंविशिष्टानि दुःखोदर्काणि यतः दुःखमुदर्कं उत्तरफलं येषां तानि । यानि किं यानि आभान्ति आभासन्ते । कानि अव्रतानि ।

किंवत् व्रतवत् व्रतानि यथा । कस्मात् साहचर्यतः सहचारित्वात् । कैः असत्यदृशा मिथ्यात्वेन मायया निदानेन च ॥

**अर्थः—असत्यदृक् ह्मणजे विपरीतश्रद्धान अर्थात् मिथ्यात्व, माया आणि निदान यांसह असलेलीं जीं अव्रतें व्रताप्रमाणें भासतात तीं परलोकीं दुःख देणारीं आहेत. त्याचा धिक्कार असो!**

उत्तरगुणनिर्णयार्थमाह—

**आतां, उत्तरगुण सांगतात.**

पञ्चधाऽणुव्रतं त्रेधा ।
गुणव्रतमगारिणाम् ॥
शिक्षाव्रतं चतुर्धेति ।
गुणाः स्युर्द्वादशोत्तरे ॥ ४ ॥

**टीका**—स्युः भवेयुः । के गुणाः संयमविकल्पाः । केषामगारिणां गृहिणां । किंविशिष्टाः उत्तरे मूलगुणानन्तरसेव्यत्वादुत्कृष्टत्वाच्च । कति द्वादश । कथमित्यनेन प्रकारेण । भवति । किं तत् अणुव्रतं अणुव्रतापेक्षया लघुव्रतमहिंसादि । कतिधा पञ्चधा अस्य पञ्चधात्वं बहुमतत्वादिष्यते । क्वचित्तु रात्र्यभोजनमप्यणुव्रतमुच्यते । तथा भवति । किं तद्गुणव्रतं । कतिधा त्रेधा । गुणार्थमणुव्रतानामुपकारार्थं व्रतं गुणव्रतं दिग्विरत्यादीनामणुव्रतानुबृंहणार्थत्वात् । तथा भवति । किं तत् शिक्षाव्रतं । कतिधा चतुर्धा शिक्षायै अभ्यासाय व्रतं देशावकाशिकादीनां प्रतिदिवसाभ्यसनीयत्वात् । अत एव गुणव्रतादस्य भेदः । गुणव्रतं हि प्रायो यावज्जीविकमाहुः । अथवा शिक्षाविद्योपादानं शिक्षाप्रधानं व्रतं शिक्षाव्रतं । देशावकाशिकादेर्विशिष्टश्रुतज्ञानभावनापरिणतत्वेनैव निर्वाह्यत्वात् ॥

अर्थः—पांच अणुव्रतें तीन गुणव्रतें आणि चार शिक्षाव्रतें मिळून हीं बारा व्रतें गृहस्थांचे उत्तरगुण होत. मद्यविरति वगैरे आठ गुण प्रथम धारण करूनच हीं व्रतें धारण करावयाचीं असतात; ह्मणून यांनां " उत्तरगुण " ह्मणतात. महाव्रतांच्या अपेक्षेनें लघु असणारीं तीं अणुव्रतें होत. हीं पांचच आहेत असें बहुमत आहे. क्वचित् रात्रिभोजनत्याग हें सहावें अणुव्रत मानिलें आहे. अणुव्रताला वाढविणारीं तीं गुणव्रतें होत. शिक्षेकरितां ह्मणजे दुर्व्यापारापासून निवृत्ति होण्याच्या संवयीकरितां जें व्रत ह्मणजे नियम असा एक अर्थ होतो. कारण इंद्रियांना दुर्व्यापारापासून परतविण्याचा अभ्यास देशावकाशिक वगैरे नियमांच्या योगानें केला पाहिजे. शिक्षाव्रत या शब्दाचा वर लिहिल्याप्रमाणें अर्थ केला आहे ह्मणून हें व्रत अणुव्रताहून भिन्न आहे असें सिद्ध होतें. कारण, अणुव्रतें बहुतकरून यावज्जीव पाळावीं असें आहे. दुसरा प्रकार— शिक्षा ह्मणजे विद्याग्रहण हेंच मुख्य ज्यामध्यें आहे असें व्रत असाही शिक्षाव्रत या शब्दाचा अर्थ होतो. कारण, देशावकाशिकादि नियमही विद्योपार्जनानें श्रुतज्ञानभावनारूप जो एक विलक्षण परिणाम होतो त्यानेंच निर्वाह्य आहेत ह्मणजे देशावकाशिकादि नियमांना तरी श्रुतज्ञानभावनारूप विद्योपार्जनानें उत्पन्न होणाऱ्या विलक्षण परिणामामुळेंच व्रतत्व आलें आहे.

सामान्येन पञ्चाणुव्रतानि लक्षयन्नाह—

आतां, अणुव्रतांचें लक्षण व भेद सांगतात.

विरतिः स्थूलवधादे- ।
मनोवचोऽङ्गकृतकारितानुमतैः ॥
क्वचिदपरेऽप्यननुमतैः ।
पञ्चाहिंसाद्यणुव्रतानि स्युः ॥ ५ ॥

टीका —स्युः भवेयुः । कानि अहिंसाद्यणुव्रतानि । कति पञ्च। विरतिः निवृत्तिः । कस्मात् स्थूलवधादेः । कैः मन इत्यादि— कृतादयो भावे क्तसाधनाः । मनश्च वचश्च अङ्गं च मनोवचोऽङ्गानि । तेषां प्रत्येकं कृतं च कारितं चानुमतं च मनोवचोऽङ्गकृतकारितानुमतानि तैः । केषां पञ्चाणुव्रतानि स्युः । क्वचिद्गृहवासनिवृत्ते श्रावके तथा अपरे गृहवासनिरते श्रावके । अननुमतैरनुमतिवर्जितैस्तैः षड्भिस्तानि स्युरिति संक्षेपः । इतो विस्तरः— स्थूलजीवादिविषयत्वान्मिथ्यादृष्टीनामपि हिंसादित्वेन प्रसिद्धत्वाद्वा स्थूलो वधादिः स्थूला हिंसानृतस्तेयाब्रह्मपरिग्रहा इत्यर्थः। ततो मनसा वाचा कायेन च पृथक्करणकारणानुमननैर्निवृत्तिरहिंसासूनृतास्तेयब्रह्मचर्यापरिग्रहाख्यानि पञ्चाणुव्रतानि क्वचिद्गृहवासनिवृत्ते श्रावके भवेयुरित्युत्कर्षवृत्याऽणुव्रतान्युपदिश्यन्ते । यान्यपरे गृहवासनिरते श्रावकेऽननुमतैरनुमतिविवर्जितैर्मनस्करणादिभिः षड्भिः स्थूलहिंसादिनिवृत्त्या सम्पद्यन्ते तानि मध्यमवृत्त्या व्रतान्यभिमन्यन्ते । तस्यापत्यादिभिर्हिंसादिकरणे तत्कारणे वा अनुमतेरशक्यप्रतिषेधत्वात् । स एष द्विविधत्रिविधाख्यः स्थूलहिंसादिविरतिभङ्गो बहुविषयत्वात् श्रेयान् । अपिशब्दः प्रकारान्तरेणापि स्थूलहिंसादिनिवृत्तेरणुत्वख्यापनार्थः । शक्त्या हि व्रतं प्रतिपन्नं सुखनिर्वाहं श्रेयोऽर्थं च स्यात् । तद्विरतिभङ्गाः करणादित्रिकेण योगात्रिकेण च विशिष्यमाणा एकोनपञ्चाशद्भवन्ति। यथा हिंसां न करोति मनसा।१।

वाचा । २ । कायेन च । ३ । मनसा वाचा । ४ । मनसा कायेन ।५। वाचा कायेन । ६ । मनसा वाचा कायेन च । ७ । एते करणेन सप्त-भङ्गाः । एवं कारणेन सप्त । अनुमत्याऽपि सप्त ॥ तथा हिंसां न करोति न कारयति च मनसा । १ । वाचा । २ । कायेन । ३ । मनसा वाचा । ४ । मनसा कायेन । ५ । वाचा कायेन । ६ । मनसा वाचा कायेन च । ७ । एते करणकारणाभ्यां सप्त ॥ एवं करणानुमतिभ्यां सप्त ॥ कारणनुमतिभ्यामपि सप्त ॥ करणकारणानुमतिभिरपि सप्त ॥ एवं सर्वे मिलिता एकोनपञ्चाशद्भवन्ति ॥ एते च त्रिकालविषयत्वात्प्रत्याख्यानस्य कालत्रयेण गुणिताः सप्तचत्वारिंशदधिकं शतं भवन्ति ॥ १४७ ॥ त्रिकालविषयता चातीतस्य निन्दया साम्प्रतिकस्य संवरणेनानागतस्य च प्रत्याख्यानेनेति ॥ एते च भङ्गा अहिंसाव्रतवद्व्रतान्तरेष्वपि द्रष्टव्याः ॥ अत्रेयं भावना दिक् । तत्र तावद्बाहुल्येनोपदेशात् द्विविधत्रिविधभङ्गमाश्रित्योच्यते । स्थूलहिंसां न करोत्यात्मना न कारयत्यन्येन मनसा वाचा कायेन चेति । तथा स्थूलहिंसां न करोति न कारयति मनसा वाचा । यद्वा मनसा कायेन अथवा यद्वा वचसा कायेन चेति । तत्र यदा मनसा वाचा न करोति न कारयति तदा मनसाऽभिसन्धिरहित एव वाचाऽपि हिंसकमब्रुवन्नेव कायेनैव दुश्चेष्टितादि असञ्ज्ञिवत्करोति । यदा तु मनसा कायेन न करोति न कारयति तदा मनसाऽभिसन्धिरहित एव कायेन दुश्चेष्टितादि परिहरन्नेवानाभोगाद्वाचैव हन्मि घातयामि नेति ब्रूते । यदा तु वाचा कायेन च न करोति न कारयति तदा मनसैवाभिसन्धीकृत्य करोति कारयति च । अनुमतिस्तु त्रिभिरपि सर्वत्रैवास्ति । एवं शेषविकल्पा अपि भावनीयाः ॥ स्थूलग्रहणमुपलक्षणं । तेन निरपराधसङ्कल्पपूर्वकहिंसादीनामपि ग्रहणम् । एतेन— दण्डो हि केवलो लोकमिमं चामुं च रक्षति ॥ राज्ञा शत्रौ च पुत्रे च यथा-

दोषं समं धृत इति वचनादपराधकारिषु यथाविधदण्डप्रणेतॄणामपि चक्रवर्त्यादीनामणुव्रतादिधारणं पुराणादिषु च बहुशः श्रूयमाणं न विरुध्यते । आत्मीयपदवीशक्त्यनुसारेण तैः स्थूलहिंसादिविरतेः प्रतिज्ञानात् ॥

अर्थः—स्थूलवधादिकांपासून ( स्थूलहिंसा, स्थूलानृत, स्थूलस्तेय, स्थूलाब्रह्म व स्थूलपरिग्रह यांतील प्रत्येकापासून ) मन, वाणी व शरीर यांतील प्रत्येकांची—करणें करविणें व अनुमति देणें यांच्यायोगानें जी निवृत्ति होणें तिला अणुव्रत असें ह्मणतात अर्थात् तीं अणुव्रतें "अहिंसा, सूनृत, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह" अशीं पांच आहेत हें सिद्धच आहे. गृहवासापासून निवृत्त झालेल्या श्रावकांचीं पांच अणुव्रतें आहेत. आणि गृहवासनिरत असलेल्या श्रावकाचे ठिकाणीं अनुमतिवांचून राहिलेल्या सहा प्रकारांनीं अणुव्रतें होतात. कारण, गृहवासनिरतश्रावकाच्या पुत्रादिकांनीं हिंसा केली असतां अगर करविली असतां त्याला गृही श्रावकाची अनुमति नाहीं असें ह्मणतां येत नाहीं. ह्मणून, गृही श्रावकानें अनुमति सोडून राहिलेल्या सहा प्रकारांनींच अणुव्रत करावयाचें आहे. याचें कारण असें आहे कीं, आपले शक्तीप्रमाणें होण्यासारखें असेल तें व्रत केलें असतां तें सुखानें करितां येतें, व त्यापासून करणाराचें कल्याणही होतें. या श्लोकांतील मन, वाणी, काया या तिन्हींचा करणें, करविणें व अनुमति देणें या तिन्हींशीं एक, दोन, तीन अशा रीतीनें संबंध केला असतां होणारा विस्तार ह्मणजे निवृत्तीचे प्रकार

४९ होतात; ते पुढें लिहिल्याप्रमाणें:—

हिंसा न करणें तें १ मनानें न करणें, २ वाणीनें न करणें, ३ शरीरानें न करणें, ४ मनानें व वाणीनें न करणें, ५ मनानें व शरीरानें न करणें, ६ वाणी आणि शरीरानें न करणें आणि ७ मन, वाणी व शरीर या तिहींनीं मिळून न करणें, हे न करण्याचे सात प्रकार झाले. तसेच न करविणें व अनुमति न देणें याचेही सात सात प्रकार होतात. तसेच हिंसा न करणें व न करविणें तें १ मनानें २ वाणीनें ३ शरीरानें; तसेच ४ मन व वाणी या दोहोंनीं, ५ मन व शरीर या दोहोंनीं, ६ वाणी व शरीर या दोहोंनीं, तसेंच ७ मन, वाणी व शरीर या तीहींनीं मिळून. याचप्रमाणें करणें व अनुमति देणें या दोहींचे मिळून सात व कराविणें व अनुमाति देणें या दोहींचे मिळून सात असे एकंदर ४९ झाले. हे वर सांगितलेले निवृत्तीचे (४९) प्रकार भूत, वर्तमान व भविष्य या तीन्ही कालासंबंधी असल्यानें ते त्रिगुणित केले असतां १४७ एकशे सत्तेचाळीस होतात. ते असे:— पूर्वी केलेल्या ४९ प्रकारच्या हिंसेची निंदा (पश्चात्ताप) करणें, वर्तमानकालीं ४९ प्रकारच्या हिंसेपासून निवृत्त होणें; आणिभविष्यकालीं ४९ प्रकारची हिंसा न करण्याचा निश्चय करणें मिळून १४७. हे जे १४७ भेद दाखविले आहेत ते फक्त अहिंसा व्रताचे दाखविले आहेत, बाकी राहिलेल्या सूनृत, अस्तेय, ब्रह्मचर्य व परिग्रह यांचेही प्रत्येकाचे भेद (१४७) आहेत; ते विस्तारभयामुळें येथें दाखविले नाहींत. वर जे मनानें, वाणीनें, शरीरानें भेद

दाखविले आहेत, त्यांतील युग्माचे व त्रिकाचे कांहीं प्रकार घेऊन ते कसे संभवतात तें स्पष्ट करून दाखवितात.

स्थूलहिंसा आपण स्वतः मनानें, शरीरानें करीत नाहीं व दुसऱ्याकडूनही करवीत नाहीं; तसेच स्थूलहिंसा मनानें व वाणीनें किंवा मनानें व शरीरानें अथवा वाणीनें व शरीरानें, करीत नाहीं, असे न करण्याचे प्रकार झाले. यांत जेव्हां मनानें व वाणीनें करीत नाहीं व करवीत नाहीं त्या वेळीं मनानें त्याचें चिंतन न करतां व वाणीनेंही हिंसकाशीं न बोलतां उन्मत्ताप्रमाणें शरीराच्या दुष्ट व्यापारांनीं हिंसा करतो. तसेंच ज्या वेळीं मनानें व शरीरानें हिंसा करीत नाहीं व करवीत नाहीं तेव्हां मनानें तीविषयीं प्रवृत्त न होतां व शरीरानें कोणत्याही प्रकारचे दुर्व्यापार न करतां केवळ वाणीनेंच मारतों व मारवितों असें बोलतो. ज्या वेळीं वाणीनें व शरीरानें करीत नाहीं व करवीत नाहीं त्या वेळीं मनानेंच हिंसा करण्याचा व करविण्याचा संकल्प करितो. वर दाखविलेल्या प्रकारांमध्यें अनुमति ही सर्वत्र आहे असें जाणावें. याप्रमाणेंच राहिलेले प्रकारही जुळवावेत. या श्लोकांत स्थूलहिंसा असें पद घातलें आहे; त्यांत स्थूल हें पद लक्षण आहे; त्यायोगानें निरपराधजीवहिंसादेखील स्थूलहिंसा या शब्दानें घेतां येते. आणि म्हणूनच 'दंडो हि केवलो

---

पंगुकुष्टिकुणित्वादि दृष्ट्वा हिंसाफलं सुधीः ॥
निरागस्त्रसजन्तूनां हिंसां संकल्पतस्त्यजेत् ॥ ५ ॥

अर्थः—पांगळेपणा, कोड, किंवंडेपणा हीं सर्व हिंसेचीं फळें होत. म्हणून बुद्धिवंतानें निरपराधी त्रसजीवांची हिंसा करूं नये.

लोकमिमं चामुं च रक्षति ॥ राज्ञा शत्रौ च पुत्रे च यथादोषं समं धृतः ॥ अर्थः—राजानें त्याचा शत्रु असो अथवा पुत्र असो, त्याच्या दोषाला अनुरूप दंड केला असतां तो दंड राजाच्या इहपर लोकांचें रक्षण करितो. या वचनावरून अपराध्यास योग्य दंड करणाऱ्या चक्रवर्ती राजांचीदेखील अणुव्रतें संपूर्ण झालीं अशा पुराणांतील कथांचा विरोध येत नाहीं. कारण त्या चक्रवर्ती राजांनीं तरी आपल्या पदवीला व शक्तीला अनुसरून अणुव्रतें करण्याचा संकल्प केला होता हें सिद्ध आहे.

स्थूलविशेषणं व्याचष्टे—

आतां, स्थूल या विशेषणाचें प्रयोजन सांगतात.

स्थूलहिंस्याद्याश्रयत्वात् ।
स्थूलानामपि दुर्दृशाम् ॥
तत्त्वेन वा प्रसिद्धत्वा- ।
द्वधादि स्थूलमिष्यते ॥ ६ ॥

**टीका**—इष्यते अभिमन्यते आचार्यैः । किं तत् वधादि हिंसादिपापकर्मपञ्चकं । किंविशिष्टमिष्यते स्थूलं । कस्मात् स्थूलहिंस्याद्याश्रयत्वात् स्थूला बादरा हिंस्यादयो हिंस्यभाष्यमोष्यपरिभोग्यपरिग्राह्या आश्रया आलम्बनानि यस्य तत्तदाश्रयं तद्भावात् । तथा वधादि स्थूलमिष्यते । कस्मात् प्रसिद्धत्वात् सम्प्रतिपन्नत्वात् । केषां स्थूलानामपि । किंलक्षणानां दुर्दृशां मिथ्यादृष्टीनां । केन तत्त्वेन वधादिभावेन । वाशब्दात्स्थूलकृतत्वाच्चेत्यनुक्तं समुच्चीयते ॥

**अर्थः**—हिंसा ( वध ), अनृत ( खोटें बोलणें ), स्तेय ( चोरी ), अब्रह्मचर्य ( स्त्रीसंभोग ), परिग्रह ( द्रव्या-

दिकांचा संग्रह ) हीं पांच पापकर्मे ( आचार्यांनां ) स्थूल अशींच इष्ट आहेत. कारण, वर सांगितलेलीं हिंसादिक पांच पापकर्मे ज्यांच्या आश्रयानें होतात त्या सर्व वस्तु ( ज्यांची हिंसा करावयाची, ज्याच्याशीं खोटें बोलावयाचें, जें चोरावयाचें, ज्या स्त्रीचा संभोग करावयाचा व ज्याचा संग्रह करावयाचा, त्या वस्तू ) स्थूल अशाच असल्या पाहिजेत; ह्मणून, अथवा सूक्ष्मज्ञानशून्य अशा मिथ्यादृष्टि लोकांमध्यें स्थूलजीवांच्या हननादिकांलाच हिंसा वगैरे ह्मणतात; ह्मणून, हिंसादि शब्दांच्या मागें स्थूल ह्या पदाचा योग केला आहे. तात्पर्य—अणुव्रतांमध्यें ' स्थूल हिंसा, स्थूलानृत, स्थूलस्तेय, स्थूलाब्रह्म, व स्थूलपरिग्रह ' या पांच पापकर्मांच्या निवृत्तीचेंच ग्रहण केलें आहे.

इदानीमौत्सर्गिकमहिंसाणुव्रतं व्याचष्टे—

आतां, अहिंसा अणुव्रत कोणास होतें हें सांगतात.

शान्ताद्यष्टकषायस्य ।
सङ्कल्पैर्नवभिस्त्रसान् ॥
अहिंसतो दयार्द्रस्य ।
स्यादहिंसेत्यणुव्रतम् ॥ ७ ॥

टीका—स्याद्भवेत् । किं तदणुव्रतं । किमाख्यमहिंसेति अहिंसाख्यं । कस्य शान्ताद्यष्टकषायस्य शान्ताः शमङ्गताः शमिता वा आद्या अनन्तानुबन्धिनो अप्रत्याख्यानावरणाश्च अष्टौ कषायाः क्रोधादयो यस्य येन वा तस्य । पुनः किंविशिष्टस्य दयार्द्रस्य करुणामृदुहृदयस्य । प्रयोजनोद्देशेन कदाचित् स्थावरघाते प्रवृत्तावप्यनुकम्प्यमानमानसस्येति भावः । किं कुर्वतः अहिंसतो द्रव्यभाव.

प्राणैरवियोजयतः । कान् त्रसान् द्वित्रिचतुःपञ्चेन्द्रियजीवान् । कैः सङ्कल्पैः उत्तरसूत्रद्वयनिर्दिष्टैर्हिंसाभिसन्धिभिः । कतिभिर्नवभिः मनोवाक्कायैः पृथक्करणकारणानुमननैरित्यर्थः । अत्र करणग्रहणं कर्तुः स्वातन्त्र्यप्रतिपत्त्यर्थं । कारणाश्रयणं परप्रयोगापेक्षं । अनुमननोपादानं प्रयोजकस्य मानसपरिणामप्रदर्शनार्थं । तथाहि—त्रसहिंसां स्वयं न करोमि त्रसान् हिनस्मीति मनःसङ्कल्पं न करोमीत्यर्थः । तथा मनसा त्रसहिंसामन्यं न कारयामि त्रसान् हिंसय हिंसयेति मनसाऽन्यप्रयोजको न भवामीत्यर्थः । अत्र हिंसयेति हन्त्यर्थाच्चेति हिनस्तेश्चुरादिपाठाण्णिजन्तस्य रूपं । तथाऽन्यं त्रसहिंसां कुर्वन्तं मनसा नानुमन्ये सुन्दरमनेन क्रियते इति मनःसङ्कल्पं न करोमीत्यर्थः ॥ एवं वाचा स्वयं त्रसहिंसां न करोमि त्रसान् हिनस्मीति स्वयं वाचं नोच्चारयामीत्यर्थः । तथा वाचा त्रसहिंसां न कारयामि त्रसान् हिंसय हिंसयेति वाचं नोच्चारयामीत्यर्थः । तथाऽन्यं त्रसहिंसां कुर्वन्तं वाचा नानुमन्ये साधु क्रियते त्वयेति वाचं नोच्चारयामीत्यर्थः । तथा कायेन त्रसहिंसां स्वयं न करोमि त्रसहिंसने दृष्टिमुष्टिसन्धाने स्वयं कायव्यापारं न करोमीत्यर्थः । तथा कायेन त्रसहिंसां न कारयामि त्रसहिंसने हस्तादिसञ्ज्ञया कायेन परं न प्रेरयामीत्यर्थः । त्रसहिंसां कुर्वन्तमन्यं कायेन नानुमन्ये त्रसहिंसने प्रवर्तमानमन्यं नखच्छोटिकादिना नाभिनन्दामीत्यर्थः ॥

अर्थः—पहिले ह्मणजे अनंतानुबंधी क्रोध, मान, माया, लोभ व अप्रत्याख्यानावरण क्रोध, मान, माया व लोभ हे आठ कषाय ज्याचे नष्ट झाले आहेत किंवा ज्यानें नाहींसे केले आहेत असा, नऊ प्रकारच्या संकल्पांनीं त्रस (द्वींद्रिय, त्रींद्रिय, चतुरिंद्रिय, पंचेंद्रिय) जीवांचा वध

न करणारा असा जो दयाळु ( करुणेनें ज्याचें अन्तःकरण मृदु झालें आहे ह्मणजे कारण असूनहि कदाचित् स्थावर जीवांचा घात करण्याचा प्रसंग आला असतांना ज्याला दया येते तो दयाळु ) भव्यात्मा त्याचें अहिंसा नांवाचें अणुव्रत सिद्ध होतें. तो अहिंसा अणुव्रत पाळण्याला अधिकारी आहे.

वर सांगितलेले हिंसा न करण्याच्या संकल्पाचे नऊ प्रकार मन, वाणी आणि शरीर यांतील प्रत्येकांशीं न करविणें व अनुमति न देणें या तिन्हींचा योग केला असतां होतात. ते असेः— ( १ ) मी मनानें त्रसजीवांची हिंसा करीत नाहीं ह्मणजे त्यांना मारावें असें मनांत आणीत नाहीं. ( २ ) मनानें हिंसा करवीत नाहीं ह्मणजे दुसऱ्या कडून हिंसा करवावी असें मनांत आणीत नाहीं. ( ३ ) मनानें हिंसेला अनुमति देत नाहीं ह्मणजे दुसऱ्यानें हिंसा केली असतां त्यानें फार चांगलें केलें असें मनांत आणीत नाहीं. ( ४ ) मी वाणीनें हिंसा करीत नाहीं ह्मणजे मी हिंसा करितों असे शब्द उच्चारीत नाहीं. ( ५ ) वाणीनें हिंसा करवीत नाहीं ह्मणजे दुसऱ्याला तूं हिंसा कर असें सांगत नाहीं. ( ६ ) वाणीनें हिंसेला अनुमति देत नाहीं ह्मणजे दुसरा मनुष्य हिंसा करीत असतां " हें तूं फार चांगलें करतोस " असे शब्द उच्चारीत नाहीं. ( ७ ) शरीरानें हिंसा करीत नाहीं ह्मणजे हिंसा करण्याकरितां मूठ वळणें वगैरे करीत नाहीं. ( ८ ) शरीरानें हिंसा करवीत नाहीं ह्मणजे हिंसा करण्याविषयीं खुणेनें सुचवीत नाहीं. ( ९ ) आणि शरीरानें हिंसेला अनुमति देत नाहीं

ह्मणजे हिंसा करण्याविषयीं दुसरा मनुष्य ह्मणत असतां टाळ्या अथवा चुटक्या वाजवून आपली अनुमति आहे असें सुचवीत नाहीं असे संकल्पाचे नऊ प्रकार होतात.

एतदेव पद्यद्वयेन संगृह्णन्नाह—

इमं सत्वं हिनस्मीति ।
हिन्धि हिन्ध्येष साध्विमम् ॥
हिनस्तीति वदन्नाभि-
सन्दध्यान्मनसा गिरा ॥८॥

वर्तेत न जीववधे ।
करादिना दृष्टिमुष्टिसन्धाने ॥
न च वर्तयेत्परं तत् ।
परे नखच्छोटिकादि न च रचयेत् ॥९॥

टीकाः—नाभिसन्दध्यात् न संकल्पयेत् । कोऽसौ त्यक्तगृहः श्रावकः । कं वधं हिंसां । केन मनसा तथा गिरा वाचा । कथमिति किमिति हिनस्मि हन्मि । कं सत्त्वं जीवं । किंविशिष्टं इमं पुरोवर्तिनं । तथा हिन्धि हिन्धि मारय मारय । कं इमं । तथा हिनास्ति हन्ति । कोऽसौ एषः पुरुषः । कं इमं । कथं साधु सुन्दरं । न वर्तेत न व्याप्रियेत । कोऽसौ त्यक्तगृहः । क जीववधे जीवानां सत्त्वकल्पितत्रसप्राणिनां प्राणव्यपरोपणे । क विषये दृष्टिमुष्टिसन्धाने दृष्टिश्चक्षुः मुष्टिर्हस्तांगुलिबन्धविशेषः दृष्टिश्च मुष्टिश्च दृष्टिमुष्टी ताभ्यां सन्धानं संयोजनं यस्मिन् प्रवृत्तिविषये तत् दृष्टिमुष्टिसन्धानं पुस्तकासनादिकमुपकरणवस्तु तस्मिन् । त्यक्तगृहस्यापि श्रावकस्य सम्भाविनि जीववधे करादिना हस्तांगुल्याद्यङ्गोपाङ्गेन न प्रवर्तेतेत्यर्थः । उक्तंच—आसनं शयनं यानं मार्गमन्यच्च वस्तु

यत् ॥ अदृष्टं तन्न सेवेत यथाकालं भजन्नपि ॥ १ ॥ दृष्टिग्रहणं ज्ञानक्रियोपलक्षणं । मुष्टिग्रहणं च ग्रहणादिक्रियोपलक्षणं । तथा न च वर्तयेत् । कोऽसौ त्यक्तगृहः । कं परं क्व तादृशे जीववधे । तथा न च रचयेत् न कुर्यात् । किं तत् नखच्छोटिकादि । क्व तत्परे जीववधे स्वयमेव वर्तमाने पुंसि ॥

अर्थः—गृहवासापासून निवृत्त झालेल्या श्रावकानें, पुढें असलेल्या या जीवाला मी मारतों असें केव्हांहि मनांत आणूं नये व मुखानेंहि उच्चारूं नये. तसेंच या जीवाला तूं मार असें व या जीवाला हा मारीत आहे हें फार चांगलें आहे असेंहि मनांत आणूं नये व वाणीनेंहि उच्चारूं नये. तसेंच त्या श्रावकानें जीववधाकरितां त्या जीवाकडे क्रूर दृष्टीनें पाहणें व मूठ वळणें हेंहि करूं नये. आणि पुस्तक वगैरे उपकरण वस्तु घेतांना हिंसा होऊं नये ह्मणून नीट पाहून घ्यावी. तसेंच जीववधाकरितां दुसऱ्या मनुष्याची प्रवृत्ति करूं नये. आणि जीववधाविषयीं स्वतः प्रवृत्त झालेल्यास पाहून आपण टाळ्या किंवा चुटके वाजविणें हेंहि करूं नये. याप्रमाणें गृहवासनिवृत्त झालेल्या श्रावकाचें अहिंसाणुव्रत सांगितलें.

एवं त्यक्तगृहस्योपासकस्याहिंसाणुव्रतविधानमुपदिश्येदानीं गृहवर्तिनस्तदुपदिशन्नाह—

आतां, गृहवासानिरत श्रावकाचें अहिंसाणुव्रत सांगतात.

---

१ आसनं शयनं यानं मार्गमन्यच्च वस्तु यत् ॥
अदृष्टं तन्न सेवेत यथाकालं भजन्नपि ॥ १ ॥

अर्थः—आसन, शयन, वाहन, मार्ग अथवा दुसरी कोणतीही वस्तु यांचें योग्यकाळीं देखील नीट पाहिल्यावांचून ग्रहण करूंनये.

इत्यनारम्भजां जह्या- ।
ध्दिंसामारम्भजां प्रति ॥
व्यर्थस्थावरहिंसाव- ।
द्यतनामावहेद्गृही ॥ १० ॥

टीका—जह्यात् त्यजेत् । कोऽसौ गृही गृहवर्तिश्रावकः । कां हिंसां । किंविशिष्टामनारम्भजां अनारम्भे आसनोपवेशनादौ जातां तत्सम्भाविनीमित्यर्थः । उक्तं च– गृहकार्याणि सर्वाणि दृष्टिपूतानि कारयेत् । कथं जह्यात् इति अनेन त्यक्तगृहोपासकोपादिष्टेन प्रकारेण ॥ तथा आवहेत् कुर्यात् । कोऽसौ गृही । कां यतनां समितिपरतां । कथं प्रत्युद्दिश्य कां हिंसां । किंविशिष्टां आरम्भजां कृष्याद्यारम्भसम्भाविनीं । किंवत् व्यर्थस्थावरहिंसावत् निष्प्रयोजनैकेन्द्रियवधे यथा ॥

**अर्थः—वर गृहवासापासून निवृत्त झालेल्या श्रावकाला उद्देशून सांगितल्याप्रमाणें गृहस्थश्रावकानें आरंभापासून होणाऱ्या हिंसेचाहि त्याग[२] करावा. ह्मणजे वसणें, उठणें**

---

२ हिंसा द्वेधा प्रोक्ताऽऽरम्भानारम्भभेदतो दक्षैः ॥
गृहवासतो निवृत्तो द्वेधाऽपि त्रायते तां च ॥ ६ ॥
गृहवाससेवनरतो मन्दकषायः प्रवर्तितारम्भः ॥
आरम्भजां स हिंसां शक्नोति न रक्षितुं नियतम् ॥ ७ ॥

अर्थः—हिंसा दोन प्रकारची आहे. पहिली आरंभहिंसा व दुसरी अनारंभहिंसा. जो गृहवासापासून दूर झाला आहे, तो दोन्ही हिंसा करीत नाहीं. कृषि वगैरे जीवनव्यापार करणारा आणि ज्याचे क्रोधादि कषाय मंद झाले आहेत असा गृहस्थ

वगैरे सावधगिरीनें करावें. कारण, "गृहकार्याणि सर्वाणि दृष्टिपूतानि कारयेत् । ह्मणजे सर्व गृहकृत्यें नीट पाहून करावीं" असें सांगितलें आहे. तसेंच ज्याप्रमाणें विनाकारण एकेंद्रियजीवाची हिंसा न होण्याविषयीं सावधगिरी ठेविली जाते, त्याचप्रमाणें कृष्यादिकांपासून ह्मणजे जमीन नांगरणें, खुरपणें वगैरेपासून होणाऱ्या जीववधाबद्दल ( जेणेंकरून फारशी हिंसा न होईल अशा रीतीनें ) दक्ष असावें.

स्थावरवधादपि निवृत्तिमुपपादयति—

आतां; एकेंद्रियजीवांचादेखील वध न करण्याविषयीं सांगतात.

यन्मुक्त्यङ्गमहिंसैव ।
तन्मुमुक्षुरुपासकः ॥
एकाक्षवधमप्युज्झेत् ।
यः स्यान्नावर्ज्यभोगकृत् ॥ ११ ॥

टीका —यद्यस्माद्भवति। किं तन्मुक्त्यङ्गं मोक्षसाधनं। किं अहिंसैव द्रव्यभावहिंसाविरमणमेव। तत्तस्मात् । उज्झेत् त्यजेत् । कोऽसौ उपासकः श्रावकः । किंविशिष्टो मुमुक्षुः बुभुक्षोर्नास्ति नियम इति भावः । कं एकाक्षवधमपि त्रसहिंसामिव स्थावरहिंसामपि । यः किं यः एकाक्षवधः । न स्यात् । किंविशिष्टः अवर्ज्यभोगकृत् अवर्ज्यानां

---

कृष्यादिकांपासून होणाऱ्या हिंसेचें निवारण करूं शकत नाहीं. असा नियम आहे. अर्थात् तो गृहस्थ अनारंभहिंसेचा त्याग करूं शकतो.

वर्जयितुमशक्यानामावर्ज्यानां वा अर्जनीयानां भोगानां सेव्यार्थानां कारणम् ॥

**अर्थः—ज्याअर्थी एकेंद्रियादि सर्व जीवांच्या हिंसेपासून निवृत्त होणें हें मोक्षाचें मुख्य साधन आहे; त्या अर्थी मुक्त होण्याची इच्छा करणाऱ्या श्रावकानें त्रसहिंसेप्रमाणें एकेंद्रियजीवांच्या हिंसेचाहि त्याग अवश्य करावा. ( मुक्तीची इच्छा न करणाऱ्याला हा नियम लागूं नाहीं. ) त्यांत अवश्य संग्राह्य अशा भोग्य वस्तूंच्या संपादनाकरितां होणाऱ्या एकेंद्रियजीवांच्या वधाचामात्र त्याग केलाच पाहिजे असें नाहीं.**

---

१ जे तसकाया जीवा पुव्वुद्दिठ्ठा ण हिंसिदव्वा ते ॥
एगिंदियावि णिक्कारणेण पढमं वदं थूळम् ॥ १ ॥

अर्थः—पूर्वी सांगितलेले जे त्रसकायिक जीव ते मारूं नयेत; आणि कारणावांचून एकेंद्रिय जीवही मारूं नयेत हें पहिलें स्थूलव्रत ( अहिंसाणुव्रत ) होय.

स्तोकैकेन्द्रियघातात् गृहिणां सम्पन्नयोग्यविषयाणाम् ॥
शेषस्थावरमारणविरमणमपि भवति कर्तव्यम् ॥ २ ॥
भूपयःपवनाग्नीनां तृणादीनां च हिंसनम् ॥
यावत्प्रयोजनं स्वस्थं तावत्कुर्यादजन्तुजित् ॥ ३ ॥

अर्थः—ज्यांनीं एकेंद्रिय जीवांचा फारसा वध न करितां सेवण्यास योग्य असे पदार्थ संपादन केले आहेत अशा गृहस्थांनीं विनाकारण स्थावरजीवांचीहि हिंसा करूं नये. पृथ्वी, अप्, वायु, अग्नि आणि वनस्पति कायिक जीवांचा वध अहिंसकानें आपल्या उपयोगापुरताच करावा.

साङ्कल्पिकवधं नियमयति—

**आतां; संकल्पपूर्वकहिंसेविषयीं सांगतात.**

गृहवासो विनाऽऽरम्भा- ।
न चारम्भो विना वधात् ॥
त्याज्यः स यत्नात्तन्मुख्यो ।
दुस्त्यजस्त्वानुषङ्गिकः ॥ १२ ॥

**टीका**—न भवति । कोऽसौ गृहवासो गेहाश्रमः कथं विना। कस्मात् आरम्भात्कृष्यादिजीवनोपायात् । तथा न भवति कोऽसौ आरम्भः । कथं विना । कस्मात् वधात् प्राण्युपमर्दनात् । यत एवं ततस्मात्त्याज्यः । कोऽसौ स वधः । किंविशिष्टो मुख्यः इमं जन्तुमासाद्यार्थित्वेन हन्मीति सङ्कल्पप्रभवः । कस्माद्यत्नात् अवधानात् । तुर्विशेषे । तेन भवति । कोऽसावारम्भः । किंविशिष्टो दुस्त्यजः त्यक्तुमशक्यः । किंविशिष्टः आनुषङ्गिकः कृष्याद्यनुषङ्गे जातः कृष्यादौ क्रियमाणे सम्भवन्नित्यर्थः ॥

**अर्थः—जमीन नांगरणें वगैरे हें जीविकेचें मुख्य साधन असल्यामुळें, गृहस्थश्रावकाचें त्यावांचून जीवन होणें शक्य नाहीं; व तें कर्षणादिकर्म हिंसेवांचून होणें शक्य नाहीं. ह्मणून " मी मांसादिकांच्या इच्छेनें या जीवाचा वध करितों " असा संकल्प करून जी जीवहिंसा करावयाची, तिचा अवश्य सर्व प्रयत्नांनीं त्याग करावा. आनुषंगिक ह्मणजे नांगरणें, खुरपणें वगैरेमध्यें होणाऱ्या हिंसेचा त्याग करणें हें गृहस्थश्रावकास अशक्य आहे.**

प्रयत्नहेयां हिंसामुपदिशति.

**आतां; गृहस्थानेंही सर्वदां हिंसेचा त्याग करण्याचा प्रयत्न करीत असावें हें सांगतात.**

दुःखमुत्पद्यते जन्तो- ।
मनः संक्लिश्यतेऽस्यते ॥
तत्पर्यायश्च यस्यां सा ।
हिंसा हेया प्रयत्नतः ॥ १३ ॥

**टीका**—हेया त्याज्या गृहिणा । काऽसौ हिंसा । कस्मात्प्रयत्नतः प्रणिधानेन । उत्पद्यते । किं दुःखं शारीरं दुःखं क्लेशः । कस्य जन्तोर्जीवस्य परजीवस्य वा । तथा संक्लिश्यते सन्तप्यते । किं तन्मनश्चित्तं जन्तोः । तथाऽस्यते विनाश्यते । कोऽसौ तत्पर्यायः स चासौ पर्यायश्च तत्पर्यायो वर्तमानभवग्रहणम् ॥

**अर्थः**—हिंसा करण्यानें ज्याची हिंसा होते, त्या जीवास शरीरिक दुःख फार होतें व मनासही मोठे क्लेश होतात. आणि त्याला प्राप्त झालेल्या पर्यायाचा ( जन्माचा ) नाश होतो. ह्मणून गृहस्थ श्रावकानेंही तिचा त्यागच करण्याचा प्रयत्न करावा.

अहिंसाणुव्रताराधनोपदेशार्थमित उत्तरः प्रबन्धः । तत्र तावत्प्रयोक्तारमाश्रित्येदमुच्यते—

यापुढील ग्रंथ अणुव्रत करण्याविषयीं उपदेशाकारितां आहे. त्यांत आतां अणुव्रत करणाऱ्या श्रावकास उद्देशून सांगतात.

सन्तोषपोषतो यः स्या- ।
दल्पारम्भपरिग्रहः ॥
भावशुध्द्येकसर्गोऽसा- ।
वहिंसाणुव्रतं भजेत् ॥ १४ ॥

टीका—भजेत् आराधयेत् । कोऽसौ गृही । किं तदहिंसाणुव्रतं । यः किं यः स्यात् । किंविशिष्टोऽल्पारम्भपरिग्रहः आरम्भश्च परिग्रहश्च ममेदमहमस्येति बुद्धिग्राह्यो भार्याद्यर्थः आरम्भपरिग्रहौ, अल्पौ दुर्ध्यानप्रकर्षानुत्पादकौ आरम्भपरिग्रहौ यस्य स तथोक्तः । कस्मात् सन्तोषपोषतो धृतेः प्रकर्षात् । पुनः किंविशिष्टो भावशुध्द्येकसर्गो मनःशुद्धावेकाग्रः ॥

अर्थ—जो श्रावक, सहज सन्तोषवृत्तीच्या आधिक्यामुळें कृष्यादिकर्में अगदीं स्वल्प करितो व ज्याचा परिग्रह ( हें माझें आहे व मी यांचा आहे अशी बुद्धी ज्यांच्याविषयीं आहे असा भार्या वगैरे पदार्थ ) स्वल्प आहे, व अंतःकरण शुद्धीविषयीं ज्याचा दृढ निश्चय झालेला आहे त्यानें अहिंसा नामक अणुव्रत करावें.

पञ्चातिचारान् परिहरन् वाङ्मनोगुप्त्यादिभावनापञ्चकेनाहिंसाणुव्रतमुपयुञ्जीतेत्युपदिशति—

आतां, पांच प्रकारचे अतिचार आपल्याकडून न होऊं देतां ‘ वाङ्मनोगुप्त्यादिस्वरूप ’ पांच प्रकारच्या भावनांनीं अहिंसाणुव्रत साधावें असें सांगतात.

मुञ्चन् बन्धं वधच्छेदा- ।
वतिभारादिरोपणम् ॥
भुक्तिरोधं च दुर्भावा- ।
द्भावनाभिस्तदाविशेत् ॥ १५ ॥

टीका—आविशेदुपयुञ्जीत । कोऽसौ व्रतिकः । किं तदहिंसाणुव्रतं । काभिर्भावनाभिः वाग्गुप्त्या मनोगुप्त्या ईर्यासमित्या आदाननिक्षेपणसमित्या आलोकितपानभोजनेनेति पञ्चभिरभ्यासविशिष्टैः ।

किं कुर्वन् मुञ्चन् वर्जयन् किं तत् बन्धादिपञ्चकं । कस्मात् दुर्भावादिति समन्वयः । इतो विस्तरः— बन्धो रज्वादिना गोमनुष्यादीनां नियन्त्रणं । स च पुत्रादीनामपि विनयग्रहणार्थं विधीयते अतो दुर्भावादित्युक्तं । दुर्भावं दुष्परिणामं प्रबलकषायोदयमाश्रित्य क्रियमाणो यो बन्धस्तं वर्जयन्नित्यर्थः । अत्रायं विधिः— बन्धो द्विपदानां चतुष्पदानां वा स्यात् । सोऽपि सार्थकोऽनर्थको वा तत्रानर्थकस्तावच्छ्रावकस्य कर्तुं न युज्यते । सार्थकः पुनरसौ द्वेधा । सापेक्षो निरपेक्षश्च । तत्र सापेक्षो यो दामग्रंथ्यादिना शिथिलेन चतुष्पदानां विधीयते यश्च प्रदीपनादिषु मोचयितुं छेत्तुं वा शक्यते । निरपेक्षो यन्निश्चलमत्यर्थममी बध्यन्ते । द्विपदानां तु दासदासीचोरजारादिप्रमत्तपुत्रादीनां यदा बन्धो विधीयते तदा सविक्रमणा एवामी बन्धनीया रक्षणीयाश्च यथाऽग्निभयादिषु न विनश्यन्ति । यद्वा द्विपदचतुष्पदाः श्रावकेण त एव संग्राह्या ये बद्धा एव तिष्ठन्तीति प्रथमोऽतिचारः ॥ १ ॥ वधो दण्डकशाद्यभिघातः । सोऽपि दुर्भावाद्विधीयमानो बन्धवदतिचारः । यदि पुनः कोऽपि न करोति विनयं तदा तं मर्माणि मुक्त्वा लतया दवरकेण वा सकृत् द्विर्वा ताडयेदिति द्वितीयोऽतिचारः ॥ २ ॥ छेदः कर्णनासिकादीनामवयवानामपनयनं । सोऽपि दुर्भावात्क्रियमाणोऽतिचारो निर्दयं हस्तादीनां छेद इत्यर्थः । स्वास्थ्यापेक्षया तु गण्डव्रणादिच्छेदनदहनादिकं ससान्त्वनं कुर्वतोऽपि नातिचारः स्यादिति तृतीयः ॥ ३ ॥ अतिभारातिरोपणं न्याय्यभारादतिरिक्तस्य वोढुमशक्यस्य भारस्यारोपणं वृषभादीनां पृष्ठस्कन्धादौ वाहनोपाधिरोपणं । तदपि दुर्भावात्क्रोधाल्लोभाद्वा क्रियमाणमतिचारः । अत्राप्ययं विधिः— श्रावकेण तावत् द्विपदादिवाहनेन जीविका प्रागेव मोक्तव्येत्येष श्रेष्ठः पक्षः । अथान्योऽसौ न स्यात्तदा द्विपदो

यावन्तं भारं स्वयमुत्क्षिपति अवतारयति च तावन्तमेव वा वाह्यते मोच्यते चोचितवेलायाम् । चतुष्पदस्य तु यथोचितभारः किञ्चिदूनः क्रियते । हलशकटादिषु पुनरुचितवेलायामसौ मुच्यते इति चतुर्थः ॥ ४ ॥ भुक्तिरोधोऽन्नपानादिनिषेधः । सोऽपि दुर्भावाद्बन्धवदतिचारः । तीक्ष्णक्षुधादिपीडितः प्राणी म्रियत इत्यन्नादिनिरोधो न कस्यापि कर्तव्यः। अपराधकारिणि च वाचैव वदेदद्य ते न दास्यते भोजनादिकमिति। स्वभोजनवेलायां तु नियमत एवान्यं भोजयित्वा स्वयं भुञ्जीतान्यत्रोपवासचिकित्स्यज्वरादिव्याधितेभ्यः । शान्तिनिमित्तं चोपवासाद्यपि कारयेदिति पञ्चमः ॥ ५ ॥ किंबहुना मूलगुणस्याहिंसालक्षणस्यातिचारो यथा न भवति तथा यतनया वर्तितव्यम्॥

अर्थः— दुष्टहेतूनेंही करण्यास योग्य असलेल्या बंधादि पंचकाचा ह्मणजे इतरास बंधांत ठेवणें, वध करणें, छेद करणें, अतिशय ओझें लादणें व खाण्यापिण्यास हरकत करणें ( बंध, वध, छेद, अतिभाराधिरोपण व भुक्तिरोध ) यांचा ज्यानें पूर्ण त्याग केलेला आहे अशा गृहस्थश्रावकानें भावनापंचकानें ( वाग्गुप्ति, मनोगुप्ति, इर्यासमिति आदाननिक्षेपणसमिति व आलोकित–पान–भोजन यांस भावनापंचक असें नांव आहे ) अहिंसा संज्ञक अणुव्रत करावें. असा या श्लोकाचा संक्षेपानें अर्थ झाला. यांतील विस्तार पुढें लिहिल्याप्रमाणें. वर बंधादिपंचक हें दुष्ट हेतूनेंहि होण्यास योग्य आहे असें दर्शविलें आहे, त्यांतील तात्पर्य असें आहे कीं, बंध शब्दानें दोरी वगैरेनीं पशु किंवा मनुष्य यांस बांधून घालणें असा अर्थ होतो. आपण पुत्रादिकांलासुद्धां योग्य शिक्षा होण्याकारितां बांधून घालितों, पण त्यांत दुर्भाव ह्मणजे दुष्टहेतु नाहीं, ह्मणून तें बांधून

घालणें अवश्य केलेंच पाहिजे. त्याचा त्या बंधादिपंचकांत समावेश होत नाहीं. तर दुर्भावानें केलेला ह्मणजे दुष्परिणामीं अर्थात् ज्यावेळीं क्रोधादि कषाय मनुष्याच्या मनांत अतिरेकाला पावले असतील त्यावेळीं केलेल्या बंधाचेच बंधादिपंचकांत ग्रहण करावयाचें आहे व याकरितांच श्लोकांत ‘ दुर्भावात् ’ असें पद ठेविलें आहे.

बंध—द्विपद ह्मणजे मनुष्यें आणि पक्षी; आणि चतुष्पद ह्मणजे पशु यांना बांधून घालणें किंवा कैदेंत ठेवणें याला बंध ह्मणतात. तो दोन प्रकारचा आहे. एक सार्थक व २ निरर्थक. पैकीं निरर्थकबंध श्रावकानें केव्हांही करूं नये. ह्मणून त्याविषयीं विचार करणेचें येथें प्रयोजन नाहीं. सार्थकबंधहि सापेक्ष व निरपेक्ष असा दोन प्रकारचा आहे. कृषि वगैरे कामाकरितां गृहस्थाला पशु बाळगावे लागतात, ते बांधले पाहिजेत पण ते अशा रीतीनें बांधावयाचे, कीं त्यांच्या जागेंत आग लागली असतां तें बंधन सहज सोडतां आलें पाहिजे. याला सापेक्षबंध ह्मणतात. आणि त्यांना बळकट बांधणें याला निरपेक्षबंध ह्मणतात. हा चतुष्पदाविषयींचा विचार झाला. आतां द्विपद ह्मणजे दास दासी व वेडावलेलीं माणसें वगैरे यांचाहि बंध करावा लागतो. पण त्यांना हालचाल करितां येईल अशा तऱ्हेनें तो करावा. त्यांत एवढेंमात्र लक्षांत ठेविलें पाहिजे कीं ज्यांचा बंध करावयाचा त्यांचें आग वगैरे अपायापासून चांगलें रक्षण केलें पाहिजे. श्रावकानें कोणासहि बंधांत ठेऊं नये हा उत्तम पक्ष. आणि पशु वगैरे जे बाळगावयाचे त्यांना अशी संवय

लावून ठेवावी कीं, ते कोठेंही पळून जाणार नाहींत. दुष्ट-भावानें कैद करणें किंवा बांधूनघालणें हा बंधातिचार होय.

वध— कांठीं किंवा चाबूक इत्यादिकांनीं अन्य जीवाला ताडन करणें याचें नांव वध. तो दुष्ट हेतूनें केला असतां अहिंसाव्रताचा अतिचार होतो. जर कोणी एखादा उगीच दांडगाई करीत असेल तर त्यानें तसें करूं नये ह्मणून त्याला मर्म सोडून इतर अवयवावर बारीक अशा वेळीनें किंवा दुसऱ्या एखाद्या मृदुपदार्थानें एकदोनदां ताडन करावें हा वधाविषयीं विचार झाला.

छेद— कान, नाक, बोटें इत्यादि अवयव कांपणें याला छेद ह्मणतात. दुष्ट हेतूनें छेद केला असतां अहिंसा व्रताचा अतिचार होतो आणि बोट वगैरे अवयवाचे भाग जर कुजत असतील त्यांचा किंवा आवाळू, व्रण वगैरेचा छेद केला असतां अतिचार दोष येत नाहीं, कारण तसें करण्यांत करणाऱ्याचा हेतु दुष्ट नसतो.

अतिभारारोपण— बैल, घोडा वगैरे पशूंच्या पाठीवर किंवा मानेवर अधिक ओझें लादणें याला अतिभारारोपण ह्मणतात. श्रावकानें दास, दासी वगैरेकडून फार मोठीं ओझीं आणवून त्यावर आपलें जीवन करणें अगदीं सोडून द्यावें हा प्रथमपक्ष आहे. जर तसें होणें शक्य नसेल तर त्या दास दासी वगैरे जनांस सहज उचलून मस्तकावर ठेवितां येईल व त्यांचें त्यांसच उतरितां येईल असें ओझें त्यांजकडून

नेववावें; व योग्यवेळीं त्यांस भोजनादि व्यापार करण्यास मोकळीक द्यावी. तसेंच चतुष्पद ह्मणजे पशु त्यांनां देखील जितका भार वाहणें शक्य असेल, त्यापेक्षां थोडासा कमीच भार त्याजवर घालावा. व योग्यवेळीं त्यांना खाण्यापिण्याविषयीं मोकळीक द्यावी. हें चवथ्या अतिभाराधिरोपण नांवाच्या अतिचाराचें विवेचन झालें.

**भुक्तिरोध**— दुसऱ्याच्या खाण्यापिण्याला हरकत करणें याला भुक्तिरोध ह्मणतात. हा भुक्तिरोधही दुर्भावानें ( दुष्ट हेतूनें ) केला असतां बंधाप्रमाणें अति-चार होतो. कारण कोणत्याही प्राण्याला अत्यंत तीव्र अशी क्षुधा व तृषा उत्पन्न झाली असतां त्याची शांती न झाल्यास तो प्राणी तडफडून मरतो. ह्मणून कोणाच्या अन्नपानांचा निरोध कधींही करूं नये. एखाद्याकडून कांहीं तरी अपराधच झाला असला तर थोडें कठोर भाषण केलें असतां चालेल. पण, त्याचा भुक्तिनिरोध करणें अगदीं योग्य नाहीं.

श्रावकानें प्रत्येक दिवशीं आपली भोजनाची वेळ झाली ह्मणजे दुसऱ्या क्षुधित झालेल्यांस आधीं भोजन घालून नंतर आपण भोजन करावें. एखादा उपवा-साचा दिवस असल्यास अगर एखादा ज्वरादिक व्याधींनीं पीडित झाला असल्यास मात्र भोजन घालूं नये, त्यावेळीं भुक्तिनिरोध केला तरी तो अतिचार होत नाहीं. तसेंच शांतीकरितां कोणाकडून उपवास करविला असतां तोही भुक्तिनिरोध होत नाहीं. हें

पांचव्या भुक्तिनिरोधसंज्ञक अतिचाराचें विवेचन झालें. तात्पर्य; अहिंसाव्रतांत अतिचार न होऊं देण्याविषयीं फार जपावें.

उक्तमेवार्थं मुग्धधियां सुखस्मृत्यर्थं किञ्चिदुपसंगृह्णन्नाह—

आतां; मंदबुद्धि जीवांस चांगलें ज्ञान व्हावें ह्मणून पूर्वी सांगितलेल्या अतिचारांचेंच आणखी विवेचन करितात.

गवाद्यैर्नैष्ठिको वृत्तिं ।
त्यजेद्बन्धादिना विना ॥
भोग्यान् वा तानुपेयात्तं ।
योजयेद्वा न निर्दयम् ॥ १६ ॥

टीका—त्यजेद्वर्जयेत् । कोऽसौ नैष्ठिकः । पाक्षिकस्य तु नास्ति नियमः । कां वृत्तिं जीवनार्थं व्यापारं । कैः गवाद्यैर्गोमहिषतुरगादिभिः । एषः प्रशस्यतमः पक्षः । वा अथवा । उपेयात् परिगृह्णीयात् नैष्ठिकः । कानेतान् गवादीन् । किंविशिष्टान् भोग्यान् वाहदोहादावुपयोक्तुं शक्तान् । कथं विना । केन बन्धादिना नियन्त्रणताडनादिना एष मध्यमः पक्षः । अथवा न योजयेत् स्वयमन्येन वा न विधापयेत् नैष्ठिकः । कं तं बन्धादिं । कथं निर्दयं । एषोऽधमः पक्षः । अत्राह कश्चित्— ननु हिंसैव श्रावकेण

---

१ व्रतानि पुण्याय भवन्ति जन्तो- । र्न सातिचाराणि निषेवितानि
सस्यानि किं क्वापि फलन्ति लोके । मलोपलीढानि कदाचनापि ॥

अर्थः—अतिचारसहित पाळलेलीं व्रतें पुण्यप्रद होत नाहींत. असें पहा; जगांत मलिन धान्यें पेरून कधीं कोठेंतरी फळें आलेलीं पाहिलीं आहेत काय ?

प्रत्याख्याता न बन्धादयः। ततस्तत्करणेऽपि न दोषो हिंसाविरतेरखण्डितत्वात्। अथ बन्धादयोऽपि प्रत्याख्यातास्तदा तत्करणे व्रतभङ्ग एव विरतिखण्डनात्। किं च वधादीनां प्रत्याख्येयत्वे व्रतेयत्ता विशीर्येत प्रतिव्रतमतिचारव्रतानामाधिक्यादिति। एवं च न बन्धादीनामतिचारतेति। अत्रोच्यते— सत्यमहिंसैव प्रत्याख्याता न बन्धादयः। केवलं तत्प्रत्याख्यानेऽर्थतस्तेऽपि प्रत्याख्याता द्रष्टव्या हिंसोपायत्वात्तेषां। नच बन्धादिकरणेऽपि व्रतभङ्गः किन्त्वतीचार एव। कथं? द्विविधं हि व्रतं अन्तर्वृत्त्या बहिर्वृत्त्या च तत्र मारयामीति विकल्पाभावेन यदा कोपाद्यावेशात्परप्राणप्रहाणमविगणयन् बन्धादौ प्रवर्तते न च हिंसा भवति तदा निर्दयताविरत्यनपेक्षतया प्रवृत्तत्वेनान्तर्वृत्त्या व्रतस्य भङ्गो हिंसाया अभावाद्बहिर्वृत्त्या पालनमिति देशस्य भङ्गजननाद्देशस्यैव पालनादतिचारव्यपदेशः प्रवर्तते। तदुक्तं— न मारयामीति कृतव्रतस्य विनैव मृत्युं क इहातिचारः। निगद्यते यः कुपितो वधादीन् करोत्यसौ स्यान्नियमानपेक्षः॥१॥ मृत्योरभावान्नियमोऽस्ति तस्य कोपाद्दयाहीनतया हि भङ्गः। देशस्य भङ्गादनुपालनाच्च पूज्या अतीचारमुदाहरन्ति॥२॥ यच्चोक्तं व्रतेयत्ता विशीर्येतेति तदयुक्तं विशुद्धाहिंसासद्भावे हि बन्धादीनामभाव एवातः स्थितमेतत् बन्धादयोऽतिचारा एवेति॥

अर्थ—नैष्ठिक श्रावकानें गायी बैल वगैरेपासून आपलें जीवन करण्याचें अगदीं सोडून द्यावें हा उत्तमपक्ष आहे. कदाचित् गायी बैल वगैरे पशु दुधाकरितां व ओझें वाहण्याकरितां बाळगलेच तर त्यांस बंधन करूं नये, हा दुसरा पक्ष. कदाचित् बंधन करण्याचा प्रसंग आल्यास त्यांस निर्दयपणानें जखडून बांधूं नये. हा अधम ह्मणजे

तिसरा पक्ष आहे. हा नियम नैष्ठिक श्रावकाविषयींचा आहे. पाक्षिकश्रावकांस हा नियम लागूं नाहीं.

येथें कोणी शंका करील कीं;— श्रावकानें अणुव्रतामध्यें फक्त हिंसात्यागरूप अणुव्रताची प्रतिज्ञा केलेली असते.

---

१ न मारयामीति कृतव्रतस्य विनैव मृत्युं क इहातिचारः ॥
निगद्यते यः कुपितो वधादीन् करोत्यसौ स्यान्नियमानपेक्षः ॥
मृत्योरभावान्नियमोऽस्ति तस्य कोपाद्दयाहीनतया तु भग्नः ॥
देशस्य भंगादनुपालनाच्च पूज्या अतीचारमुदाहरन्ति ॥ २ ॥

अर्थ—"मी कोणाचीही हिंसा करणार नाहीं" असें व्रत ज्यानें धारण केलें आहे; त्याच्या हातून हिंसा घडल्यावांचून 'अतिचार' होतो असें ह्मणणें बरोबर नाही अशी शंका. यावर समाधान असें कीं— हिंसेवांचून अतिचार होत नाहीं असें ह्मणणें बरोबर नाहीं. कारण कीं, जर त्यानें क्रोधाच्या आवेशांत एखाद्या पशूस किंवा मनुष्यास कारणावांचून जखडून बांधून घातलें किंवा दुर्भावानें चाबूक किंवा काठी वगैरेनें अतिशय ताडन केलें, तर त्याच्या अहिंसाव्रताचा भंग होतो. तो आतां ह्मणजे अहिंसाव्रत ज्यानें धारण केलें आहे त्याच्या हातून हिंसेवांचून दुसरी कोणतीही [ वध बंध छेद वगैरे ] क्रिया घडली असतां अतिचार होत नाहीं असें ह्मणणाऱ्याच्या मतानें होणार नाहीं. यावर शंकाकाराचें ह्मणणें असें कीं; जर त्याच्या ताडन, बंधन वगैरे क्रियेपासून कोणाची प्राणहानि झालेली नसेल तर व्रतभंग झाला नाहीं ह्मणण्यास तरी काय हरकत आहे? यावर समाधान सांगणारे म्हणतात कीं; हिंसा होण्याला कारण क्रोधादिक मनोवृत्ति अनावर होणें हें आहे, तेव्हां

बंधादित्यागाचा व्रतत्वानें स्वीकार केलेला नसतो. ह्मणून बंधादि अतिचार व्रती श्रावकाच्या हातून घडले तरी अहिंसाव्रताचा भंग होणें शक्य नाहीं. श्रावकांकडून बंधादि अतिचार झाला असतां ह्मणजे एखाद्या पशूस अथवा मनुष्यास बांधून ठेविलें असतां त्यास ठार मारिलें असें मुळींच होत नाहीं. ह्मणून अहिंसाव्रताच्या भंगाला हिंसाच झाली पाहिजे; ती अतिचारांत होत नसल्यानें अहिंसाव्रताचा भंग होत नाहीं. तर बंधादित्यागाचाही व्रतत्वानें स्वीकार केला असेल आणि बंधादिक श्रावकाकडून घडतील तर व्रतभंग झाला असेंच ह्मटलें पाहिजे. कारण ज्याचा त्याग केला तेंच पुन्हा आपल्याहातून घडलें. तात्पर्य; बंधादिकरण हे अतिचार असें ह्मणणें योग्य नाहीं. आणि बंधादित्याग हा जर अवश्यकर्तव्य आहे, तर त्यांचें व्रतस्वरूपानेंच ग्रहण केलें पाहिजे असें सिद्ध होतें. आतां बंधादिकरणापासून विरति अवश्य व्हावयास पाहिजे ह्मणून बंधादित्यागा-

---

ज्यावेळीं व्रती श्रावक दुर्भावानें पश्वादिकाचें बंधन वगैरे करण्यास प्रवृत्त होतो त्यावेळीं त्यास क्रोध आलेला असतो, हें अगदी सिद्ध आहे. जो श्रावक अहिंसाव्रती आहे त्याचें अंतःकरण नेहमी दयेनें व्याप्त असणें योग्य आहे. तें तसें न राहतां क्रोधयुक्त झालें तर, जरी त्याच्या हातून साक्षात् हिंसा झाली नाहीं तथापि हिंसेचें कारण जो क्रोध तो उत्पन्न झाल्यामुळें अहिंसेच्या दोन भागापैकीं ( अहिंसेचे दोन भाग पूर्वी सांगितलेच आहेत कीं, व्रत हें अंतर्वृत्ति व बहिर्वृत्ति अशा दोन रूपानें असतें. त्यांत अंतर्वृत्ति ह्मणजे दया व बहिर्वृत्ति ह्मणजे प्राणहानि न करणें.

चेंही व्रतस्वरूपानें ग्रहण करावयास पाहिजे असें ह्मणावें तर [ निरुपायास्तव या व्रतांचाही अणुव्रतांतच संग्रह केला पाहिजे ह्मणून ] व्रतांची संख्या अधिक होते. त्यामुळें अणुव्रतें पांच आहेत अशी ग्रंथकाराची उक्ति चुकीची ठरते. कारण अतिचार हे प्रत्येक पापकर्माचे निराळे आहेत व ते प्रत्येक पापकर्माचे पांच पांच याप्रमाणें पंचवीस आहेत. तितक्या सर्वांचा व्रतांमध्येंच संग्रह केल्यास व्रतांची संख्या अधिक होते हें स्पष्टच आहे. तात्पर्य- बंधादिकांना अतिचारही ह्मणतां येत नाहीं व बंधादित्यागाला व्रतही मानितां येत नाहीं. यावर समाधान असें आहे कीं— श्रावकानें हिंसात्यागच प्रतिज्ञात आहे असें जें वर ह्मटलें आहे तेंच खरें आहे. व बंधादिअतिचारांचा त्याग केला नाहीं, तरी कांहीं हरकत नाहीं. कारण जर हिंसेचा त्याग केला तर अर्थातच ज्याच्या योगानें हिंसा होत्ये अशा साधनांचाही त्याग सिद्ध होतो. तेव्हा बंधादिक केले असतां व्रताचा भंग केला असें जरी होत नाहीं, तथापि अतिचार होणेंही

---

तेव्हां अहिंसेचे दोन भाग एक दया व दुसरा प्राणहानि न करणें. ) दयारूप जो अंश त्याचा नाश झाला, व बंधनादि व्यापारांनीं प्रत्यक्ष प्राणहानी झाली नसल्यानें दुसऱ्या अंशाचें पालन झालें. तेव्हां एकदेश पालन झालें ह्मणून पूज्य असे प्राचीन आचार्य एकदेशभंगाला कारण असलेल्या बंधादि व्यापाराला अतिचार असें ह्मणतात. आतां शंकाकार ह्मणेल कीं, जर बंधादिकांचा त्यागही व्रतस्वरूपानें अवश्य स्वीकारावा लागेल तर व्रतांची संख्या अधिक होईल

योग्य नाहीं. कारण, व्रत हें दोन प्रकारांनीं करावयाचें असतें. एक आंतरवृत्तीनें व दुसरें बाह्यवृत्तीनें. त्यांत जेव्हां 'याचा वध करावयाचा' अशी कल्पना नाहीं आणि क्रोधादिकामुळें दुसऱ्याची प्राणहानि होईल हें मनांत न येतां त्याच्या बंधाविषयीं श्रावक प्रवृत्त होतो, त्या वेळीं हिंसा जरी झाली नाहीं तथापि, निर्दयतारूप मनोवृत्तीच्या त्यागाची अपेक्षा न करितां बंधाविषयीं प्रवृत्त झाला असल्यानें अंतर्वृत्तीनें व्रताचा भंग झाला व हिंसा न झाल्यामुळें बाह्यवृत्तीनें व्रताचें पालन झालें. तेव्हां एक देशाचें पालन झाल्यामुळें एकदेशाचा भंग (नाश) झाला हें सिद्ध आहे व ह्मणूनच बंधादिकांनां 'शास्त्रकारांना संमत असल्याप्रमाणें' अतिचार असें नांव दिलें आहे.

एतदेव संगृह्णन्नाह—

अतिचाराचें स्वरूप थोडक्यांत सांगतात.

न हन्मीति व्रतं क्रुध्य- ।
न्निर्दयत्वान्न पाति न ॥
भनक्त्यघ्नन् देशभङ्ग- ।
त्राणात्त्वतिचरत्यधीः ॥ १७ ॥

---

हेंही ह्मणणें बरोबर नाहीं. कारण जर वास्तविक अहिंसा शुद्धभावानें स्वीकारिली असेल तर बंधादिकाविषयीं इच्छाच होणार नाहीं. ह्मणून बंधादिकांचा निराळा त्याग करून त्याचा व्रतत्वानें स्वीकार करण्याचेंही प्रयोजन नाहीं. एवढ्या विवेचनावरून बंधादिक हे अतिचार आहेत असें सिद्ध होतें.

**टीका**—न पाति न पालयति । कोऽसौ अधीरज्ञोऽसमीक्ष्यकारी। किं तत् न हन्मीति व्रतं न मारयामीति नियमं । किं कुर्वन् क्रुध्यन् क्रोधावेशं गच्छन् । कुतो न पाति निर्दयत्वात् करुणारहितत्वात् । तथा न भनक्ति न नाशयति । कोऽसावघी: । किं तत् न हन्मीति व्रतं । किं कुर्वन्नघ्नन् प्राणैर्जीवमवियोजयन् । किं तर्हि करोतीत्याह— अतिचरति व्रतमतिक्रम्याधिवर्तते । तु पुनः । कस्मात् देशभङ्गत्राणात् भङ्गश्च त्राणं भङ्गत्राणं देशस्यान्तर्बहिर्वृत्त्युभयरूपव्रतैकदेशस्य भङ्गत्राणमन्तर्वृत्त्या भञ्जनं बहिर्वृत्त्या च पालनं तस्मात् ॥

**अर्थ—योग्य कोणतें व अयोग्य कोणतें याचा विचार नसलेला व ह्मणूनच क्रोधानें व्याप्त होणारा असा श्रावक क्रोधामुळें निर्दय होऊन अहिंसा व्रताचें पालन करीत नाहीं (कारण अहिंसा व्रताचें ग्रहण केलें असतां निर्दयता वृत्ति उत्पन्न होणें हें विरुद्ध आहे) व केवळ बंधादिकाविषयीं प्रवृत्त होतो, ह्मणून साक्षात् हिंसा करीत नसल्यानें अहिंसाव्रताचा भंगही करीत नाहीं; तर दुर्भावानें बंधादिक करण्याविषयीं प्रवृत्त झाला असल्यानें अहिंसाव्रताचें अतिक्रमण (उल्लंघन) करितो. ह्मणून, त्या उल्लंघनास अतिचार असें नांव दिलें आहे. (तात्पर्य, अंतर्वृत्तीनें व्रतभंग करितो व बहिर्वृत्तीनें व्रताचें पालन करितो यामुळें एकदेशाचा जो भंजकव्यापार त्याला अतिचार असें ह्मणतात.)**

अतिचरतीति पदार्थमभिव्यक्तुं भुक्तिरोधनं चेत्यत्र चशब्देन समुच्चितं चातिचारजातं वक्तुमाह—

**आतां; अतिचारपदाचा स्पष्ट अर्थ सांगून, आणखी**

कितिएक क्रिया अतिचारशद्बानें संग्राह्य आहेत. त्या दाखवितात.

> सापेक्षस्य व्रते हि स्या- ।
> दतिचारोंऽशभञ्जनम् ॥
> मन्त्रतन्त्रप्रयोगाद्याः ।
> परेऽप्यूह्यास्तथाऽत्ययाः ॥ १८ ॥

**टीका**—हि यस्मात् । स्याद्भवेत् । कोऽसावतिचारः । किं स्यादंशभञ्जनं अन्तर्वृत्त्या बहिवृत्त्या वा खण्डनं । कस्य सापेक्षस्य । क व्रते प्रतिपन्नमहिंसाव्रतं न भनज्मीति अपेक्षमाणस्य पुंसः । तथा ऊह्याः वितर्क्याः । के अत्यया अतीचाराः । किंविशिष्टा मन्त्रतन्त्रप्रयोगाद्याः मन्त्र इष्टकर्मसाधनसमर्थः पठितसिद्धोऽक्षरपिण्डः । तन्त्रं सिद्धौषधिक्रियाः मन्त्रश्चतन्त्रं च मन्त्रतन्त्रे तयोः प्रयोगो विधिवत्कर्मणि व्यापारणं स आद्यो येषां ध्यानादीनां ते मन्त्रतन्त्रप्रयोगाद्याः गतिस्तम्भमतिस्तम्भोच्चाटनादिदुष्टकर्मसाधनहेतवः । न केवलं ते परेऽपि शास्त्रान्तरनिर्दिष्टाश्च । कथमूह्याः । तथा तेन व्रतापेक्षापूर्वकं तदेकदेशभञ्जनलक्षणेन प्रकारेण मन्त्रादिकृत् ॥

**अर्थः**—मीं स्वीकारिलेल्या अहिंसाव्रताचा भंग होऊं देणार नाहीं अशी प्रतिज्ञा ज्यानें केली आहे अशा श्रावकाचा अंतर्वृत्तीनें अथवा बहिर्वृत्तीनें जो ( पूर्वी सांगितल्याप्रमाणें बंधनादि व्यापारामुळें ) एकदेशभंग त्याला अतिचार असें ह्मणतात. पूर्वी सांगितलेल्या पांच अतिचाराहून निराळें जारण मारण उच्चाटन वगैरे दुष्ट क्रियेला साधनीभूत असलेले मंत्र ह्मणजे ज्याच्या जपापासून इष्टसिद्धि होते असा सिद्धाक्षरांचा समुदाय व तंत्र ह्मणजे औषधक्रिया यांचे यथाविधि प्रयोग व दुसऱ्या शास्त्रांमध्यें

सांगितलेले आणखी असेच दुर्व्यापार हे देखील अतिचार आहेत असेंच समजावें. कारण, हे व्यापारही पूर्वी सांगितल्याप्रमाणें एकदेशाचे भंजक आहेत.

बन्धादीनामतिचारत्वसमर्थनपुरस्सरमतिचारपरिहारे यत्नं कारयन्नाह—

आतां; मंत्रादिकांनीं केलेल्या बंधनादि व्यापाराला अतिचारत्व आहे असें समर्थन करून; व्रती श्रावकानें अतिचार न होऊं देण्याविषयीं फार जपावें असें सांगतात.

मन्त्रादिनाऽपि बन्धादिः ।
कृतो रज्ज्वादिवन्मलः ॥
तत्तथा यतनीयं स्या- ।
न्न यथा मलिनं व्रतम् ॥ १९ ॥

टीका—भवति । कोऽसौ बन्धादिः बन्धनताडनादिः । किं स्यान्मलः यथोदितशुद्धिप्रतिबन्धित्वादहिंसाणुव्रतातिचारः स्यात्तदेकदेशभञ्जकत्वाविशेषात् । किंविशिष्टः कृतो विहितः । केन मन्त्रादिना मन्त्रतन्त्रादिना । न केवलं रज्ज्वादिनेत्यपिशब्दार्थः । केनेव रज्ज्वादिवत् पाशकशादिना यथा । तत्तस्माद्यतनीयं मैत्र्यादिभावनालक्षणया प्रमादपरिहारपूर्वकचेष्टारूपया च यतनया वर्तितव्यं । कथं तथा तेन विशुद्धाध्यवसायलक्षणेन प्रकारेण । यथा किं । यथा न स्यात् । किं तत् व्रतं । किंविशिष्टं मलिनं सातिचारम् ॥

अर्थः—मंत्रादिकांनीं केलेले बंधादिव्यापारही, दोरी वगैरे साधनांनीं केलेल्या बंधनादिकाप्रमाणें मल ह्मणजे दोषच आहेत. ह्मणून व्रती श्रावकानें सर्वदा असा यत्न करावा कीं, ज्यायोगानें आपल्या व्रताचा भंग केव्हांही होणार नाहीं.

अहिंसाणुव्रतस्वीकारविधिमाह—

अहिंसाव्रताच्या स्वीकाराचा विधी सांगतात.

हिंस्यहिंसकहिंसात- ।
त्फलान्यालोच्य तत्वतः ॥
हिंसां तथोज्झेन्न यथा ।
प्रतिज्ञाभङ्गमाप्नुयात् ॥ २० ॥

टीका—उज्झेत् त्रतयेत् । कोऽसौ श्रावकः । कां हिंसां । कथं तथा तेन स्वशक्त्यनुसारलक्षणेन प्रकारेण । किं कृत्वा आलोच्य गुरुसधर्मश्रेयोऽर्थिभिः सह विमृश्य । कानि हिंस्यहिंसक-हिंसातत्फलानि वध्यवधकवधतत्साध्यानि । कस्मात् तत्त्वतः याथात्म्येन । यथा किं यथा नाप्नुयात् । कोऽसौ व्रती प्रतिपन्नव्रतः । कं प्रतिज्ञाभङ्गं नियमखण्डनम् ॥

अर्थः— ( हिंस्य ह्मणजे ज्याची हिंसा करावयाची ती वस्तु, हिंसक ह्मणजे हिंसा करणारा व हिंसा ह्मणजे देहाचा आणि प्राणांचा वियोग करणें. ) श्रावकानें हिंस्य ह्मणजे काय ? हिंसक ह्मणजे काय ? हिंसा ह्मणजे काय ? व तिचें फळ कशाप्रकारचें आहे याचा नीट विचार करून आपल्या शक्तीप्रमाणें हिंसेचा त्याग करावा. कीं जेणें-करून आपल्या प्रतिज्ञेचा भंग केव्हांही होणार नाहीं.

हिंसकादीँल्लक्षयति—

आतां; हिंसक, हिंस्य आणि हिंसा यांचें स्वरूप क्रमानें सांगतात.

प्रमत्तो हिंसको हिंस्या ।
द्रव्यभावस्वभावकाः ॥

प्राणास्तद्विच्छिदा हिंसा ।

तत्फलं पापसञ्चयः ॥ २१ ॥

टीका—भवति कोऽसौ हिंसकः । किंरूपः प्रमत्तः कषायाद्याविष्टः । प्रपञ्चितं चैतदहिंसामहाव्रतोपदेशप्रस्तावे प्रागिति न पुनरिह प्रपंच्यते । तथा भवन्ति । के हिंस्याः प्राणाः । किमात्मानो द्रव्यभावस्वभावकाः द्रव्यात्मकाः पुद्गलविवर्तरूपाः भावात्मकाश्च चित्परिणामलक्षणाः । तथा भवति । काऽसौ हिंसा । किंलक्षणा तद्विच्छिदा तेषां द्रव्यभावप्राणानां वियोगकारणं । तथा भवति । किं तत् तत्फलं हिंसासाध्यं । किं पापसञ्चयः दुष्कर्मबन्धः ॥

**अर्थः**— प्रमत्त ह्मणजे क्रोधादि कषायांनीं व्याप्त झालेला पुरुष हा 'हिंसक' होय. पुद्गलात्मक व भावात्मक जीव हे 'हिंस्य' होत. आणि त्या पुद्गलात्मक किंवा भावात्मक जीवांचा वियोग करणें, याला 'हिंसा' असें ह्मणतात. व 'दुष्कर्मबंध' हें त्या हिंसेचें फल होय, असें जाणावें.

गृहिणोऽप्यहिंसाव्रतनैर्मल्याय विधिविशेषमाह—

आतां; अहिंसा अणुव्रत विशेष निर्मल ठेवण्याचा विधि सांगतात.

कषायविकथानिद्रा- ।

प्रणयाक्षाविनिग्रहात् ॥

नित्योदयां दयां कुर्यात् ।

पापध्वान्तरविप्रभाम् ॥ २२ ॥

टीका—कुर्यात् । कोऽसावहिंसाणुव्रतनैर्मल्यार्थी । कां दयाम-

नुकम्पां । किंविशिष्टां नित्योदयां अविच्छिन्नोल्लासां । पुनः किंविशिष्टां पापध्वान्तरविप्रभां पापं बन्धाद्यतिचारदुष्कृतं तत् ध्वान्तमिव पुण्यप्रकाशविरोधित्वात् तत्र रविप्रभावत्तदनवगाह्यत्वात् । कस्मात् कषायेत्यादि । कषायाः क्रोधादयः, विकथा मार्गविरुद्धाः कथाः, निद्रा भुक्तान्नपरिणामहेतुः स्वापः, प्रणयो मोहः स्नेहानुबन्धान्ममायमिति ग्रहः, अक्षाणि स्पर्शादिविषयरागद्वेषततानीन्द्रियाणि, तेषां पञ्चदशप्रमादानां विनिग्रहात् विधिपूर्वकनिग्रहात् । अत्र मार्गविरुद्धाः कथाः भक्तस्त्रीदेशराजसम्बन्धिन्यः । तत्र भक्तकथा इदं चेदं श्यामाकषायमोदकादि साधु भोज्यं, साध्वनेन भुज्यते, अहमपि वेदं भोक्ष्ये इत्यादिरूपा । तथा स्त्रीकथा स्त्रीणां नेपथ्याङ्गहारहावभावादिवर्णनरूपा कर्णाटी सुरतोपचारचतुरा लाटी विदग्धा प्रियेत्यादिरूपा वा । तथा देशकथा दक्षिणपथः प्रचुरान्नपानस्त्रीसम्भोगप्रधानः, पूर्वदेशो विचित्रवस्त्रगुडखण्डशालिमद्यादिप्रधानः । उत्तरापथे शूराः पुरुषाः जविनो वाजिनो गोधूमप्रधानानि धान्यानि सुलभं कुंकुमं मधुराणि द्राक्षादाडिमकपित्थादीनि । पाश्चिमदेशे सुखस्पर्शानि वस्त्राणि, सुलभा इक्षवः सितं वारीत्येवमादि ॥ राजकथा शूरोऽस्मदीयो राजा सधनः शौण्डः । गजपतिर्गौडः । अश्वपतिस्तुरुष्कः इत्यादिरूपा । एवं प्रतिकूला अपि भक्तादिकथा वाच्याः । यदा तु रागद्वेषावनास्कन्दन् धर्मकथाङ्गत्वेन अर्थकामकथाः कथयति तदा न वैकथिकः स्यात् । एवं प्रणयस्यापि धर्मविरोधित्वेनैव प्रमादत्वं बोध्यम् ॥

**अर्थः—** क्रोध, मान, माया आणि लोभ हे चार कषाय; भक्तकथा (अमुक एक प्रकारचें अन्न हें फार चांगलें असतें तें मला फार आवडतें किंवा अमक्या एकास आवडतें इत्यादि गोष्टी.) स्त्रीकथा (अमुक स्त्री सुंदर

आहे, अमुक स्त्री चतुर हावभाव करणारी आहे इत्यादि गोष्टी.) राजकथा (आमचा राजा शूर आहे, दयाळू आहे, सुरूप आहे इत्यादि गोष्टी.) आणि देशकथा (अमक्या देशांत अन्नजलांची समृद्धि आहे, अमक्या देशांतले लोक कुरूप आहेत, अमक्या देशांत नाजुकवस्त्र उत्पन्न होतें, अमक्या देशांतले लोक विलासी आहेत इत्यादि गोष्टी.) ह्या चार विकथा, निद्रा, प्रणय (स्नेह) आणि पांच इंद्रियें मिळून पंधरा प्रमाद, यांचा निग्रह करून; श्रावकानें पापरूपी अंधकार घालविणारी जणूं सूर्यप्रभाच कीं काय; अशी दया सतत सर्व जीवांवर करावी.

गृहस्थस्याहिंसादुष्परिपाल्यत्वशङ्कामपाकरोति—

आतां; गृहस्थाला अहिंसाव्रत पाळणें अशक्य आहे या शंकेचें समाधान सांगतात.

विष्वग्जीवचिते लोके ।
क्व चरन् कोऽप्यमोक्षत ॥

---

१ स्नेहानुविद्धहृदयो ज्ञानचरित्रान्वितोऽपि न श्लाघ्यः ॥
दीप इवापादयिता कज्जलमलिनस्य कार्यस्य ॥ १ ॥

अर्थ—ज्याचें हृदय प्रेमानें घायाळ झालें आहे असा मनुष्य ज्ञानी व चारित्रशील असला तरी तो–काजळरूपी मळ उत्पन्न करणाऱ्या दीपाप्रमाणें–अश्लाघ्य होय.

२ पुण्यं तेजोमयं प्राहुः प्राहुः पापं तमोमयम् ॥
तत्पापं पुंसि किं तिष्ठेद्दयादीधितिमालिनि ॥ २ ॥

अर्थः—पुण्य हें प्रकाशमय आहे आणि पाप हें तमःस्वरूप आहे असें सांगितलें आहे. तेंव्हा, दयारूपी प्रकाशमय किरणांचा सूर्य अशा पुरुषाचे ठिकाणीं पाप कसें राहूं शकेल?

भावैकसाधनौ बन्ध- ।
मोक्षौ चेन्नाभविष्यताम् ॥ २३ ॥

टीका---अमोक्ष्यत मोक्षमगमिष्यत् । कोऽसौ कोऽपि मुमुक्षुः । किं कुर्वन् चरन् चेष्टमानः । कस्मिन् क न कापि प्रदेशे । कस्मिन् लोके जगति । किंविशिष्टे विष्वग्जीवचिते समन्ताज्जन्तुव्याप्ते । चेद्यदि वा नाभविष्यतां नाजनिष्यतां । कौ बन्धमोक्षौ । किंविशिष्टौ भावैकसाधनौ भावः परिणाम एकमुत्कृष्टं प्रधानं साधनं निमित्तं ययोः । तत्र शुभाशुभोपयोगौ पुण्यपापरूपबन्धस्य शुद्धोपयोगश्च मोक्षस्य प्रधानं कारणमिति विभागः ॥

अर्थः— बंध व मोक्ष हे जर आत्म्याच्या शुभादिपरिणामावर अवलंबून नसते, तर सर्वत्र त्रसस्थावर जीवांनीं व्याप्त झालेल्या ह्या जगांत संचार करणारा कोणता तरी जीव मुक्त झाला असता काय! मुळींच झाला नसता. स्पष्टीकरण—जगांतील सर्व प्रदेशांत जीव भरले आहेत. तेथें यत्किंचित् सुद्धां हालचाल करण्यास अवकाश नाहीं. अशा ठिकाणीं वास करणारा प्राणी अहिंसा व्रत पाळणार कसें? अहिंसाव्रतावांचून मोक्ष होणें शक्यतर नाहीं. यावर आचार्यांचें ह्मणणें असें आहे कीं; जीवाला अशुभ परिणामानें पापबंध होतो व शुभपरिणामानें पुण्यबंध होतो आणि शुभ व अशुभ या दोन्हीं परिणामांच्या त्यागानें ह्मणजे शुद्धपरिणामानें मुक्ति होते. तेव्हां, हिंसा न होण्याविषयीं सावधगिरी ठेवून वागल्यानंतर कदाचित् न कळत हिंसा झाली; तरी तिच्यायोगें पापबंध होणार नाहीं. कारण, हिंसा करण्याचा हेतु त्यांत नसतो.

एवमतिचारपरिहारद्वारेणाहिंसाणुव्रतपरिपालनमुपदिश्य साम्प्रतं रात्रिभोजनवर्जनव्रतबलेन तदुपदिशन्नाह—

आतां, रात्रिभोजनत्यागाचें कारण सांगतात.

अहिंसाव्रतरक्षार्थं ।
मूलव्रतविशुद्धये ॥
नक्तं भुक्तिं चतुर्धाऽपि ।
सदा धीरस्त्रिधा त्यजेत् ॥ २४ ॥

टीका—त्यजेत् । कोऽसौ व्रती । कां भुक्तिं भोजनं । कतिधा चतुर्धाऽपि अन्नपानखाद्यलेह्यप्रकारमपि । कदा नक्तं रात्रौ । कथं सदा सर्वदा यावज्जीवं । कथं त्रिधा मनोवाक्कायैः । किंविशिष्टः सन् धीरः परीषहोपसर्गैरक्षोभ्यः सत्त्वभावनानिष्ठ इत्यर्थः । किमर्थं अहिंसाव्रतरक्षार्थं । मूलव्रतविशुद्धये च मूलगुणान्विमलीकर्तुमहिंसाणुव्रतं च रक्षितुमित्यर्थः ॥

अर्थ—अहिंसा व्रताच्या रक्षणाकरितां व मूलगुण विशेष निर्मल होण्याकरितां रात्रीं चार प्रकारचें भोजन ( अन्न-भात, वगैरे, पान-दूध, पाणी, सरबत वगैरे; खाद्य लाडू, चिवडा वगैरे आणि लेह्य-आमटी, लोणचें वगैरे खाणें ) करण्याचें—धीर होऊन ह्मणजे त्रास झाला तरी तो सोसून; मनानें, वचनानें व कायेनें सोडून द्यावें.

दृष्टादृष्टदोषभूयिष्ठमपि रात्रिभोजनमाचरन्तं वक्रभणित्या तिरस्कुर्वन्नाह—

जलोदरादिकृद्यूका- ।
द्यङ्कमप्रेक्ष्यजन्तुकम् ॥

प्रेताद्युच्छिष्टमुत्सृष्ट- ।
मप्यश्नन्निश्यहो सुखी ॥ २५ ॥

टीका—अहो आश्चर्यं कष्टं च । भवति । कोऽसौ जनः । किंविशिष्टः सुखी सुखिनमात्मानं मन्यते इहामुत्र च दुःखभागेव भवतीति भावः । किं कुर्वन् अश्नन् भोज्यमाहरन् । क्व निशि रात्रौ । किंविशिष्टमपि जलोदरादिकृद्यूकाद्यङ्कमपि अपिशब्दोऽन्तदीपकत्वाच्चतुर्भिरपि विशेषणैः सम्बध्यते । जलोदरमादिर्येषां कुष्टादीनामपायानां तान् कुर्वन्तीति तत्कृतो जलोदरादिहेतवस्ते च ते यूकादयश्च यूकामर्कटिकादयस्ते तथाविधा अङ्काः कलङ्का अङ्के वा उत्सङ्गे मध्ये यस्यान्नपानादेर्भोज्यवस्तुनस्तथोक्तं । तत्र यूका भोजनेन सह भुक्ता जलोदरं करोति । कौलिकः कुष्ठं, मक्षिका छर्दिं, मुद्रिका मेदोहानिं, व्यञ्जनान्तःपतितो वृश्चिकस्तालुव्यथां, कण्टकः काष्ठखण्डं वा गलव्यथां, वालश्च गले लग्नः स्वरभङ्गमित्यादयो दृष्टदोषाः सर्वेषां प्रतीतिकरा, रात्रिभोजने सम्भवन्ति । तथा अप्रेक्ष्यजन्तुकमपि अप्रेक्ष्यास्तमसा छन्नत्वाद्द्रष्टुमशक्या जन्तुका अल्पजन्तवः सूक्ष्मजीवाः कुन्थ्वादयो जलघृतादिमध्ये पतिताः । मोदकखर्जूराद्यनुषङ्गिणो वा यत्र तत्तथोक्तं । किंच निशिभोजने क्रियमाणेऽवश्यं पाकः सम्भवी । तत्र च षड्जीवनिकायवधोऽवश्यम्भावी । भाजनधावनादौ च जलगतजन्तुविनाशो जलोज्झने च भूमिगतकुन्थुपिपीलिकादिजन्तुघातश्च संभवति । तथा प्रेताद्युच्छिष्टमपि प्रेता अधमव्यन्तरा आदयो येषां पिशाचराक्षसादीनां तैरुच्छिष्टं स्पर्शादिना अभोज्यतां नीतं । एते पूर्वे चादृष्टदोषाः । तथा उत्सृष्टमपि प्रत्याख्यातमपि वस्तु घोरान्धकाररुद्धदृशां तदुपलक्षणासम्भवादेषोऽप्यदृष्टो दोषः ॥

अर्थ---जलोदर, कुष्ट वगैरे रोग उत्पन्न होण्यास कारण होणारे जे कोष्टी किंवा कोळी वगैरे किडे, ते ज्यांत पडलेले असतात; शिवाय किती यत्न करून पाहिलें तरी न दिसून येणारे असेहि जंतु ज्यांत भरले आहेत, आणि नीच प्रतीचे व्यंतर पिशाच वगैरे रात्रीं फिरत असतात ते आपणास न कळत आपल्या पात्रांतलें अन्न हुंगतात; त्यामुळें उष्टें झालेलें, आणि रात्रीं चांगलेंसें दिसत नसल्यामुळें, आपण पूर्वीं ज्या पदार्थाचा त्याग केला आहे, तोच ज्यांत पडला आहे अशा प्रकारचेंहि अन्न, रात्रीं खाऊन मनुष्य आपणास सुखी समजतों, हें आश्चर्य होय! किंवा ही गोष्ट मोठी खेदाची होय!

वनमालादृष्टान्तेन रात्रिभोजनदोषस्य महत्तां दर्शयति—

आतां; वनमालेचा दृष्टांत देऊन रात्रिभोजनाच्या दोषाचें महत्व सांगतात.

त्वां यद्युपैमि न पुनः सुनिवेश्य रामं ।
लिप्ये वधादिकृदघैस्तदिति श्रितोऽपि ॥
सौमित्रिरस्य शपथान्वनमालयैकं ।
दोषाशिदोषशपथं किल कारितोऽस्मिन् ॥२६॥

टीका---किल रामायणे ह्येवं श्रूयते । कारितो विधापितः । कोऽसौ सौमित्रिर्लक्ष्मणः । कया वनमालया स्वभार्यया । कं दोषाशिदोषशपथं दोषाशिनो रात्रिभोजिनो दोषो महापातकाख्यः तेन लिप्येऽहमिति शपथं । किंविशिष्टं एकं शपथान्तररहितं । क्व अस्मिन् लोके । किंविशिष्टोऽपि श्रितोऽपि प्रतिपन्नोऽपि । कान्

अन्यशपथान् शपथान्तराणि । कथं इति अनेन प्रकारेण । यदि नोपैमि नागच्छामि । कां त्वां । कथं पुनर्व्याघुट्य । किं कृत्वा सुनिवेश्य सुव्यवस्थितं कृत्वा । कं रामं । तत् ततः । लिप्ये संयोज्येऽहं । कैः कर्तृभिः वधादिकृद्घैः गोस्त्र्यादिघातकादिपापैः । तत्कथा यथा— लक्ष्मणो दशरथपितृनिदेशात्सह रामेण सीतया च दक्षिणापथे प्रस्थितोऽन्तरा कूर्चनगरे महीधरराजतनयां वनमालां परिणीतवान् । ततश्च रामेण सह परतो देशान्तरं यियासन् स्वभार्यां वनमालां प्रति मोचयति स्म । सा तु तद्विरहकातरा पुनरागमनमसम्भावयन्ती लक्ष्मणं शपथानकारयत् । यथा प्रिये रामं मनीषिते देशे परिसंस्थाप्य यद्यहं भवतीं स्वदर्शनेन न प्रीणयामि तदा प्राणातिपातादिपातकिनां गतिं यामीति । सा तु तैः शपथैरतुष्यन्ती यदि रात्रिभोजनकारिणां शपथं करोषि तदा त्वां प्रति मुञ्चामि नान्यथेति । स च तथेत्यभ्युपगत्य देशान्तरं प्रस्थितवानिति ॥

अर्थ—रामाला इष्टप्रदेशांत पोंचवून पुनः परत तुझ्याजवळ न येईन तर मी हिंसा, लबाडी वगैरे पातकांनीं लिंपला जाईन अशा इतर शपथा लक्ष्मणानें घेतल्या तरी त्याची स्त्री जी वनमाला तिणें, या जगांत मुख्य अशी रात्रिभोजनदोषाची शपथ त्याच्याकडून करविली. असें रामायणांत लिहिल्याचें ऐकण्यांत येतें. याविषयीं रामायणांत अशी कथा आहे— दाशरथि राम सीतेसह वनवासास निघाले, तेव्हां त्यांच्याबरोबर लक्ष्मणहि आपण होऊन बंधुप्रेमानें गेले होते. ते दक्षिणदेशांत गेले, तेव्हां वाटेंत उत्तराकूर्च नगरचा राजा महीश्वर नांवाचा होता, त्याची कन्या वनमाला नांवाची होती, तिणें लक्ष्मणास

वरिलें. पुढें तेथून लक्ष्मण रामचंद्राबरोबर देशांतरास निघाले त्या समयीं ती वनमाला विरहानें दीन होऊन तिनें पुनः लवकर परत येण्याविषयीं शपथ मागितली. तेव्हां लक्ष्मण ह्मणाले, प्रिये, रामाला इच्छित स्थलाला पोंचवून तेथें त्यांची नीट व्यवस्था करून मी जर पुनः परत येऊन माझ्या दर्शनानें तुला संतुष्ट न करीन, तर मला हिंसादि पंच पातकें केल्याचा दोष लागेल. ही शपथ तिला नापसंत होऊन तिनें लक्ष्मणाकडून "परत न आल्यास रात्रिभोजन केल्याचा दोष लागेल" अशी शपथ करविली; आणि मग देशांतरीं जावयास आपली संमती दिली. या कथेवरून इतकेंच लक्षांत ठेवावयाचें कीं रात्रिभोजन हें महापाप आहे.

लौकिकसंवाददर्शनेनापि रात्रिभोजनप्रतिषेधमाह—

यत्र सत्पात्रदानादि ।
किञ्चित्सत्कर्म नेष्यते ॥
कोऽद्यात्तत्रात्ययमये ।
स्वहितैषी दिनात्यये ॥ २७ ॥

टीका—कः स्वहितैषी आत्मनो लोकद्वयेऽपि पथ्यमिच्छुः अद्यात् न कश्चित्स्वहितैषी भुञ्जीतेत्यर्थः । क तत्र दिनात्यये रात्रिसमये । किंविशिष्टे अत्ययमये दोषभूयिष्ठे दोषनिवृत्ते वा । यत्र किं यत्र नेष्यते बाह्यैरपि नाभिमन्यते । किं तत् सत्कर्म शुभक्रिया किंविशिष्टं किञ्चित् किमपि किं पुनः सर्वं । किंविशिष्टं तत् सत्पात्रदानादि सत्पात्रदानं स्नानं देवार्चनमाहुतिः श्राद्धं विशेषतो भोजनं च ॥

अर्थ—रात्रीं सत्पात्रदान, स्नान, देवतार्चन, श्राद्ध, आहुती वगैरे सत्क्रियाहि करूं नयेत असें मिथ्यादृष्टींचें सुद्धां ह्मणणें आहे. ह्मणून सर्व दोषांनीं युक्त अशा रात्रीच्या समयीं कोण बरें हिताची इच्छा करणारा मनुष्य भोजन करील! कोणीच करणार नाहीं.

दिनरात्रिभोजनद्वारेण पुंसामुत्तममध्यमजघन्यभावमाह—

आंता; रात्र आणि दिवस ह्यांत भोजन करण्यासंबंधानें श्रावकांचे होत असलेले उत्तम, मध्यम, अधम हे तीन प्रकार सांगतात.

भुञ्जतेऽह्नः सकृद्वर्या ।
द्विर्मध्याः पशुवत्परे ॥
रात्र्यहस्तद्व्रतगुणान् ।
ब्रह्मोद्यान्नावगामुकाः ॥ २८ ॥

टीका—भुञ्जते अश्नन्ति । के ते वर्या उत्तमाः शुभकर्मणो-ल्बणाः । कथं सकृत् एकवारं । कस्य अह्नो दिनस्य मध्ये । तथा भुञ्जते के मध्याः मध्यमाः शुभक्रियाभिरनुत्तमाधमाः । कथं द्विः द्विवारं । कस्याह्नः । तथा परे अधमाः पापकर्माणः । भुञ्जते । किंवत् पशुवत् गोमहिषादिभिस्तुल्यं । कथं रात्र्यहं नक्तंदिनं । किंविशिष्टाः सन्तो नावगामुकाः अजानानाः कान् तद्व्रतगुणान् रात्रिभोजनवर्जनोपकारकधर्मान् । किंविशिष्टान् ब्रह्मोद्यान् सर्वज्ञप्र-तिपाद्यान् ॥

अर्थ—श्रेष्ठ लोक दिवसांतून एक वेळ जेवतात. मध्य-मप्रतीचे लोक दिवसाच दोन वेळ जेवतात आणि जिनानें उपदेशिलेल्या रात्रिभोजनत्यागाच्या व्रताचा महिमा न

**जाणणारे अधम लोक पशूप्रमाणें रात्रंदिवस पाहिजे तेव्हां खातात.**

शास्त्रनिदर्शनं विना सकलजनानुभवसिद्धं रात्रिभोजननिवृत्तिफलविशेषमाह—

**आतां; रात्रिभोजनत्यागाचें विशेष फळ सांगतात.**

योऽत्ति त्यजन् दिनाद्यन्त- ।
मुहूर्तौ रात्रिवत्सदा ॥
स वर्ण्येतोपवासेन ।
स्वजन्मार्द्धं नयन् कियत् ॥ २९ ॥

**टीका**—योऽत्ति भोजनं करोति । किं कुर्वन् त्यजन् वर्जयन् । कौ दिनाद्यन्तमुहूर्तौ दिवसस्यादावन्ते च द्वे द्वे घटिके । किंवत् रात्रिवत् रात्रिं यथा । कथं सदा नित्यं । स कियत् कियन्मात्रं । वर्ण्येत स्तूयेत सद्भिः । किं कुर्वन् नयन् गमयन् । किं तत् स्वजन्मार्धं अर्धं निजं जन्म । केन उपवासेन चतुर्विधाहारपरिहारेण । समांशे विषमांशे वाऽत्रार्धशब्दो व्याख्येयः ॥

**अर्थ—जो गृहस्थ रात्रीप्रमाणेंच दिवसां सकाळीं सूर्योदयानंतरच्या दोन घटिका व सायंकाळीं अस्तापूर्वींच्या दोन घटिका सोडून भोजन करितो तो आपल्या जन्मांतील अर्धें आयुष्य उपवासानें घालवितो. तेव्हां त्याचें किती वर्णन करावें!**

अथ रात्रिभोजनवर्जनवन्मूलव्रतविशुध्यङ्गत्वादहिंसाव्रतरक्षाङ्गत्वाच्च श्रावकस्य भोजनान्तरायान् श्लोकचतुष्टयेन व्याचष्टे—

**आतां; चार श्लोकांत श्रावकांनीं पाळावयाचे भोजनाचे अंतराय सांगतात.**

अतिप्रसङ्गमसितुं ।
परिवर्धयितुं तपः ॥
व्रतबीजवृतीर्भुक्ते- ।
रन्तरायान् गृही श्रयेत् ॥ ३० ॥

टीका—श्रयेत् प्रतिपद्येत । कोऽसौ गृही व्रतिको गृहस्थः । कान् अन्तरायान् । कस्या भुक्तेः भोजनवर्जनहेतूनित्यर्थः । किंविशिष्टान् व्रतबीजवृतीः बीजस्येव व्रतानामावेष्टकानू रक्षोपायत्वात् अहिंसाणुव्रतशीलभूतानित्यर्थः । किं कुर्वन् असितुं त्यक्तुं । कं अतिप्रसङ्गं विहितातिक्रमेणोपर्योपरि प्रवृत्तिं । तथा परिवर्द्धयितुं समन्तादुपचेतुं । किं तत् तपः इच्छानिरोधम् ॥

अर्थ—पुढें होणारी दुरवस्था टाळण्याकरितां व तप ह्मणजे इच्छेचा निरोध वाढविण्याकरितां व्रतरूपी बींजाचे फोलासारखे असे जे अंतराय ते व्रती श्रावकानें पाळावे.

तानेव श्लोकत्रयेण विशेषतो निर्देष्टुं विवृणोति—

दृष्ट्वाऽऽर्द्रचर्मास्थिसुरा- ।
मांसासृक्पूयपूर्वकम् ॥
स्पृष्ट्वा रजस्वलाशुष्क- ।
चर्मास्थिशुनकादिकम् ॥ ३१ ॥
श्रुत्वाऽतिकर्कशाक्रन्द- ।
विड्वरप्रायनिःस्वनम् ॥
भुक्त्वा नियमितं वस्तु ।
भोज्येऽशक्यविवेचनैः ॥ ३२ ॥

संसृष्टे सति जीवद्भि- ।
जीवैर्वा बहुभिर्मृतैः ॥
इदं मांसमिति दृष्ट- ।
सङ्कल्पे चाशनं त्यजेत् ॥ ३३ ॥

**टीका**—त्यजेत् कोऽसौ व्रतिकः । किं तदशनं तात्कालिकमेवाहारं न तु वैकालिकादिकं। किं कृत्वा दृष्ट्वा स्पृष्ट्वा चेत्यपि द्रष्टव्यं। किं तत् आर्द्रेत्यादि—आर्द्रमशुष्कं चर्माजिनं अस्थि च कीकसं । तथा सुरां मद्यं। मांसं पिशितं । असृक् शोणितं । पूयं व्रणादिगतं पक्वासृक् । पूर्वशद्वाद्वशांत्रादि । तथा स्पृष्ट्वा । किं तत् रजस्वलां पुष्पवतीं स्त्रीं । शुष्के चर्मास्थिनी । शुनकं श्वानं आदिशद्वेन मार्जारश्वपचादि । तथा श्रुत्वा आकर्ण्य । कं अतिकर्कशनिःस्वनं अस्य मस्तकं छिन्धि इत्यादिरूपं । आक्रन्दनिःस्वनं हाहेत्याद्यार्तस्वरस्वभावं । विड्वरप्रायनिःस्वनं परचक्रागमनातङ्कप्रदीपनादिविषयं । तथा भुक्त्वा अशित्वा । किं तत् वस्तु । किंविशिष्टं नियमितं प्रत्याख्यातं । तथा अशनं त्यजेत् । क्व सति भोज्ये भोक्तव्ये द्रव्ये सति । किंविशिष्टे संसृष्टे मिलिते । कैर्जीवैर्द्वित्रिचतुरिन्द्रियप्राणिभिः । किं कुर्वद्भिः जीवद्भिः प्राणद्भिः । किंविशिष्टैः सद्भिः अशक्यविवेचनैः भोज्यद्रव्यात्पृथक्कर्तुमशक्यैः । वा अथवा संसृष्टैः कैर्मृतैर्जीवैः । कतिभिर्बहुभिस्त्रिचतुरादिभिः । तथा । इदमित्यादि— इदं भुज्यमानं वस्तु मांसं सादृश्यात् इदं रुधिरमिदमस्थ्ययं सर्प इत्यादिरूपेण मनसा विकल्प्यमाने भोज्यवस्तुनीत्यर्थः ॥

**अर्थ**—वाळलेलें किंवा ओलें चामडें, हाड, मांस, रक्त, पू इत्यादि व रजस्वला ( विटाळशी बायको, ) कुत्रा, मांजर

ह्मार, मांग वगैरे जीवांस पाहिलें असतां किंवा स्पर्श केला असतां तसेंच अत्यंत कर्कश ( याचें डोकें कापलें! हा मरेल कधीं इत्यादि आक्रोशाचें ) ओरडणें; व लुटारू, रोग इत्यादि कारणांनीं तळमळत ओरडलेले शद्ब ऐकण्यांत आले असतां; त्याचप्रमाणें ज्याचा त्याग केला आहे असा पदार्थ खाण्यांत आला असतां, व जे काढून टाकतां येण्यासारखे नाहींत असे जीवंत किंवा मेलेले द्वींद्रियादि जीव आपल्या पात्रांतील अन्नांत मिसळले असतील किंवा भोजन करीत असतांना पात्रांतील अन्न पाहून- हें मांसासारखें दिसतें, हें अमुक एका वाईट पदार्थासारखें दिसतें, हा पदार्थ सर्पासारखा दिसतो-इत्यादि विकल्प मनांत येईल तर तत्काळ तें भोजन सोडावें.

अथाहिंसाणुव्रतशीलत्वेन मौनव्रतं व्याचिख्यासुः पञ्चश्लोकीमाह—

आतां, पांच श्लोकांत मौनव्रत सांगतात. कारण, मौन हें अहिंसाव्रताचें शील आहे. ह्मणून अहिंसाव्रत पाळणारांनीं मौनव्रतहि पाळलेंच पाहिजे,

गृध्यै हुङ्कारादिसञ्ज्ञां ।
संक्लेशं च पुरोऽनु च ॥
मुञ्चन् मौनमदन् कुर्यात् ।
तपःसंयमबृंहणम् ॥ ३४ ॥

**टीका**—कुर्याद्व्रतिकः । किं तत् मौनमजल्पनं । किं कुर्वन् अदन् भोजनं कुर्वन् । पुनः किं कुर्वन् मुञ्चन् वर्जयन् । कां हुङ्कारादिसञ्ज्ञां हुङ्कारखात्कारभूमूर्धांगुलिचलनादिभिः स्वाभिप्रायज्ञापनं । कस्यै गृध्यै इष्टभोज्यार्थं । तन्निषेधार्थं तु हुङ्कारादिना सञ्ज्ञाकरणे

अपि न दोषः । अथवा गृध्यै भोजनाभिकांक्षाप्रवृत्त्यर्थं । तथा मुञ्चन् । कं संक्लेशं कोपदैन्याद्यविशुद्धपरिणामं । कथं पुरोऽनु च पूर्वं पश्चाच्च । किंविशिष्टं मौनं तपःसंयमबृंहणं इच्छानिरोधस्य प्राणेन्द्रियसंयमस्य च पुष्टिकरम् ॥

अर्थ— भोजन करतांना अमुक एक पदार्थ पाहिजे ह्मणून हुंकार वगैरे खुणा करण्याचें सोडून; आणि पूर्वीचा व नंतरचा दीन किंवा क्रुद्ध परिणाम सोडून, तप व संयम ह्यास वाढविणारें असें मौन अवश्य धरावें ह्मणजे जेवतांना कोणत्याहि प्रकारचें भाषण करूं नये. आणि अमुक एक जिन्नस पाहिजे ह्मणून हुंकार किंवा बोट वगैरे करून खुणा करूं नयेत. नको असल्यास खुणेनें निषेध मात्र करावा.

---

१ हुंकारांगुलिखात्कारभ्रूमूर्धचलनादिभिः ॥
मौनं विदधता संज्ञा विधातव्या न गृद्धये ॥ १ ॥

अर्थ—मौन पाळणारांनीं जिभेची लालूच पुरविण्याकरितां हुंकार किंवा बोटाच्या खुणा किंवा भुंवई व मस्तक हलविणें इत्यादि क्रियांनीं खुणा करूं नयेत.

भ्रूनेत्रहुंकारकरांगुलीभि- ॥
गृद्धिप्रवृत्त्यै परिवर्ज्य संज्ञाम् ।
करोति भुक्तिं विजिताक्षवृत्तिः ।
स शुद्धमौनव्रतवृद्धिकारी ॥ २ ॥

अर्थ—अमुक एक पदार्थाची इच्छा झाली असतांना ती पूर्ण करण्याकरितां भुंवई, नेत्र, हुंकार किंवा हाताचीं बोटें इत्यादिकांच्या खुणा करण्याचें सोडून देऊन जो जितेंद्रिय पुरुष शांतपणें भोजन करितो, तो शुद्ध असें मौनव्रत वाढविणारा होय.

मौनस्य तपोवर्द्धकत्वं श्रेयःसञ्चायकत्वं च श्लोकद्वयेन समर्थयते—

**आतां, मौन हें तप वाढविणारें असून पुण्यसंचय करणारें आहे; असें पुढील दोन श्लोकांनीं सांगतात.**

अभिमानावने गृद्धि- ।
रोधाद्वर्धयते तपः ॥
मौनं तनोति श्रेयश्च ।
श्रुतप्रश्रयतायनात् ॥ ३५ ॥

टीका—वर्धयते । किं तन्मौनं । किं तपः । कस्मिन्निमित्ते सति अभिमानावने अयाचकत्वव्रतरक्षायां सत्यां । तथा गृद्धिरोधात् भोजनलौल्यप्रतिबन्धाद्धेतोः । तथा तनोति स्फीतीकरोति । किं तत् मौनं किं श्रेयः पुण्यं । कस्मात् श्रुतप्रश्रयतायनात् श्रुतज्ञानविनयानुबन्धात् ॥

**अर्थ—मौनव्रत[२] हें याचना न करण्याचा अभिमान राखण्याकारितां केलें, तरी जिव्हालौल्याचा निरोध करण्यापासून तें तपाला वाढवितें; आणि श्रुतज्ञान व विनय वाढविल्यापासून पुण्य वाढवितें.**

---

२ सर्वदा शस्यते जोषं भोजने तु विशेषतः ॥
रसायनं सदा श्रेष्ठं सरोगत्वे पुनर्न किम् ॥ ३ ॥

अर्थ—मौन हें केव्हांही स्तुत्यच आहे. त्यांत भोजनकालीं तर तें विशेष स्तुत्य मानिलें आहे. औषध हें सर्वदां हिताचें असतें, मग रोगाच्या अवस्थेंत तें कां बरें हितकर होणार नाहीं? होईलच.

शुद्धमौनान्मनःसिध्द्या ।
शुक्लध्यानाय कल्पते ॥
वाक्सिध्द्या युगपत्साधु- ।
स्त्रैलोक्यानुग्रहाय च ॥ ३६ ॥

टीका—कल्पते सम्पद्यते समर्थो भवति । कोऽसौ साधुर्देशसंयतः संयतश्च । कस्मै शुक्लध्यानाय । कया मनःसिध्द्या चित्तवशीकरणेन । कस्माज्जातया शुद्धमौनात् भोजनादौ निरतिचारमौनव्रतात् । तथा साधुः कल्पते । कस्मै त्रैलोक्यानुग्रहाय त्रिजगद्भव्यजनानुपकर्तुं । कथं युगपत् एककालं । कया वाक्सिध्द्या युगपत्रिजगदनुग्रहसमर्थभारतीविभूत्या ॥

अर्थ—दोषरहित मौनव्रत[1] पाळिल्यानें मन वश होतें

---

१ सन्तोषं भाव्यते तेन वैराग्यं तेन दर्श्यते ॥
सँयमः पोष्यते तेन मौनं येन विधीयते ॥ ४ ॥

अर्थ—जो गृहस्थ मौनव्रत पाळितो तो आपला संतोष व वैराग्य हीं व्यक्त करितो आणि संयमाची वृद्धि करितो असें जाणावें.

लौल्यत्यागात्तपोवृद्धिरभिमानस्य रक्षणम् ॥
ततश्च समवाप्नोति मनःसिद्धिं जगत्रये ॥ ५ ॥

अर्थ—जिभेची लालूच सोडून दिल्यामुळें तप वाढतें आणि याचना न करण्याविषयींच्या अभिमानाचें रक्षण होतें आणि त्यायोगानें त्याचें मन त्याला पूर्ण वश होतें.

श्रुतस्य प्रश्रयात् श्रेयःसमृद्धेः स्यात्समाश्रयः ॥
ततो मनुजलोकस्य प्रसीदति सरस्वती ॥ ६ ॥

आणि त्यामुळें साधुपुरुष शुक्लध्यानास आणि वचनसिद्धीनें तीन्ही जगावर एकदम अनुग्रह करण्यास समर्थ होतो. ह्मणजे केवली होऊन जगास उपदेश करून त्याचें कल्याण करण्यास समर्थ होतो.

नियतकालिकसार्वकालिकमौनयोरुद्यतनविशेषनिर्णयार्थमाह—

आतां; नियमितकालपर्यंत केलेलें व जन्मभर करावयाचें अशा दोन्ही प्रकारच्या मौनव्रतांच्या उद्यापनाचे निरनिराळे प्रकार सांगतात—

उद्द्योतनं महेनैक- ।
घण्टादानं जिनालये ॥
असार्वकालिके मौने ।
निर्वाहः सार्वकालिके ॥ ३७ ॥

---

अर्थ—मौन पाळण्यानें श्रुतज्ञानाचा विनय राखल्यासारखा होतो, विनय राखण्यानें पुण्याची समृद्धि होते आणि त्यायोगानें मनुष्याला सरस्वती प्रसन्न होते.

वाणी मनोरमा तस्य शास्त्रसन्दर्भगर्भिता ॥
आदेया जायते येन क्रियते मौनमुज्वलम् ॥ ७ ॥

अर्थ— जो निर्मळ असें मौनव्रत पाळितो त्या गृहस्थाची शास्त्रवचनानें गर्भित व मनोहार अशी भाषा सर्वांस ग्राह्य होते.

पदानि यानि विद्यन्ते वन्दनीयानि कोविदैः ॥
सर्वाणि तानि लभ्यन्ते प्राणिना मौनकारिणा ॥ ८ ॥

अर्थ—पंडितांस मान्य अशीं जितकीं ह्मणून पदें आहेत तीं सर्व मौन करणारांस आपोआप मिळतात.

**टीका**—भवति विधीयते वा। किं तत् उद्द्योतनं फलातिशयलाभाय माहात्म्यापादनं। क मौने। किंविशिष्टे असार्वकालिके यथात्मशक्ति नियतकालं कृते। किं तदेकेत्यादि– एकघण्टादानं एकस्या घण्टाया वितरणं। क जिनालये अर्हच्चैत्यगृहे। कथं सह। केन महेनोत्सवेन पूजया वा। तथा सार्वकालिके यावज्जीवं प्रतिपन्ने मौने। उद्द्योतनं भवति। किं तत् निर्वाहो निराकुलं वहनं। नान्यत्॥

**अर्थ—नियमित कालपर्यंत पाळलेल्या मौनव्रताचें उद्यापन ( फलातिशयाच्या लाभाकरितां केला जाणारा उत्सव ) करितांना पूजा अर्चा वगैरे करून उत्सव करून जिनमंदिरांत एक घंटा अर्पण करावी. आणि आमरण पाळिलें जाणारें मौनव्रत व्याकुल न होऊन पाळणें हेंच त्याचें उद्यापन होय.**

आवश्यकादिषु शक्तितः सर्वदाऽपि मौनविधानेन वाग्दोषोच्छेदमाह—

---

१ भव्येन शक्तितः कृत्वा मौनं नियतकालिकम्॥
जिनेन्द्रभवने देया घण्टैका समहोत्सवम्॥ ९॥

अर्थ—भव्य श्रावकानें आपल्या शक्तीप्रमाणें कांहीं कालाच्या प्रमाणाचें मौनव्रत पाळून त्याच्या उद्यापनाकरितां श्रीजिनाच्या मंदिरांत उत्सव करून एक घंटा अर्पण करावी.

२ न सार्वकालिके मौने निर्वाहव्यतिरेकतः॥
उद्योतनं परं प्राज्ञैः किंचनापि विधीयते॥ १०॥

अर्थ—सर्वकाल पाळलें जाणारें मौनव्रत सतत एकसारखें पाळणें हेंच त्याचें उद्यापन होय. याशिवाय निराळें कांहीं नको.

आवश्यके मलक्षेपे ।
पापकार्ये च वान्तिवत् ॥
मौनं कुर्वीत शश्वद्वा ।
भूयो वाग्दोषविच्छिदे ॥ ३८ ॥

टीका—कुर्वीत । कोऽसौ साधुः । किं तन्मौनं । क्व आवश्यके सामयिकादिकर्मषट्के । तथा मलक्षेपे विण्मूत्रोत्सर्गे । तथा पापकार्ये हिंसादिकर्मणि परेण क्रियमाणे । चशब्देन स्नानाशनमैथुनादौ च । यतेस्तु भ्रामरीप्रवेशेऽपि । किंवत् वान्तिवत् । छर्द्यां यथा छर्दनादनन्तरमाचमनं यावदित्यर्थः । अथवा मौनं कुर्वीत । कथं शश्वत् नित्यं । किमर्थं भूय इत्यादि- भूयसां कायदोषापेक्षया बहुतराणां वाग्दोषाणां परुषादिवचनकृतपापास्रवाणां विच्छेदार्थम् ॥

अर्थ—वांति झाल्यावर शुद्ध होऊन आचमन करीतोंपर्यंत जसें मौन धरितों त्याप्रमाणेंच— सामायिक वगैरे सहा क्रिया करितांना; मल व मूत्र सोडितांना; दुसऱ्यानें हिंसादि पापकर्म केल्याचें आपल्यास समजलें असतां; व मैथुन, स्नान, आचमन करितांनाहि मौन अवश्य धरावें. आणि वचनदोष दूर करण्याकरितां निरंतर मौन पाळावें.

अथ सत्याणुव्रतरक्षणार्थमाह—

आतां; सत्याणुव्रताचे रक्षणाकरितां सांगतात—

कन्यागोक्ष्मालीककूट- ।
साक्ष्यन्यासापलापवत् ॥
स्यात्सत्याणुव्रती सत्य- ।
मपि स्वान्यापदे त्यजन् ॥ ३९ ॥

**टीका**—स्यात् । कोऽसौ व्रतिकः श्रावकः । किंविशिष्टः सत्याणुव्रती । किं कुर्वन् त्यजन् वर्जयन् । किं तत् सत्यमपि चोरे चोरोऽयमित्यादिरूपं तथ्यमपि । किमर्थं स्वान्यपदे स्वपरविपत्त्यर्थं यत्तथाभूतं तत्सत्यमपि । किंवत् कन्यालीकादिवत् । यस्मिन्नुक्ते स्वपरयोर्वधबंधादिकं राजादिभ्यो भवति तत्स्थूलासत्यं तादृक् सत्यं च स्वयमवदन् पराँश्चावादयन् सत्याणुव्रती स्यादित्यर्थः । तत्र कन्यालीकं यथा—भिन्नां कन्यामभिन्नां वा विपर्ययं वा वदतो भवति । इदं सर्वस्य कुमारादिद्विपदविषयकस्यालीकस्योपलक्षणं । गवालीकं— अल्पक्षीरां गां बहुक्षीरां विपर्ययं वा वदतः स्यात् । इदमपि सर्वचतुष्पदविषयालीकस्योपलक्षणं । क्ष्मालीकं— परस्वकामपि भूमिमात्मस्वकां विपर्ययं वा वदतो भवेत् । इदं चाशेषपादपाद्यपदद्रव्यविषयालीकस्योपलक्षणं । कन्याद्यलीकानां च लोकेऽतिगर्हितत्वेन रूढत्वात् द्विपदादिग्रहणं न क्रियते । कन्याद्यलीकत्रयं लोकविरुद्धत्वान्न वाच्यं । कूटसाक्ष्यं— प्रमाणीकृतस्य लञ्चामत्सरादिना कूटं वदतः स्यात् । यथाऽहमत्र साक्षीति । अस्य च परपापसमर्थकत्वविशेषेण पूर्वेभ्यो भेदः । तच्च धर्मविपक्षत्वान्न वदेत् । धर्म्यं ब्रूयान्नाधर्म्यमिति विवादिभिरभ्यर्थितत्वात् । न्यासापलापः— न्यस्यते रक्षणार्थमन्यस्मै समर्प्यत इति न्यासः सुवर्णादिद्रव्यं तदपलापं नालपेत् विश्वसितघातकत्वात् । किं चाज्ञानसंशयादिनाऽप्यसत्यं न ब्रूयात् किं पुना रागद्वेषाभ्याम् ॥

**अर्थ**—कन्यालीक, ( कन्येसंबंधी खोटें बोलणें ) गवालीक, ( गायीसंबंधी खोटें बोलणें ) क्ष्मालीक, ( भूमीसंबंधी खोटें बोलणें ) खोटी साक्ष देणें, दुसऱ्यानें ठेविलेल्या ठेवीच्या संबंधानें खोटें बोलणें ह्या गोष्टी जशा टाकावयाच्या, त्याचप्रमाणें ज्या खऱ्या किंवा खोट्या

बोलण्यानें आपल्यावर किंवा दुसऱ्यावर राजादिकापासून वध बंधन वगैरे संकटें येतील, अशा तऱ्हेचें खरें किंवा खोटें न बोलणें व दुसऱ्याकडून न बोलविणें हें सत्याणुव्रताचें स्वरूप आहे, अशा रीतीनें वागणारा श्रावक सत्याणुव्रती होतो. 'कन्यालीक' हें कन्या, अन्य जातीची असतां ती सजातीय आहे असें ह्मटल्यानें, अथवा स्वजातीची असतां ती अन्यजातीची आहे असें बोलल्यानें, अथवा याप्रमाणेंच जे गुणदोष तिच्या ठिकाणीं असतील ते नाहींत असें ह्मणण्यानें, व नसतील ते आहेत असें ह्मटल्यानें होतें. ह्या 'कन्यालीक' शब्दांतील कन्या शब्दानें केवळ मुलगी एवढाच अर्थ घ्यावयाचा नाहीं, तर त्या कन्या शब्दानें द्विपद जीव ह्मणजे मुलगी, मुलगा किंवा दुसरा कोणीहि दोन पायांचा जीव इतका अर्थ घ्यावा. 'गवालीक' हें गायी वगैरे सर्व चतुष्पाद जीवासंबंधी जे गुण किंवा दोष असतील ते आपल्यास माहित असतां नाहीं असें ह्मटल्यानें, अथवा जे गुणदोष नसतील ते आहेत असें ह्मटल्यानें होतें. वर कन्यालीक शब्दांतील कन्या शब्दाचा अर्थ ज्याप्रमाणें सर्व द्विपदजीव असा केला आहे, त्याप्रमाणें गवालीक शब्दांतील गो शब्दाचा अर्थहि सर्व चतुष्पदजीव असा ग्रहण करावा. तसेंच 'क्ष्मालीक' हें दुसऱ्याचे जमीन, झाड अथवा अन्य कोणतेही स्थावर पदार्थ हे आपले आहेत असें ह्मटल्यानें किंवा आपले असतां हे दुसऱ्याचे आहेत असें ह्मटल्यानें होतें. येथेंही क्ष्मालीक शब्दांतील क्ष्मा शब्दाचा अर्थ फक्त जमीन असा न घेतां झाडें वगैरे स्थावर पदार्थ असा घ्यावयाचा आहे.

वरील तीन्हीं प्रकारचीं खोटीं भाषणें लोकप्रसिद्ध आहेत ती लोकविरुद्ध अशीं असल्यामुळें केंव्हांही बोलूं नयेत. तसेंच कूटसाक्ष्य हें साक्षीदारानें लांच घेऊन, अथवा द्वेषान 'याविषयीं मी साक्षीदार आहे' असें ह्मणून खोटी साक्ष दिली असतां होतें. साक्षीदारानें खोटें बोलावयाचें ह्मणजे दुसऱ्याला ( प्रतिपक्षाला ) दोषी ठरवावयाचें, हें त्या खोटें बोलण्याचें निराळेंच फळ असल्यानें वरच्या तीन्ही प्रकारच्या खोटें बोलण्यांत ह्याचा समावेश होत नाहीं, ह्मणून कूटसाक्ष्य हें तीन्हींपेक्षां निराळें मानिलें आहे. तें धर्मविरुद्ध असल्यानें बोलूं नये. कारण, 'धर्माला अनुसरून बोल, अधर्मानें बोलूं नको' अशी प्रतिपक्षाची प्रार्थना असते. न्यासापलाप ह्मणजे दुसऱ्यानें आपल्या जवळ ठेवण्याकरितां दिलेल्या वस्तूसंबंधी भलतेंच कांहीं तरी बोलणें, हेंही करूं नये. कारण, त्या बोलण्यानें विश्वासघात होतो. दुसरें असें कीं, ज्याविषयीं आपल्याला कांहीं माहीत नाहीं त्याविषयीं व ज्याविषयीं आपल्यास संशय आहे त्या विषयींदेखील खोटें बोलूं नये. मग प्रेमानें अथवा द्वेषानें खोटें बोलूं नये ह्यांत काय सांगावयाचें आहे?

लोकव्यवहाराविरोधेन च तदप्रयोगमुपादिशति—

आतां, लोकव्यवहाराला अनुसरून कोणतें भाषण करावें व कोणतें भाषण न करावें हें सांगतात—

लोकयात्रानुरोधित्वा- ।
त्सत्यसत्यादि वाक्त्रयम् ॥

ब्रूयादसत्यासत्यं तु ।
तद्विरोधान्न जातुचित् ॥ ४० ॥

टीका:—ब्रूयात् । कोऽसौ सत्याणुव्रती । किं तत् सत्यसत्यादिवाक्त्रयं वक्ष्यमाणलक्षणं । कस्मात् लोकयात्रानुरोधित्वात् लोकव्यवहाराविसंवादित्वात् । न तु ब्रूयात् । किं तत् असत्यासत्यं । कथं जातुचित् कदाचिदपि । कस्मात् तद्विरोधात् लोकयात्राविप्रलम्भनात् ॥

अर्थ— सत्यसत्यादि तीन प्रकारचें भाषण [ सत्यसत्य सत्यासत्य व असत्यसत्य असे भाषणाचे तीन प्रकार आहेत. यांविषयीं पुढें सांगावयाचें आहे ] लोकव्यवहारास अनुसरून असल्यामुळें अवश्य बोलावें व असत्यासत्य भाषण हें लोकव्यवहाराशीं विरुद्ध असल्यामुळें केव्हांही बोलूं नये.

सत्यसत्यादीनि श्लोकत्रयेण लक्षयन्नाह—

आतां; सत्यसत्यादि तीन प्रकारच्या भाषणांचें स्वरूप सांगतात—

यद्वस्तु यद्देशकाल- ।
प्रमाकारं प्रतिश्रुतम् ॥
तस्मिँस्तथैव संवादि ।
सत्यसत्यं वचो वदेत् ॥ ४१ ॥

टीका:—वदेत् सत्याणुव्रती । किं तत् वचः । किंविशिष्टं सत्यसत्यं । किंलक्षणं संवादि तथाभूतं । क तस्मिन् प्रतिज्ञाते वस्तुनि । कथं तथैव तेनेव तद्देशकालपरिणामरूपत्वेन प्रकारेण ।

यत्किं यद्वस्तु । प्रतिश्रुतं प्रतिज्ञातं । किंविशिष्टं यद्देशकालप्रमाकारं प्रमा परिमाणं संख्या च, आकारो वर्णसंस्थानादिरूपं, देशश्च कालश्च प्रमा च आकारश्च देशकालप्रमाकाराः प्रतिज्ञाविषयीकृता यस्य तत्तथोक्तम् ॥

अर्थ— जो कोणताही पदार्थ, ज्या देशावर, ज्या कालीं, ज्या परिमाणाचा व ज्या आकाराचा आहे असें आपण कबूल केलें असेल; त्या पदार्थाविषयीं तसेंच (पूर्वीं कबूल केल्याप्रमाणेंच) बोलावें, ह्यास सत्यसत्य भाषण असें ह्मणतात.

असत्यं वय वासोऽन्धो ।
रन्धयेत्यादि सत्यगम् ॥
वाच्यं कालातिक्रमेण ।
दानात्सत्यमसत्यगम् ॥ ४२ ॥

टीका—वाच्यं वक्तव्यं सत्याणुव्रतिना । किं तद्वचः । किंविशिष्टमसत्यं । किंविशिष्टं सत् सत्यगं सत्याश्रितं । असत्यमपि किञ्चित्सत्यमेवेत्यर्थः । तदेव वयेत्यादिना दर्शयति— भोः कुविन्द वय आतानवितानीभावरूपतया आसूत्रय त्वं । किं तद्वासो वस्त्रं । वस्त्रनिर्माणयोग्यतन्तुषु वस्त्रशब्दप्रयोगादसत्यत्वं । तथा भो भक्तकर-न्धय पच त्वं । किं तत् अन्धः कूरं । अन्धोयोग्यतण्डुलेष्व-न्धशब्दप्रयोगादसत्यत्वं । आदिशब्दाद्धोः पेषक कणिकां पिंष्टीत्या-दिरूपं ग्राह्यं । अत्र तत्तच्छब्दावाच्यत्वेऽपि लोके तथाव्यवहारा-त्सत्यत्वं । इदमसत्यसत्यं ॥ तथा वाच्यं । किं तत्सत्यं । किंवि-शिष्टमसत्यगं सत्यासत्यमित्यर्थः । कुतः सम्भवद्दानात् वितरणात् । केन कालातिक्रमेण । यथा अर्द्धमासतमे दिवसे तवेदं देयमित्या-

स्थाय मासतमे संवत्सरतमे वा दिवसे ददातीति अत्र दानाव्यभिचारात्सत्यत्वं । प्रतिपन्नतत्कालव्यभिचाराच्चासत्यत्वं । इदमपि लोके तथा व्यवहारात्कचिद्वक्तव्यम् ॥

अर्थ—सत्याणुव्रत करणाऱ्या श्रावकानें सत्याश्रित असलेलें ह्मणजे लोकव्यवहाराला अनुसरून विचार केला असतां जें सत्य आहे असेंच वाटतें असें असत्य भाषणही बोलावें. उदाहरण–'कोष्टचास, अरे! तूं वस्त्र वीण' असें ह्मणणें. ह्या वाक्यांतील विणणें ही क्रिया वस्त्रावर व्हावयाची नसून तंतूवर ( सुतावर ) व्हावयाची आहे. असें असतां वस्त्रासंबंधानें तसा प्रयोग करणें जरी असत्यासारखेंच आहे, तथापि लोकांत असा प्रयोग करण्याची वहिवाट असल्यानें तें भाषण खोटें मानिलें जात नाहीं. ह्मणून सत्याणुव्रती श्रावकानेंही तसें बोलल्यास सत्याणुव्रताचा नाश होत नाहीं. तसेंच– पाचकास ( स्वयंपाक करणाऱ्यास ) अरे ! तूं भात शिजीव ! असें बोलणें, हेंही पूर्वीप्रमाणेंच सत्याश्रित असत्य ( असत्यसत्य ) भाषण होतें. कारण, ह्या वाक्यांत 'भात' ह्या शब्दाचा प्रयोग तांदूळ ह्या अर्थी केलेला आहे. वस्तुतः भात शिजवावयाचा नसून तांदूळ हेच शिजवावयाचे आहेत. त्यांना 'भात' ह्मणतां येत नाहीं. भात ह्मणजे तांदूळ शिजल्यानंतर जें त्या तांदळांचें अवस्थांतर होतें तें, असा अर्थ खरा आहे. तथापि, लोकव्यवहाराला अनुसरून तसाही प्रयोग केला असतां सत्याणुव्रताचा नाश होत नाहीं. तसेंच 'पीठ दळ' इत्यादि प्रयोगही ह्याच अर्थाचे आहेत. ह्मणजे अशा प्रकारच्या शब्द-

प्रयोगासही 'असत्यसत्यभाषण' असेंच समजावें. तात्पर्य, वर दाखविल्याप्रमाणें लोकव्यवहारांत ज्यांचा प्रयोग सर्वदा आढळतो, असें सत्याश्रित असत्य ह्मणजे 'असत्यसत्य' भाषण केलें असतां, सत्याणुव्रताची हानि होत नाही. तसेंच सत्यासत्य भाषण हेंही सत्याणुव्रताचा नाश करणारें होत नसल्यामुळें बोलण्यास हरकत नाहीं. उदाहरण— अमुक एक वस्तू तुला आजपासून पंधरा दिवसांनीं देतों असें ह्मणून कोणत्याही अनिवार्य अडचणीमुळें पंधरा दिवसांनीं न देतां महिन्यानें अथवा वर्षानें देणें, ह्या व्यवहारांत 'पंधरा दिवसांनीं देतों' असें ह्मटलेलें भाषण हें 'सत्यासत्य' होय. कारण वस्तू देतों ह्मटल्याप्रमाणें दिली असल्यानें भाषणांतिल कांहीं अंशाला सत्यता आणि पंधरा दिवसाबद्दल महिना अथवा वर्ष इत्यादि अवधीचा काळ लागल्यामुळें कालाचा मात्र व्यत्यास झाल्यानें कांहीं अंशास असत्यताही आली. त्यामुळें हें भाषण सत्यासत्य स्वरूपाचें झालें. अशा प्रकारचें भाषण करण्याची लोकव्यवहारांत रूढी असल्यानें त्यापासूनही प्रकृत सत्याणुव्रताचा नाश होत नाहीं. ह्मणून एखादे वेळीं तसेंहि बोलण्यास हरकत नाहीं.

यत्स्वस्य नास्ति तत्कल्पे ।
दास्यामीत्यादिसंविदा ॥
व्यवहारं विरुन्धानं ।
नासत्यासत्यमालपेत् ॥ ४३ ॥

**टीका**—न आलपेत् न ब्रूयात् सत्याणुव्रती । किं तत् असत्यासत्यं वचः । किं कुर्वाणं विरुन्धानं बाधमानं कं व्यवहारं लोकयात्रां । कया यदित्यादि– यद्वस्तु नास्ति । कस्य स्वस्यात्मनः सम्बन्धी । तद्दास्यामि तुभ्यं वितरिष्यामि । कदा कल्ये प्रातः । इत्यादिरूपया संविदा प्रतिज्ञया ॥

**अर्थ**—जो पदार्थ आपला नव्हे, किंवा आपल्या जवळ नाहीं, तो पदार्थ मी तुला उद्यां सकाळीं खचित देईन, अशी प्रतिज्ञा करणें हें असत्यासत्य भाषण होय. कारण पदार्थ आपला नसल्यानें किंवा आपल्या जवळ नसल्यानें तो उद्यां अथवा कालांतरीं केव्हाही देतां येत नाहीं. ह्मणून हें वरील भाषण अगदींच खोटें ठरतें. तें लोकव्यवहाराला विरुद्ध असल्यानें केव्हांही सत्याणुव्रती श्रावकानें बोलूं नये. त्यापासून सत्याणुव्रताचा नाश होतो.

सावद्यव्यतिरिक्तानृतपञ्चकस्य नित्यं वर्जनीयत्वमाह—

आतां; ज्यावाचून गृहस्थाश्रमी श्रावकास व्यवहारांत फारच अडचण येते, त्यावाचून बाकीच्या अनृताचा त्याग त्यानेंसुद्धां अवश्य करावा असें सांगतात.

मोक्तुं भोगोपभोगाङ्ग- ।
मात्रं सावद्यमक्षमाः ॥
ये तेऽप्यन्यत्सदा सर्वं ।
हिंसेत्युज्झन्तु वाऽनृतम् ॥ ४४ ॥

**टीका**—अत्रायोग्याविशेषवचनवाच्यतानिवृत्तावशक्तान् प्रति सावद्यविशेषवक्तव्यतानुवृत्त्यर्थो वाशब्दः किं बहुनेत्यर्थः । वा किं

बहुना । उज्झन्तु त्यजन्तु । के तेऽपि धर्मैषिणः । किं तत् अनृतं। किंविशिष्टमन्यत् सावद्यव्यतिरिक्तं सदपलपनादि । कियत् सर्वं पञ्चधाऽपि । कथं सदा नित्यं । कथं कृत्वा हिंसेति यतः सर्वमनृतं हिंसापर्यायत्वाद्धिंसैव प्रमादयोगाविशेषात् । यत्र तु प्रमत्तयोगो नास्ति तद्धियाऽनुष्ठानाद्यनुवदनं नासत्यं । एतेनेदमपि संगृहीतं— सा मिथ्याऽपि न गीर्मिथ्या या गुर्वादिप्रसादिनी इति । के ते इत्याह— ये भवन्ति । किंविशिष्टा अक्षमा असमर्थाः । किं कर्तुं मोक्तु त्यक्तुं । किं तत् सावद्यं वचः क्षेत्रं कृषेत्यादिरूपं प्राणिवधादिप्रवर्तकं । किंविशिष्टं सत् भोगोपभोगाङ्गमात्रं भोगो भोजनादिः, उपभोगः कामिन्यादिः भोगश्चोपभोगश्च भोगोपभोगौ तयोरङ्गं साधनं तदेव तन्मात्रं न पुनस्तदसाधनं । सावद्य वचः— तत्र नास्त्यात्मेत्यादि सदपलपनं । सर्वगत आत्मा श्यामाकतण्डुलमात्रो वेत्यादिकमसदुद्भावनं । गामश्वमभिवदतो विपरीतं । काणं काणमभिदधानस्याप्रियं । अरे बान्धकिनेय इत्यादि गर्हितं साक्रोशमित्यन्यत् ॥

अर्थ—जे श्रावक भोग[1] व उपभोग[2] ह्या दोहोंच्या

---

१ भोग ह्मणजे ज्या पदार्थांचा उपयोग एकवारच करितां येतो दुसऱ्या वेळीं करितां येत नाहीं असें अन्न, माला, चंदन, जल वगैरे पदार्थ होत. हे पदार्थ एकवारच उपयोगास येतात. कारण, जें अन्न आपण भक्षण केलें तेंच अन्न पुनः भक्षण करितां येणार नाहीं. तसेंच, जें उदक एकदा प्यालें, तें पुनः प्राशन करितां येणें शक्य नाहीं. ह्मणून ह्यांना भोग असें नांव आहे.

२ उपभोग ह्मणजे ज्यांचा उपयोग अनेक वेळां करितां येतो

प्तीला साधक असलेल्या 'ही जमीन आमची आहे, आह्मी जमीन नांगरणार' वगैरे पापयुक्त[1] भाषणांचा त्याग करण्यास असमर्थ असतील, त्यांनींदेखील पांचेही[2]

असे स्त्री, वस्त्र, गृह, शय्या वगैरे पदार्थ वरच्याप्रमाणें नसून पुनःपुनः उपयोगांत आणितां येतात. ह्मणून ह्यांना उपभोग असें नांव आहे.

१ या भाषणास 'पापयुक्त भाषण' असें ह्मणण्याचें कारण असें आहे की, 'ही जमीन आमची आहे असें ह्मटल्यानें ह्या जमिनीच्या संबंधानें होणारी हिंसा आह्मी करीत असतों हें तात्पर्यानें सिद्ध होते. तसेंच 'ही जमीन आह्मी नांगरणार असेंच सिद्ध होतें. त्यांत हिंसा हें पाप आहे ह्मणून पापाचा ज्या भाषणापासून तात्पर्यानें बोध होतो अशा प्रकारच्या भाषणास पापयुक्तभाषण ह्मटलें आहे.

२ असत्यभाषण "१ सदपलपन, २ असदुद्भावन, ३ विपरीत, ४ अप्रिय व ५ गार्हित" असें पांच प्रकारचें आहे. त्यांत– १ 'आत्मा नाही' असें ह्मणणें ह्यास सदपलपन असें ह्मणतात. कारण, ह्या भाषणांत वास्तविकपणें असलेल्या आत्म्याचा अपलाप ह्मणजे निषेध केलेला आहे. २ "सर्वत्र व्याप्त असलेला आत्मा हा साव्याच्या तांदुळायेवढ्या परिमाणाचा आहे" असें ह्मणणें ह्यास 'असदुद्भावन' असें ह्मणतात. कारण, ह्या वाक्यांत आत्म्याला जें साव्याच्या तांदुळाचें परिमाण मानिलें आहे तें त्याच्या (आत्म्याच्या) ठिकाणीं वास्तविक नसतांना मानिलें आहे. ह्मणून जें परिमाण आत्म्यावर नाहीं तें मानिलें हें 'असदुद्भावन' होय. ३ "गायीला घोडा" ह्मणणें, ह्यास 'विपरीत' असें ह्मणतात. ४ एका डोळ्यानें

**प्रकारचें अनृत भाषण 'हिंसा असें समजून' सोडावें.**

सत्याणुव्रतस्य पञ्चातिचारान् हेयत्वेनाह—

**आतां; सत्याणुव्रताचे पांच अतिचार (ज्यांच्या योगानें व्रताचें अतिक्रमण होतें अशीं कर्में) टाळण्यास सांगतात.**

---

आंधळा असलेल्या मनुष्यास "तूं एका डोळ्यानें आंधळा आहेस" असें ह्मणणें हें अप्रियभाषण होय. कारण, तें ऐकणाऱ्यास वाईट लागतें. आणि "अरे वेश्यापुत्रा! (रांडेच्या लेका) असें ह्मणणें हें निंद्य भाषण असें समजावें.

१ असत्यभाषणास 'हिंसा' असें समजण्याचें कारण असें आहे कीं, अनृताचा व हिंसेचा परिणाम (दुसऱ्याच्या अंतः-करणाला क्लेश उत्पन्न करणें हा) सारखाच आहे. व दोन्ही-कडे (असत्यभाषण व हिंसा ह्या दोनीकडे) प्रमाद (कषाय) ह्याचा योगही सारखाच असतो. जर रागद्वेषादि कषायांचा योग भाषण करणाऱ्यामध्यें नसेल, तर, त्याकडून झालेली हिंसा जशी हिंसा होत नाहीं; त्याप्रमाणें त्यानें उच्चारिलेलें अनृत भाषणही प्रमादाचा (रागद्वेषादि कषायांचा) योग नस-ल्यास अनृत होत नाहीं. आणि ह्मणूनच "सा मिथ्याऽपि न गीर्मिथ्या या गुर्वादिप्रसादिनी" ह्मणजे जें भाषण गुरु अथवा वडील मनुष्यें यांच्या अंतःकरणास आनंद देणारें असेल, तें जरी खोटें असलें, तथापि तें खोटें नव्हे; असें कोणी पंडितांनीं ह्मटलें आहे, त्याचाही ह्यांत समावेश होतो. कारण, त्यांतही (गुरु वगैरे यांना आनंद देणाऱ्या भाषणांतही) प्रमादयोग नाहीं. ह्मणून पूर्वीप्रमाणें हेंही भाषण असत्य होत नाहीं.

**प्राप्तीला साधक असलेल्या 'ही जमीन आमची आहे, आह्मी जमीन नांगरणार' वगैरे पापयुक्त[1] भाषणांचा त्याग करण्यास असमर्थ असतील, त्यांनींदेखील पांचेही[2]**

---

असे स्त्री, वस्त्र, गृह, शय्या वगैरे पदार्थ वरच्याप्रमाणें नसून पुनःपुनः उपयोगांत आणितां येतात. ह्मणून ह्यांना उपभोग असें नांव आहे.

१ या भाषणास 'पापयुक्त भाषण' असें ह्मणण्याचें कारण असें आहे की, 'ही जमीन आमची आहे असें ह्मटल्यानें ह्या जमिनीच्या संबंधानें होणारी हिंसा आह्मी करीत असतों हें तात्पर्यानें सिद्ध होते. तसेंच 'ही जमीन आह्मी नांगरणार असेंच सिद्ध होतें. त्यांत हिंसा हें पाप आहे ह्मणून पापाचा ज्या भाषणापासून तात्पर्यानें बोध होतो अशा प्रकारच्या भाषणास पापयुक्तभाषण ह्मटलें आहे.

२ असत्यभाषण "१ सदपलपन, २ असदुद्भावन, ३ विपरीत, ४ अप्रिय व ५ गर्हित" असें पांच प्रकारचें आहे. त्यांत– १ 'आत्मा नाही' असें ह्मणणें ह्यास सदपलपन असें ह्मणतात. कारण, ह्या भाषणांत वास्तविकपणें असलेल्या आत्म्याचा अपलाप ह्मणजे निषेध केलेला आहे. २ "सर्वत्र व्याप्त असलेला आत्मा हा साव्याच्या तांदुळायेवढ्या परिमाणाचा आहे" असें ह्मणणें ह्यास 'असदुद्भावन' असें ह्मणतात. कारण, ह्या वाक्यांत आत्म्याला जें साव्याच्या तांदुळाचें परिमाण मानिलें आहे तें त्याच्या (आत्म्याच्या) ठिकाणीं वास्तविक नसतांना मानिलें आहे. ह्मणून जें परिमाण आत्म्यावर नाहीं तें मानिलें हें 'असदुद्भावन' होय. ३ "गायीला घोडा" ह्मणणें, ह्यास 'विपरीत' असें ह्मणतात. ४ एका डोळ्यानें

**प्रकारचें अनृत भाषण 'हिंसा असें समजून' सोडावें.**

सत्याणुव्रतस्य पञ्चातिचारान् हेयत्वेनाह---

**आतां; सत्याणुव्रताचे पांच अतिचार (ज्यांच्या योगानें व्रताचें अतिक्रमण होतें अशीं कर्में) टाळण्यास सांगतात.**

---

आंधळा असलेल्या मनुष्यास "तूं एका डोळ्यानें आंधळा आहेस" असें ह्मणणें हें अप्रियभाषण होय. कारण, तें ऐकणाऱ्यास वाईट लागतें. आणि "अरे वेश्यापुत्रा! (रांडेच्या लेका) असें ह्मणणें हें निंद्य भाषण असें समजावें.

१ असत्यभाषणास 'हिंसा' असें समजण्याचें कारण असें आहे कीं, अनृताचा व हिंसेचा परिणाम (दुसऱ्याच्या अंतः-करणाला क्लेश उत्पन्न करणें हा) सारखाच आहे. व दोन्ही-कडे (असत्यभाषण व हिंसा ह्या दोनीकडे) प्रमाद (कषाय) ह्याचा योगही सारखाच असतो. जर रागद्वेषादि कषायांचा योग भाषण करणाऱ्यामध्यें नसेल, तर, त्याकडून झालेली हिंसा जशी हिंसा होत नाहीं; त्याप्रमाणें त्यानें उच्चारिलेलें अनृत भाषणही प्रमादाचा (रागद्वेषादि कषायांचा) योग नस-ल्यास अनृत होत नाहीं. आणि ह्मणूनच "सा मिथ्याऽपि न गीर्मिथ्या या गुर्वादिप्रसादिनी" ह्मणजे जें भाषण गुरु अथवा वडील मनुष्यें यांच्या अंतःकरणास आनंद देणारें असेल, तें जरी खोटें असलें, तथापि तें खोटें नव्हे; असें कोणी पंडितांनीं ह्मटलें आहे, त्याचाही ह्यांत समावेश होतो. कारण, त्यांतही (गुरु वगैरे यांना आनंद देणाऱ्या भाषणांतही) प्रमादयोग नाहीं. ह्मणून पूर्वींप्रमाणें हेंही भाषण असत्य होत नाहीं.

मिथ्यादिशं रहोऽभ्याख्यां ।
कूटलेखक्रियां त्यजेत् ॥
न्यस्तांशविस्मर्त्रनुज्ञां ।
मन्त्रभेदं च तद्व्रतः ॥ ४५ ॥

**टीका** —त्यजेत् । कोऽसौ तद्व्रतः तत्स्थूलालीकादिवचनविरतिलक्षणं व्रतं यस्यासौ सत्याणुव्रतीत्यर्थः । किं तत् मिथ्यादिशमित्यादि पञ्चकं । तत्र मिथ्यादिक् मिथ्योपदेशः । अभ्युदयनिःश्रेयसार्थेषु क्रियाविशेषेष्वन्यस्यान्यथा प्रवर्तनं । परेण सन्देहापन्नेन पृष्टेऽज्ञानादिनाऽन्यथाकथनमित्यर्थः । अथवा प्रतिपन्नसत्यव्रतस्य परपीडाकरं वचनमसत्यमेव । ततः प्रमादात्परपीडाकरणे उपदेशे अतिचारो यथा वाह्यन्तां खरोष्ट्रादयो हन्यन्तां दस्यव इति निष्प्रयोजनं वचनं । यद्वा विवादे स्वयं परेण वाऽन्यतरातिसन्धानोपायोपदेशो मिथ्योपदेशः ॥ रहोऽभ्याख्या— रहस्येकान्ते स्त्रीपुम्भ्यामनुष्ठितस्य क्रियाविशेषस्याभ्याख्या प्रकाशनं यया दम्पत्योरन्यस्य वा पुंसः स्त्रिया वा रागप्रकर्ष उत्पद्यते । सा च हास्यक्रीडादिनैव क्रियमाणोऽतिचारो न त्वभिनिवेशेन । तथा सति व्रतभङ्ग एव स्यात् ॥ कूटलेखक्रिया— अन्येनानुक्तमननुष्ठितं च यत्किञ्चित्तस्य परप्रयोगवशादेवं तेनोक्तमनुष्ठितं चेति वञ्चनानिमित्तं लेखनं । अन्यसरूपाक्षरमुद्राकरणमित्यन्ये । न्यस्तांशविस्मर्त्रनुज्ञा—न्यस्तस्य निक्षिप्तस्य हिरण्यादिद्रव्यस्य अंशमेकमंशं विस्मर्तुर्विस्मरणशीलस्य निक्षेप्तुरनुज्ञा । द्रव्यमनुनिक्षेप्तुर्विस्मृततत्संख्यस्याल्पसंख्यं तद्गृह्णत एवमित्यनुमतिवचनं । सोऽयं न्यासापहाराख्योऽतिचारः ॥ मन्त्रभेदः अङ्गविकारभ्रूक्षेपादिभिः पराभिप्रायं ज्ञात्वाऽसूयादिना तत्प्रकटनं । विश्वसितमित्रादिभिर्वा आत्मना सह मन्त्रितस्य लज्जादिकरस्या-

र्थस्य प्रकाशनं ॥ यत्तु— मन्त्रभेदः परीवादः पैशून्यं कूटलेखनम् । मुधा साक्षिपदोक्तिश्च सत्यस्यैते विघातकाः ॥ इति यशस्तिलके अतिचारान्तरवचनं तत्परेऽप्यूह्यास्तदात्यया इत्यनेन संगृहीतं प्रतिपत्तव्यम् ॥

अर्थ—सत्याणुव्रत पाळणाऱ्या श्रावकानें ज्यांच्या योगानें त्या सत्याणुव्रताचा अतिक्रम होतो असे " मिथ्यादिश्, रहोऽभ्याख्या, कूटलेखक्रिया, न्यस्तांशविस्मर्त्रनुज्ञा व मंत्रभेद " हे पांचही अतीचार अवश्य वर्ज्य करावे.

मिथ्यादिश् ( मिथ्यादेश ) ह्मणजे एखाद्या मनुष्यास स्वर्ग कशानें मिळतो, व मोक्ष कशानें मिळतो, ह्याविषयीं संशय येऊन, त्यानें त्याबद्दल विचारलें असतां; आपल्यास माहित नसून भलतेंच सांगणें अथवा ज्यानें सत्याणुव्रत स्वीकारलें आहे; त्यानें दुसऱ्यास दुःख होईल असें बोलणें; हें त्याचें असत्य भाषणच आहे. ह्मणून प्रमादामुळें ( द्वेषादि कषायामुळें ) परपीडा ज्या भाषणांत व्यक्त होत आहे, असें भाषण कारणावांचून बोलणें. जसें " ह्या गाढवावर किंवा उंटावर तुह्मी ओझें लादा, " असें उगीच बोलणें. अथवा " चोरांना मारा " असें बोलणें. हाही एकप्रकारचा ' मिथ्यादेश ' च आहे असें समजावें. किंवा दोघे मिळून कांहीं उद्योग करीत असतां, त्यांतील एकाला दुसऱ्यास फसविण्याची युक्ती सांगणें, अथवा दुसऱ्याकडून सांगविणें, हाही एक ' मिथ्यादेशाचा ' प्रकार आहे; असें समजावें.

२ " रहोऽभ्याख्या " ह्मणजे एकांत स्थलीं स्त्रीपुरुषांनीं केलेल्या गुप्तकृत्याचें प्रकाशन करणें. उदाहरण— पति व

पत्नी यांचें एकमेकाविषयीं प्रेम उत्पन्न करण्याकारितां, किंवा कोणत्याही एखाद्या स्त्रियेचें अथवा पुरुषाचें कोणत्याही एखाद्या पुरुषावर अथवा स्त्रियेवर प्रेम उत्पन्न करण्याकरितां त्यांच्या एकांतांत घडलेल्या गोष्टी हसणें वगैरे सहज व्यापारांनीं, सत्याणुव्रती श्रावकानें प्रकाशित केल्या तर तो अतिचार असें समजावें. आणि जर 'हे ह्या स्त्रीपुरुषांचे एकांतीं झालेले व्यापार उघडकीस आणावयाचे' अशा द्वेषबुद्धीनें सत्याणुव्रती श्रावकानें, त्या एकांतांतील गोष्टी मुद्दाम उघडकीस आणल्या तर त्याचा व्रतभंग झाला असेंच समजावें.

३ "कूटलेखक्रिया" ह्मणजे जे व्यवहार दुसऱ्यान बोललेले नाहींत किंवा केलेले नाहींत ते व्यवहार त्यानें बोललेले आहेत किंवा केलेले आहेत असें स्वतः किंवा एखाद्याच्या सांगण्यावरून (ज्यानें ते व्यवहार केलेले अथवा बोललेले नाहींत त्यास फसविण्याकरितां) खोटे लिहिणें. कितीएक पंडित—'दुसऱ्याच्या अक्षरासारखें अक्षर, त्याला न समजतां लिहिणें—' ह्यास "कूटलेखक्रिया" असें ह्मणतात.

४ "न्यस्तांशविस्मर्त्रनुज्ञान" ह्मणजे कोणी एखाद्यानें ठेव ठेवलेल्या सुवर्णादिद्रव्याचा कांहीं अंश ती ठेव ठेवणारा मनुष्य विसरला असतां, त्यास त्याच्या विस्मृतीबद्दल अनुमती देणें. (उदाहरण– कोणी एका देवदत्त नांवाच्या मनुष्यानें वसुमित्र नांवाच्या मनुष्याजवळ पांचहजार रुपये ठेव ह्मणून ठेविले. पुढें देवदत्त याला वसुमित्राजवळ ठेव ठेविलेल्या पांच हजाराची विस्मृती होऊन, चार हजार

ठेव ठेविली आहे असें वाटूं लागलें; तर त्यास (देवदत्तास) 'तूं माझ्या जवळ चार हजार रुपयेच आणून ठेविले आहेस'—असें सांगणें; ह्यास (न्यस्तांशविस्मर्तनुज्ञान) असें ह्मणतात. ह्यालाच "न्यासापहार" असें दुसरें नांव आहे.

५ "मंत्रभेद" ह्मणजे कांहीं खाणाखुणांनीं व भुवया वांकड्या करणें वगैरे व्यापारांनीं दुसऱ्याचा अभिप्राय आपण ओळखून तो दुष्टपणानें भलत्याच एखाद्यास सांगणें किंवा आपल्या मित्र वगैरेनीं आपल्याजवळ गुप्त ह्मणून सांगितलेल्या लज्जाकर व्यवहाराचा परिस्फोट दुसऱ्या जवळ करणें, ह्यासही 'मंत्रभेद' असें ह्मणतात. आतां येथें—यशस्तिलकांत (ह्या नांवाच्या ग्रंथांत) 'मंत्रभेद, निंदा, चहाडी, खोटा लेख, खोटी साक्ष देणें' ह्यास सत्याणुव्रताचे अतीचार मानिले आहेत व वरील श्लोकांत जे मिथ्यादेशादि अतीचार सांगितले ते ह्यापेक्षां निराळेच सांगितले आहेत. तेव्हां दोहोंची संगति कशी लागते अशी एक शंका येते. याचें समाधान असें आहे कीं, यशस्तिलकांत सांगितलेले अतीचार जरी वरील श्लोकांत सांगितलेल्या अतिचाराहून निराळे आहेत आणि ह्मणूनच ह्यांतील योग्य अतीचार कोणते याबद्दल संशय येतो; तरी पुढें "ह्याहून निराळे अतिचार जे असतील ते आपण तर्कानें जाणावेत" असें ग्रंथकार लिहिणार आहेत, त्यानें ह्या यशस्तिलकांत सांगितलेल्या अतीचारांचा संग्रह होतो असें समजावें.

अथाचौर्याणुव्रतलक्षणार्थमाह—

आतां; अस्तेय ( चोरी न करणें ) नांवाच्या अणुव्रताचें स्वरूप सांगतात.

चौरव्यपदेशकर- ।
स्थूलस्तेयव्रतो मृतस्वधनात् ॥
परमुदकादेश्चाखिल- ।
भोग्यान्न हरेद्दीत न परस्वम् ॥ ४६ ॥

टीका—न हरेत् न गृह्णीयात् । नापि ददीत न परस्मै वितरेत् । कोऽसौ चौरेत्यादि—चौरोऽयमुपलक्षणाद्धर्मपातकोऽयं वधकारो अयमित्यादिव्यपदेशं नाम करोतीति चौरादिव्यपदेशकरं, स्थूलस्तेयं बादरचौर्यं खात्रखननादिकं, तत्पूर्वमदत्तादानं वा, तत्र व्रतं नियमस्तस्माद्वा व्रतं निवृत्तिर्यस्य स तथोक्तोऽचौर्याणुव्रतीत्यर्थः । किं तत् परस्वं परस्य धनं चेतनमचेतनं वा द्रव्यं सामर्थ्याददत्तं तस्यैव परस्वामिकत्वोपपत्तेर्दत्तस्य च स्वस्वामिकत्वसम्भवात् । किंविशिष्टं परमन्यत् । कस्मात् मृतस्वधनात् मृतश्चासौ स्वो ज्ञातिश्च मृतस्वः अर्थात्पुत्रादिरहितो लोकान्तरप्राप्तो बन्धुस्तस्य धनं तस्मात् अन्यत् जीवतां ज्ञातीनामित्यर्थः । न केवलं ततः परं उदकादेश्च तोयतृणप्रभृतेश्च । किंविशिष्टात् अखिलभोग्यात् अखिलैः सर्वैः स्थिरैरागन्तुभिश्च लोकैर्भोक्तुं योग्यत्वेन राजादिसमुत्कालितात् ॥

अर्थ—जें घेतल्यानें आपल्यास लोक हा चोर आहे असें ह्मणतील असे दुसऱ्याचे पदार्थ घ्यावयाचे नाहींत असा ज्यानें नियम केला आहे, अशा श्रावकानें, मृत झालेल्या स्वकीय मनुष्याच्या ( जो मृत झाल्यानंतर त्याला पुत्र वगैरे नसल्यामुळें त्याचा वारसा आपल्यासच येतो

अशा मनुष्याच्या ) स्थावर जंगम इष्टेटीवांचून, दुसऱ्या कोणाचेंही स्थावर अथवा जंगम कसलेंही द्रव्य, त्या द्रव्याच्या मालकानें दिल्यावांचून आपण घेऊं नये. ( जो मनुष्य मृत झाला असतां त्याचा वारसा आपल्यास येणार तो मनुष्य जीवंत असतांना त्याचें द्रव्यदेखील त्यानें दिल्याशिवाय आपण घेऊं नये, व दुसऱ्यास देऊं नये. ) तसेंच जे उदक वगैरे पदार्थ सार्वजनिक ( तेथील लोकांनां अथवा दुसऱ्या कोणत्याही लोकांना ज्याचा उपभोग पाहिजे तसा आपल्या इच्छेप्रमाणें करितां येतो) ह्मणून राजाकडून नोंदले गेले असतील त्यांशिवाय दुसरे कोणतेही पदार्थ— त्या पदार्थांच्या मालकानें दिल्यावांचून— आपण घेऊं नयेत व दुसऱ्यासही देऊं नयेत.

प्रमत्तयोगात्परकीयतृणस्याप्यदत्तस्यादाने दाने चाचौर्यव्रतभङ्गं दर्शयति—

आतां, राग लोभ वगैरे कषायांच्या संबंधामुळें— दुसऱ्याचें स्वामित्व ज्या पदार्थावर आहे असा कोणताही ( गवत वगैरे देखील ) पदार्थ, त्यावर ज्याची मालकी असेल त्यानें दिल्यावांचून आपण घेतला असतां व दुसऱ्यास दिला असतां अचौर्यव्रताचा ( चोरी न करणें ह्या व्रताचा ) नाश होतो असें सांगतात.

संक्लेशाभिनिवेशेन ।
तृणमप्यन्यभर्तृकम् ॥
अदत्तमाददानो वा ।
ददानस्तस्करो ध्रुवम् ॥ ४७ ॥

टीका—ध्रुवं निश्चितं भवति । कोऽसौ पुरुषः । कीदृशः तस्करश्चौरः । किं कुर्वाणः आददानः आत्मसात्कुर्वन् । ददानो वा परस्मै प्रयच्छन् । किं तत् तृणमपि किं पुनः सुवर्णादिकं । किंविशिष्टं अन्यभर्तृकं अन्यः स्वस्मात्परो भर्ता स्वामी यस्य तदन्यभर्तृकमन्यदीयमित्यर्थः । किंविशिष्टं सत् अदत्तं तत्स्वामिना अवितीर्णं । केन संक्लेशाभिनिवेशेन रागाद्यावेशेन । एतेनेदमुक्तं भवति– प्रमत्तयोगे सत्येवादत्तस्यादाने दाने वा चौर्यं स्यान्नान्यथा ॥

**अर्थ—दुसऱ्याचें स्वामित्व ज्यावर आहे असा तृण वगैरे अतिस्वल्प देखील पदार्थ, जो श्रावक– त्या पदार्थाच्या मालकाच्या आज्ञेवांचून 'आपल्यास त्या पदार्थाची गरज आहे' अशा लोभानें, अगर दुसऱ्या कोणत्याही कारणानें– घेईल अथवा दुसऱ्याला देईल तर तो खचित चोर होय. व त्याच्या अस्तेयाणुव्रताचा ( चोरी न करणें ह्या नियमाचा ) नाश होतो. ह्यावरून– मालकाच्या आज्ञेशिवाय त्याचा पदार्थ घेणारा जो मनुष्य त्याच्या मनांत लोभ प्रेम वगैरे कषाय, तो पदार्थ घेण्याचे वेळीं उत्पन्न झाले असतील तरच ती चोरी होते. जर तसें नसेल ( प्रमादयोग नसेल ) तर ती चोरी होत नाहीं; असें सिद्ध होतें.**

निधानादिधनं राजकीयत्वसमर्थनेन व्रतयन्नाह—

**आतां; ठेव किंवा जमिनींत अगर दुसरे कोठेंही ठेवलेल्या द्रव्यावर त्याचा योग्य मालक नसल्यास राजाची मालकी असते असें सांगतात.**

नास्वामिकमिति ग्राह्यं ।
निधानादिधनं यतः ॥

धनस्यास्वामिकस्येह ।

दायादो मेदिनीपतिः ॥ ४८ ॥

टीका—न ग्राह्यं नादेयमचौर्याणुव्रतिना । किं तत् निधानादिधनं नदीगुहाविवराकरादिस्थितं द्रव्यं । कथं कृत्वा अस्वामिकमिति नास्य कश्चित् स्वामीति परस्वं न भवतीति सङ्कल्प्य । कुत इत्याह यतो यस्मात् । भवति । कोऽसौ मेदिनीपतिः राजा । कीदृशः दायादः साधारणः स्वामी । कस्य धनस्य । कीदृशस्यास्वामिकस्य स्वामिरहितस्य । क्व इहलोके ॥

अर्थ—ज्या द्रव्याचा स्वामी कोण आहे हें माहीत नाहीं असें जमीनींत पुरून ठेविलेलें द्रव्यही आपण घेऊं नये. कारण ज्या द्रव्याचा मालक कोणीच मिळत नाहीं त्या द्रव्याचा राजा हा मालक असतो.

स्वामिसांशयिके स्वधनेऽपि नियमं कारयन्नाह—

आतां; आपलें द्रव्य असूनहि ह्या धनाचे मालक आपण आहोंत किंवा नाहीं ह्याविषयीं संशय उत्पन्न झाला असतां, तें द्रव्य देखील घेऊं नये, असा नियम करण्याचें सांगतात.

स्वमपि स्वं मम स्याद्वा ।

न वेति द्वापरास्पदम् ॥

यदा तदाऽऽदीयमानं ।

व्रतभङ्गाय जायते ॥ ४९ ॥

टीका—जायते सम्पद्यते । किं तत् स्वमपि स्वं आत्मीयमपि द्रव्यं । कस्मै व्रतभङ्गाय अचौर्यव्रतभङ्गं करोतीत्यर्थः । किं क्रियमाणं दीयमानं आकरप्रश्लेषादादीयमानं च । कदा तदा

तस्मिन् काले । यदा यस्मिन् काले भवति । किं तत् स्वमपि स्वं । किंविशिष्टं द्वापरास्पदं संशयस्थानं । कथं कृत्वा इदं धनं मम स्याद्भवेद्वा न वा स्यादित्येवं ॥

**अर्थ**—ज्या द्रव्याविषयीं हें द्रव्य आपलें आहे किंवा नाहीं असा संशय येतो, तें द्रव्य आपण घेतलें असतां, अथवा दुसऱ्याला दिलें असतां त्या घेण्यानें व देण्यानें अचौर्यव्रताचा नाश होतो.

अचौर्याणुव्रतातिचारप्रहाणार्थमाह—

आतां; अचौर्यव्रताचे जे अतीचार त्यांचा व्रती श्रावकानें त्याग करावा ह्मणून सांगतात—

चोरप्रयोगचोराहृत- ।
ग्रहावधिकहीनमानतुलम् ॥
प्रतिरूपकव्यवहृतिं ।
विरुद्धराज्येऽप्यतिक्रमं जह्यात् ॥ ५० ॥

**टीका**—जह्यात् त्यजेत् । कोऽसावचौर्याणुव्रती । किं तत् चोरप्रयोगाद्यतिचारपञ्चकमिति समन्वयः । तत्र चोरप्रयोगः—चोरयतः स्वयमन्येन वा चोरय त्वमिति चोरणक्रियायां प्रेरणं । प्रेरितस्य वा साधु करोषीत्यनुमननं । कुशिकाकर्तरिकाघर्घरिकादिचोरोपकरणानां वा समर्पणं विक्रयणं वा । अत्र च यद्यपि चौर्यं न करोमि न कारयामीत्येवं प्रतिपन्नव्रतस्य चोरप्रयोगो व्रतभङ्ग एव तथाऽपि किमधुना यूयं निर्व्यापारास्तिष्ठथ, यदि वो भक्तादिकं नास्ति तदाऽहं तद्ददामि, भवदानीतमोषस्य वा यदि क्रेता नास्ति तदाऽहं विक्रेष्ये इत्येवंविधवचनैश्चौरान् व्यापारयतः स्वकल्पनया तद्व्यापारणं परिहरतो व्रतसापेक्षस्यासावतिचारः ॥

चौराहृतग्रहः– अप्रेरितेनाननुमतेन च चौरेणानीतस्य कनकवस्त्रादेरादानं मूल्येन मुदिकया वा । चौरानीतं च काणक्रयेण मुदिकया वा प्रच्छन्नं गृह्णँश्चौरो भवति ततश्चौर्यकरणाद्व्रतभङ्गः । वाणिज्यमेव मया क्रियते न चौरिकेत्यध्यवसायेन व्रतसापेक्षत्वादभङ्ग इति भङ्गाभङ्गरूपोऽतिचारः ॥ अधिकहीनमानतुलं– मानं प्रस्थादि हस्तादि च । तुला उन्मानं । मानं च तुला च मानतुलं, अधिकं च हीनं चाधिकहीनं तच्च तन्मानतुलं च, अधिकमानं हीनमानं, अधिकतुला हीनतुला चेत्यर्थः । तत्र न्यूनेन मानादिनाऽन्यस्मै ददाति, अधिकेनात्मनो गृह्णातीत्येवमादिकूटप्रयोगो हीनाधिकमानोन्मानमित्यर्थः ॥ प्रतिरूपकव्यवहृतिः– प्रतिरूपकं सदृशं व्रीहीणां पलंजि, घृतस्य वसा, हिङ्गोः खदिरादि वेष्टस्तैलस्य मूत्रं, जात्यसुवर्णरूप्ययोर्युक्तसुवर्णरूप्ये, इत्यादिप्रतिरूपकेण व्यवहृतिर्व्यवहारो व्रीह्यादिषु पलंज्यादि प्रक्षिप्य तद्विक्रयणं । एतत् द्वयं परधनग्रहणरूपत्वाद्भङ्ग एव । केवलं खात्रखननादिकमेव चौर्यं प्रसिद्धं । मया तु वणिक्कलैव कृतेति भावनया व्रतरक्षणोद्यतत्वादतिचार एवेति ॥

विरुद्धराज्येऽप्यतिक्रमः । अपिः समुच्चये । विरुद्धं विनष्टं विगृहीतं वा राज्यं राज्ञः पृथ्वीपालनोचितं कर्म विरुद्धराज्यं छलभङ्गः पराभियोगो वेत्यर्थः । तत्रातिक्रम उचितन्यायादन्येनैव प्रकारेणार्थस्य दानग्रहणं । विरुद्धराज्येऽल्पमूल्यलभ्यानि महार्घ्याणि द्रव्याणि इति प्रयततः । अथवा विरुद्धयोरर्थाद्राज्ञो राज्यं नियमिता भूमिः कटकं वा विरुद्धराज्यं तत्र । षष्ठीसप्तम्योरर्थं प्रति भेदाभावात् । तस्यातिक्रमो व्यवस्थालङ्घनं । व्यवस्था च परस्परविरुद्धराजकत्वे एव । तल्लघनं चान्यतरराज्यनिवासिन इतरराज्ये प्रवेशः । इतरराज्यनिवासिनो वा अन्यतरराज्ये प्रवेशः । विरुद्धराज्यातिक्रमस्य च यद्यपि स्वस्वामिनोऽननुज्ञातस्याद‌त्तादानलक्षणयोगेन तत्कारिणां च

चौर्यदण्डयोगेन चौर्यरूपत्वाद्व्रतभङ्ग एव । तथाऽपि विरुद्धराज्यातिक्रमं कुर्वता मया वाणिज्यमेव कृतं न चौर्यमिति भावनया व्रतसापेक्षत्वाल्लोके च चोरोऽयमिति व्यपदेशाभावादतिचारता स्यात् ॥ अथवा चोरप्रयोगादयः पञ्चाप्येते व्यक्तचौर्यरूपा एव । केवलं सहकारादिना वा प्रकारेण क्रियमाणास्तेऽतिचारतया व्यपदिश्यन्ते। न चैते राज्ञां तत्सेवकादीनां वा न सम्भवन्तीति वाच्यम् । यतः प्रथमो द्वितीयः स्पष्ट एव । तृतीयस्तुर्यश्च यदा राजा भाण्डागारे हीनाधिकमानोन्मानं द्रव्याणां विनिमयं च कारयति तदा राज्ञोऽप्यतिचारौ स्तः ॥ विरुद्धराज्यातिक्रमस्तु यदा सामन्तादिः कश्चित् स्वस्वामिनो वृत्तिमुपजीवति तद्विरुद्धस्य च सहायो भवति तदा अस्यातिचारः स्यात् । सोमदेवपण्डितस्तु मानन्यूनत्वाधिकत्वेन द्वावतीचारौ मन्यमान इदमाह— मानवन्न्यूनताधिक्ये स्तेनकर्म ततो ग्रहः ॥ विग्रहे संग्रहोऽर्थस्यास्तेयस्यैते निवर्तकाः ॥

अर्थ—अस्तेयाणुव्रती श्रावकानें चौरप्रयोग, चोराहृतग्रह, अधिकहीनमानतुला, प्रतिरूपकव्यवहृति आणि विरुद्धराज्यातिक्रम हे पांच अतीचार अवश्य सोडावेत.

१ "चौरप्रयोग" ह्मणजे आपण स्वतः अगर दुसऱ्या कोणाकडून एखाद्यास तूं चोरी कर अशी प्रेरणा करणें. तसेंच चोरी करण्याविषयीं प्रेरणा केलेली असेल त्याला "हें तूं फार चांगलें करतोस" असें ह्मणून त्याच्या त्या चोरीच्या कृत्यास अनुमोदन देणें किंवा देवविणें, ह्यास चौरप्रयोग असें ह्मणतात. आतां येथें— चोरी मी स्वतः करणार नाहीं व करविणार नाहीं असें व्रत ज्यानें स्वीकारिलें आहे, त्यानें वर सांगितलेला चौर—

प्रयोग केल्यानें त्या व्रताचा नाशच होतो मग ह्या चौरप्रयोगास अतीचार असें कसें ह्मणतां ? अशी शंका जरी उत्पन्न होते, तरी "तुह्मी कांहीं न करितां उगीच स्वस्थ कां बसला ? जर तुह्मांस कांहीं खावयास नसेल, तर मी देतों, तुह्मी आणलेले जिन्नस जर कोणी विकत घेत नसतील तर ते मी घेईन." अशा प्रकारच्या भाषणांनीं चोरांना दुष्कृत्य करण्याविषयीं प्रवृत्त करणारा, [ ह्या वरील भाषणांत चोरी करा असें स्पष्ट जरी सांगितलें नाहीं तरी ज्यापेक्षां हें भाषण चोरांस उद्देशून आहे; त्यापेक्षां, तात्पर्यानें चोरी करण्याविषयीं प्रवृत्त करणें सिद्ध होतें. ] व आपण व्यापाराकरितां जिन्नस आणावयास सांगितले आहेत अशी समजूत आपणच करून घेणारा असा जो श्रावक असेल त्याचाही वरील चौरप्रयोग अतिचारस्वरूप होतो, व्रतभंग करणारा होत नाहीं; असें तात्पर्य आहे.

२ 'चौराहृतग्रह' ह्मणजे आपण ज्याला चोरी करण्याबद्दल सांगितलें नाहीं किंवा अनुमोदनही दिलेलें नाहीं अशा चोरानें आणलेले सुवर्ण, वस्त्र वगैरे पदार्थ विकत घेणें. हे चोरानें आणलेले पदार्थ अधिक किमतीचे असून कमी किमतीनें घेतले असतां, तसेंच ते पदार्थ गुप्तपणें घेतले असतां घेणारा चोर ठरतो, ह्मणून ह्या अतीचारांत चोरीही संभवते व व्यापारही संभवतो. त्याकरितां ज्या वेळीं ह्या चौराहृतग्रहरूप अतीचारांत वर सांगितल्याप्रमाणें चोरी संभवते त्यावेळीं अचौर्यव्रताचा नाश होतो, आणि ज्यावेळीं व्यापार संभवतो

त्यावेळीं व्रताचा भंग न होतां, केवळ अतीचारच होतो असें समजावें.

३ 'अधिकहीनमानतुला' ह्मणजे कोणताही पदार्थ दुसऱ्याला देण्याचे वेळीं लहान मापानें देणें व दुसऱ्याकडून घेण्याचे वेळीं मोठ्या मापानें घेणें, तसेच पदार्थ द्यावयाचे वेळीं हलक्या वजनानें देणें व घ्यावयाचे वेळीं जड वजनानें घेणें हा 'अधिकहीनमानतुला' नांवाचा अतिचार असें समजावें.

४ 'प्रतिरूपकव्यवहृति' ह्मणजे कोणत्याही पदार्थांत त्याच्यासारखाच दिसणारा असा दुसरा एखादा (कमी किमतीचा) पदार्थ मिश्र करून ज्यास्त दरानें विकणें. जसें —भातांत फोल मिसळणें, तुपांत तेल, हिंगांत कात वगैरे न समजेल असा पदार्थ मिसळणें, तेलांत मूत्र मिसळणें, तसेंच उत्तम सुवर्णांत व रुप्यांत कमी प्रतीचें सोनें व रुपें मिसळणें; आणि अशाप्रकारें तयार केलेला माल उंची दरानें विकणें. ह्यांतही दुसऱ्याच्या अडचणीच्या वेळीं त्यास अशा प्रकारचा माल देऊन त्याचें द्रव्य हरण केल्या-मुळें अचौर्यव्रताचा नाश संभवतो. पण चोरी करणें ह्मणजे 'दुसऱ्याचें घर फोडून माल नेणें' अशी वास्तवीक समजूत असल्यामुळें, अचौर्यव्रताचा नाश होईल ह्मणून जपत असलेल्या श्रावकानें वर लिहिल्याप्रमाणें मिश्रण करून केवळ व्यापाराच्या बुद्धीनें क्रयविक्रय केला असतां मात्र व्रतनाश न होतां अतीचार होतो. याप्रमाणें हाही अती चार एखादे प्रसंगीं व्रताचा नाश करणारा होतो व एखाद्या प्रसंगीं अतिचारस्वरूप होतो असा ह्यांत सूक्ष्म भेद आहे.

५ " विरुद्धराज्यातिक्रम " ह्मणजे मूल्यवान् वस्तु कमी किमतीनें बलात्कारानें घेणें. एखाद्या राजाचे अधिकार काढून घेतले असतां, अथवा एखादा राजा दुसऱ्या बलाढ्य शत्रूच्यां ताब्यांत सांपडल्यामुळें आपले योग्य अधिकार चालविण्यास असमर्थ झाला असतां, त्यावेळीं त्या देशांत योग्य नियामक कोणी नसल्यानें व सर्व लोक भ्यालेले असल्यानें, तसेंच शत्रूच्या लोकांचें बळ अधिक झालें असल्यानें, पाहिजे त्यानें वाटेल तसें करावें व जो बलवान् असतो, तो दुर्बलाजवळचे पदार्थ पाहिजे त्या तऱ्हेनें काढून घेतो, असाही प्रसंग असतो त्यावेळीं मूल्यवान् पदार्थ थोड्या किमतीनें ( बलात्कारानें ) घेतां येतो. अथवा एकमेकांशीं द्वेष करीत असलेल्या राजांच्या सरहद्दी किंवा त्यांचें सैन्य ह्यासंबंधानें त्यांनीं ( त्या राजांनीं ) केलेल्या नियमांचें अतिक्रमण करणें. ( ते नियम न मानतां त्या नियमाच्या उलट वागणें. ) उदाहरण— परस्पराशीं द्वेष करणाऱ्या राजाच्या देशांत तिसऱ्या राज्यांतील मनुष्यानें [ कांहीं दुर्बुद्धीनें ] जाणें, अथवा ह्या दोन राज्यांतील मनुष्यानें तिसऱ्या राज्यांत जाणें. आतां येथें—उगीच एखाद्याच्या राज्यांत दुसऱ्यानें जाणें ह्यापासून कांहींच दोष होत नसल्यानें तें जाणें कांहीं तरी दुष्ट इच्छेनेंच असलें पाहिजे असें तात्पर्यानें सिद्ध होतें. आणि त्यांतही ' दुष्ट इच्छा ' शब्दानें अनेक अर्थांचा जरी समावेश होतो, तरी प्रकृतप्रसंगाला ( अचौर्याणुव्रताचा अतीचार सांगावयाचा आहे ह्या प्रसंगाला ) अनुसरून ती दुष्ट इच्छा ह्मणजे दुसऱ्यानें दिल्यावांचून घेण्याविषयींच असली

पाहिजे हेंही सिद्ध होतें. मग जर एखाद्यानें आपल्या राजाच्या आज्ञेवाचून दुसऱ्याच्या राज्यांत जाऊन तेथील वस्तू हरण केल्या तर त्यास चोरी केल्याचाच अपराध लागूं पडतो तेव्हां अशा रीतीनें द्रव्य हरण होतें तें कोणी दिल्यावांचून होतें. ह्मणून अचौर्यव्रताचा भंग होणेंच योग्य आहे; मग ह्यास अतीचार कसें ह्मणावें अशी एक शंका उत्पन्न होते. त्याचें समाधान असें कीं,

वर सांगितल्याप्रमाणें जर दुष्ट इच्छा नसेल व त्यामुळें परद्रव्यापहार होत असेल, तर व्रतभंग अवश्य होईल. परंतु 'मी हा व्यापारच करीत आहे, चोरी करीत नाहीं' अशीच ज्याची वास्तवीक समजूत आहे व अशा समजुतीनेंच जो मनुष्य परराज्यांत वर सांगितलेल्या प्रसंगीं जाऊन स्वल्पमूल्यानें मोठ्या किमतीचे पदार्थ विकत घेतो, त्यास 'चोर' असें समजण्याचा लोकांत संप्रदाय नसल्यानें तो चोर ठरत नाहीं. ह्मणून अशा कृत्यानें त्याचा व्रतभंग होत नाहीं अतीचार मात्र होतो. ह्मणून अशा प्रसंगीं त्या कृत्यास अतीचार असें समजावें. किंवा 'चौरप्रयोग' वगैरे पांचही क्रिया ह्या चोरीचाच एक प्रकार आहे, परंतु त्या जर विचार न करितां सहज घडतील तर तो अतीचार असें समजावें; व विचारपूर्वक समजून उमजून घडतील एर ती चोरी असेंच समजावें.

आतां हे वर सांगितलेले अचौर्याणुव्रताचे पांच प्रकारचे अतीचार राजा किंवा राजसेवक यांचे ठिकाणीं मुळींच संभवत नाहींत; असें कित्येकांचें ह्मणणें

आहे, तें अगदीं बरोबर नाहीं. कारण पहिले दोन अतीचार ( चौरप्रयोग व चौरात्दृतग्रह ) हे राजा किंवा राजसेवक ह्यांचे ठिकाणीं संभवतात हें वर केलेल्या अर्थावरून सहज समजण्यासारखें आहे ह्मणून त्याबद्दल मुळींच शंका घेतां येत नाहीं.

आतां पुढचे दोन अतीचार ( अधिकहीनमानतुला व प्रतिरूपकव्यवत्दृती ) हे दोनीही राजाचे ठिकाणीं संभवतात. तें असें— ज्यावेळीं राजा आपल्या जामदारखान्यांतील वस्तूंचें मोजमाप करितो किंवा सेवकांकडून 'अमूक रीतीनें करा' असें सांगून करवितो त्यावेळीं 'अधिकहीनमानतुला' हा अतीचार राजाच्या हातून घडणें व राजसेवकांच्या हातून घडणें अगदीं शक्य आहे. आणि ज्यावेळीं राजा आपल्या वस्तू मोबदला देऊन, दुसऱ्या वस्तू घेतो, त्यावेळीं प्रतिरूपकव्यवहृती हा अतीचार त्याच्या हातून घडणें संभवनीय आहे.

आतां पांचवा विरुद्धराज्यातिक्रम हा अतीचार होण्याचा प्रसंग असा येतो कीं,- ज्यावेळी एखादा मांडलिक राजा- ज्या राजाकडील देणगीचा उपभोग करीत असेल त्या राजाच्या विरुद्ध असलेल्या दुसऱ्या एखाद्या राजाला सहाय करण्यास प्रवृत्त होतो, त्या प्रसंगाला त्या मांडलिक राजाची खोड मोडण्याकारितां त्याच्यावर तो मांडलिक राजा ज्याच्या ताब्यांतील असेल असा मुख्य राजा चालून गेला असतां त्यावेळीं त्या मुख्यराजाच्या हातून विरुद्धराज्यातिक्रम हा अतीचार होणें शक्य आहे.

ह्याप्रमाणें वरील शंकेचा निरास होतो. सोमदेवाचार्यांनीं ह्या पांच प्रकारच्या अतीचारापैकीं अधिकहीनमानतुला ह्या एका अतीचारांत मानन्यूनता व मानाधिक्य असे दोन अतीचार निराळे मानिले आहेत. त्याबद्दल त्यांची कारिका अशी आहे—

मानवन्न्यूनताऽऽधिक्ये स्तेनकर्म ततो ग्रहः ॥
विग्रहो संग्रहार्थश्चास्तेयस्यैते निवर्तकाः ॥ १ ॥

अर्थ—ज्या पदार्थाचें मोजणें किंवा तोलणें हें परिमाण आहे त्या पदार्थाच्या मोजण्यांत अथवा तोलण्यांत दुसऱ्यास देतांना कमीपणा करणें, तसेंच ( आपण घेतांना ) अधिक वजनानें अथवा मापानें घेणें, चोरी करविणें, चोरापासून त्यांनीं चोरून आणिलेले पदार्थ विकत घेणें व द्रव्य मिळविण्याकरितां युद्ध करणें हीं सर्व अचौर्याणुव्रताचे अतीचार होत.

अथ स्वदारसन्तोषाणुव्रतस्वीकारविधिमाह—

आतां स्वदारसंतोषव्रत करण्याविषयीं सांगतात.

प्रतिपक्षभावनैव न ।
रतौ रिरंसारुजि प्रतीकारः ॥
इत्यप्रत्ययितमनाः ।
श्रयत्वहिंस्रः स्वदारसन्तोषम् ॥ ५१ ॥

टीका—श्रयतु स्वीकरोतु । कोऽसौ अहिंस्रः ईषद्धिंसनशीलोऽणुव्रती । कं स्वदारसन्तोषं स्वदारेषु स्वभार्यायां स्वदारैर्वा सन्तोषो मैथुनसञ्ज्ञावेदनाशान्त्या देहमनसोः स्वास्थ्यापादनं । किंविशिष्टः

सन्। अप्रत्ययितमनाः प्रत्ययो विश्वासः प्रत्ययः सञ्जातोऽस्येति प्रत्ययितं न प्रत्ययितमप्रत्ययितं मनो यस्यासावप्रत्ययितमना असञ्जातविश्वासचित्त इत्यर्थः। कथं इति अनेन सदुपदेशप्रकारेण। तमेव दर्शयति- भवति। कोऽसौ प्रतीकारः प्रशमनोपायः। कस्यां रिरंसारुजि योन्यादौ रन्तुमिच्छारूपायां वेदनायां। किं प्रतीकारः प्रतिपक्षभावनैव ब्रह्मचर्यस्य प्रागुक्तविधिना पुनः पुनश्चेतसि सन्निवेशनमेव। न पुनर्भवति तत्र प्रतीकारः। किं रतिः स्त्रीसम्भोगः॥

अर्थ—ब्रह्मचर्य हेंच स्त्रीसंभोगाविषयीं उत्पन्न होणाऱ्या इच्छेचा नाश करण्याला समर्थ आहे. वारंवार स्त्रीसंभोग केल्यानें स्त्रीसंभोगेच्छा केव्हांही निवृत्त व्हावयाची नाहीं असा ज्याच्या अंतःकरणाचा निश्चय झालेला नाहीं, अशा स्थूलहिंसाणुव्रत करणाऱ्या श्रावकानें आपल्या विवाहितस्त्रीच्या योगानें मैथुनसंज्ञेपासून होणारे क्लेश घालवून देहाचा व मनाचा स्वस्थपणा अवश्य संपादन करावा.

स्वदारसन्तोषिणं व्याचष्टे—

आतां, स्वदारसंतोषी कोणाला ह्मणावें, तें सांगतात.

सोऽस्ति स्वदारसन्तोषी।
योऽन्यस्त्रीप्रकटस्त्रियौ॥
न गच्छत्यंहसो भीत्या।
नान्यैर्गमयति त्रिधा॥ ५२॥

टीका —अस्ति भवति। कोऽसौ स गृहाश्रमी। कीदृशः स्वदारसन्तोषी स्वदारेषु निजधर्मपत्न्यां सन्तुष्यति मैथुनसञ्ज्ञां प्रतिचिकीर्षयन् भजतीत्येवंव्रतः। स्वदारेषु सन्तोषोऽस्यास्तीति वा। यः

किं यः न गच्छति न भजति। के अन्यस्त्रीप्रकटस्त्रियौ अन्यस्त्री परदाराः परिगृहीता अपरिगृहीताश्च। तत्र परिगृहीताः सस्वामिकाः। अपरिगृहीता स्वैरिणी प्रोषितभर्तृका कुलाङ्गना वा अनाथा। कन्या तु भाविभर्तृकत्वात्पित्रादिपरतन्त्रत्वाद्वा सनाथेत्यन्यस्त्रीतो न विशिष्यते। प्रकटस्त्री वेश्या। अन्यस्त्री च प्रकटस्त्री च अन्यस्त्रीप्रकटस्त्रियौ। ते द्वे अपि यो न भजति। कया भीत्या भयेन। कस्मात् अंहसः पापात् न राजादेः। नापि यो गमयति उपभोजयति। के ते द्वे। कैः कर्तृभिः अन्यैः परदारादिलम्पटैः। कथं त्रिधा मनोवाक्कायैः कृतकारिताभ्यामनुमत्याऽपि वा। तदेतद्ब्रह्माणुव्रतं निरतिचारं मद्यामिषक्षौद्रपञ्चोदुम्बरविरतिलक्षणाष्टमूलगुणान् प्रतिपन्नवतो विशुद्धसम्यग्दृशः श्रावकस्योपदिश्यते। यस्तु स्वदारवत्साधारणस्त्रियोऽपि व्रतयितुमशक्तः परदारानेव वर्जयति सोऽपि ब्रह्माणुव्रतीष्यते। द्विविधं हि तद्व्रतं। स्वदारसन्तोषः परदारवर्जनं चेति। एतच्चान्यस्त्रीप्रकटस्त्रियाविति स्त्रीद्वयसेवाप्रतिषेधोपदेशाल्लभ्यते। तत्राद्यमभ्यस्तदेशसंयमस्य नैष्ठिकस्येष्यते। द्वितीयं तु तदभ्यासोन्मुखस्य। तदाह श्रीसोमदेवपण्डितः— वधूवित्तस्त्रियो मुक्त्वा सर्वत्रान्यत्र तज्जने॥ माता स्वसा तनूजेति मतिर्ब्रह्म गृहाश्रमे॥ यस्तु— पंचुंबरसहियाइं सत्त वि वसणाइ जो विवज्जेइ। सम्मत्तविसुद्धमइ सो दंसणसावओ भणिओ॥ इति वसुनन्दिसैद्धान्तिमतेन दर्शनप्रतिमायां प्रतिपन्नस्तस्येदं॥ तन्मतेनैव व्रतप्रतिमां बिभ्रतो ब्रह्माणुव्रतं स्यात् तद्यथा— पव्वेसु इत्थिसेवा अणंगकीडा सया विवज्जेइ॥ थूळअड वंभयारी जिणेहिं भणिदो पवयणम्मि॥ यस्तु "सम्यग्दर्शनशुद्धः संसारशरीरभोगनिर्विण्णः। पञ्चगुरुचरणशरणो दर्शनिकस्तत्वपथगृह्य इति"। स्वामिमतेन दर्शनिको भवेत्तस्येदं ब्रह्माणुव्रतमतिचारवर्जनार्थमेवात्रानूद्यते॥

अर्थ—जो श्रावक पापाच्या भीतीमुळें परस्त्री व वेश्या ह्यांचा उपभोग मन, वाणी व शरीर ह्या तीहींच्या योगानें आपण करीत नाहीं व दुसऱ्याकडून करवीत नाहीं, तो 'स्वदारसंतोषी' असें समजावें. (ह्या श्लोकांत 'अन्यस्त्री' (परस्त्री) असें पद आहे ती अन्यस्त्री परिगृहीत व अपरिगृहीत अशी दोन प्रकारची आहे. जी सभर्तृका असते ती परिगृहीत होय व जी [सभर्तृका असूनही] पतीच्या ताब्यांत न राहतां यथेच्छ वागणारी, किंवा जिचा पती फार दिवस गांवाला गेला असून त्याचा शोध लागत नाहीं अशी जी असते ती 'अपरिगृहीता' समजावी. जिचा विवाह झालेला नाहीं अशी कन्या जरी सभर्तृका नाहीं तथापि ती पिता, बंधू, माता, वगैरेंच्या आधीन अशी असल्यामुळें तिला 'परस्त्री' समजणेंच योग्य आहे.

अथ यद्यपि गृहस्थस्य प्रतिपन्नं व्रतमनुपालयतो न तादृशः पापबन्धोऽस्ति तथापि यतिधर्मानुरक्तत्वेन तत्प्राप्तेः प्राग्गार्हस्थ्येऽपि कामभोगविरक्तः सन् श्रावकधर्मं प्रतिपालयति तं वैराग्यकाष्ठा-मुपनेतुं सामान्येनाब्रह्मदोषानाह—

आतां; स्त्रीसंभोगांत दोष आहेत असें सांगतात. ह्या ठिकाणीं "स्वदारसंतोषाणुव्रत गृहस्थाश्रमी श्रावकानें अवश्य करावें' असें पूर्वीं विधान केलें आहे. जर स्त्रीसंभोगांत दोष आहेत, तर मग स्वदारसंतोषाणुव्रताचें विधान कसें केलें" अशी शंका येते. त्याचें समाधान असें कीं, ज्यापेक्षां स्वदारसंतोषाणुव्रताचें विधान केलें आहे, त्यापेक्षां ज्या गृहस्थाश्रमी श्रावकानें ब्रह्मचर्या-णुव्रत स्वीकारलेलें असेल, त्याला स्वस्त्रीच्या उपभोगानें

फारसा पापबंध नाहीं, हें तात्पर्यानें सिद्ध होतें, तेव्हां ह्या दोषकथनाचा संबंध स्वदारसंतोषाणुव्रती श्रावकाकडे जरी नाहीं, तथापि ज्या गृहस्थश्रावकांना यतिधर्मा-विषयीं भक्ती उत्पन्न झाली असेल, ते यतिधर्म स्वीकारण्याच्या पूर्वीं गृहस्थाश्रमामध्यें असतांही कामभोगाविषयीं विरक्त होऊनच श्रावकधर्माचें परिपालन करीत असतात. अशा प्रकारचे जे श्रावक असतील त्यांचें मूळचेंच असलेलें कामभोगाविषयींचें ( स्त्रीसंभोगाविषयींचें ) वैराग्य अधिक वृद्धिंगत व्हावें आणि ह्मणूनच सामन्यतः स्त्रीसंभोगांत दोष आहेत असें सांगावयाचें आहे, असें समजावें; ह्मणजे वरील शंका उत्पन्न होण्यास मुळींच अवकाश रहात नाहीं. या उद्देशानेंच स्त्रीसंभोगांत दोष आहेत, ह्मणजे स्त्रीसंभोग दुष्ट असल्यामुळें तो सुखकर नाहीं, असें सांगतात.

सन्तापरूपो मोहाङ्ग- ।
सादतृष्णानुबन्धकृत् ॥
स्त्रीसम्भोगस्तथाऽप्येष ।
सुखं चेत्का ज्वरेऽक्षमा ॥ ५३ ॥

टीका— भवति । कोऽसौ स्त्रीसम्भोगः । कीदृशः सन्तापरूपः स्त्रीसम्पर्कस्य पित्तप्रकोपहेतुत्वात्सन्तापयतीति सन्तापः सन्तापकरं रूपं यस्य स सन्तापरूपः । ज्वरपक्षे तु सन्तपनं सन्तापः संज्वरः स एव रूपमस्येति विग्रहः । तथा चोक्तं सन्तापात्कोपजो ज्वर इति । पुनः कीदृशः मोहेत्यादि— मोहो हिताहितविवेक-विकलत्वं, अंगसादः शरीरनिःसहत्वं तृष्णानुबन्धः तर्षाविच्छेदः

पक्षे पिपासासातत्यं मोहश्चांगसादश्च तृष्णानुबन्धश्च मोहांगसादतृष्णानुधास्तान् करोति । यद्यप्येवंविध एष तथाऽपि सुखं चेत् मन्यसे भो आत्मन् तदा न काऽपि त्वया कार्या । काऽसौ अक्षमा । क्व ज्वरे ज्वरोऽपि सुखं मन्तव्य इति भावः । तथा चोक्तमार्षे– स्त्रीभोगो न सुखं चेतस्सम्मोहाद्गात्रसादनात् । तृष्णानुबन्धात्सन्तापरूपत्वाच्च यथा ज्वरः ॥ १ ॥

अर्थ— स्त्रीसंभोग हा– ( स्त्रीसंसर्गानें पित्ताची वृद्धि होते व पित्तापासून शरीराचा दाह होतो ह्मणून )– संताप उत्पन्न करणारा आहे. तसेंच तो मोह करतो, ह्मणजे चांगलें कोणतें व वाईट कोणतें ह्याविषयीं विचार सुचूं देत नाहीं. देहाला कृशपणा आणतो, व त्याचें कितीहि सेवन केलें तथापि तो अधिकच इच्छा वाढवितो. ह्मणून हे जीवा! ह्याप्रमाणें दुष्ट असलेला स्त्रीसंभोग जर तुला सुखकर वाटत असेल, तर मग तुला ज्वर आला असतां तो जाण्याकरितां औषध घेऊं नको. कारण ज्वरहि संताप करतो, मोह ह्मणजे भ्रांति उत्पन्न करितो, अंग कृश करितो व पाणी पिण्याची इच्छा वाढवितो. तेव्हां स्त्रीसंभोगापासून ज्या तऱ्हेचें दुःख होतें त्याच तऱ्हेचें दुःख ज्वरापासून होतें. मग जर दोहोंपासून सुख नसून दुःख सारखेंच आहे, तर स्त्रीसंभोगाविषयीं जशी तूं इच्छा करतोस त्याप्रमाणें ज्वराविषयींहि तुला इच्छा उत्पन्न होणें योग्य आहे.

परदाररतौ सुखाभावमुपदिशति—

आतां परस्त्रीसंभोगांतही सुख नाहीं; असें युक्तीनें सांगतात.

समरसरसरङ्गोद्गम- ।
मृते च काचित्क्रिया न निर्वृतये ॥
स कुतः स्यादनवस्थित- ।
चित्ततया गच्छतः परकलत्रम् ॥ ५४ ॥

टीका— न च भवति । काऽसौ क्रिया प्रवृत्तिः । किंविशिष्टा काचित् आलिंगनचुम्बनादिका । कस्यै निर्वृतये सुखार्थं । कथं ऋते विना । कं समरसरसरंगोद्गमं । समसमायोगं समानरतिमित्यर्थः । कुतः स्यान्न कुतश्चिद्भवेदित्यर्थः । कोऽसौ समरसरसरंगोद्गमः । कस्य पुंसः । किं कुर्वतो गच्छतः सेवमानस्य । किं तत् परकलत्रं । कया अनवस्थितचित्ततया स्वपरजनशंकातंकाकुलितमनस्कतया ॥

अर्थ—समागमकालीं एकमेकाविषयीं विलक्षण प्रेम असलेल्या स्त्रीपुरुषांच्या अंतःकरणांत एकमेकांच्या समागमाची उत्कट इच्छा उत्पन्न झाल्यावांचून स्त्रीपुरुषांच्या समागमापासून केव्हांही सुख व्हावयाचें नाहीं. मग असें प्रेम व अशी इच्छा, “ दुसरे कोणी आपल्याला पहातील ” अशा भीतीनें ज्याचें अंतःकरण व्यग्र झालें आहे अशा परस्त्री गमन करणाऱ्या पुरुषाच्या अंतःकरणांत कशी उत्पन्न व्हावी? मुळींच उत्पन्न होणें शक्य नाहीं.

स्वदाररतस्यापि भावतो द्रव्यतश्च हिंसासम्भवं नियमयति—

आतां; स्वस्त्रीच्या ठिकाणीं आसक्त असणाऱ्या श्रावकाकडून भावहिंसा व द्रव्यहिंसा ह्या दोनीही होतात, असें सांगतात.

स्त्रियं भजन् भजत्येव ।
रागद्वेषौ हिनस्ति च ॥
योनिजन्तून् बहून् सूक्ष्मान् ।
हिंस्रः स्वस्त्रीरतोऽप्यतः ॥ ५५ ॥

टीका— भवति । कोऽसौ नरः । किंविशिष्टो हिंस्रः । भावद्रव्याभ्यां हिंसनशीलः । किंविशिष्टोऽपि स्वस्त्रीरतोऽपि स्वस्त्रियां रतं मैथुनं यस्य सोऽपि विशेषतस्तु परस्त्रीरतः । तत्र रागद्वेषयोर्बहुतरत्वसम्भवात् । कस्मादत एतस्मात्कारणात् । यतो भजत्येव अवश्यमाश्रयति । कोऽसौ स्त्रियं भजन् स्त्रियं सेवमानः पुमान । कौ रागद्वेषौ प्रीत्यप्रीती । तथा हिनस्ति हन्ति । कान् योनिजन्तून् भगजीवान् । किंविशिष्टान् सूक्ष्मान् दुर्लक्ष्यान् । कति बहून् प्रचुरान् । वात्स्यायनोऽपि योनौ जन्तूनिच्छति तथा च तद्ग्रन्थः— रक्तजाः कृमयः सूक्ष्मा मृदुमध्यादिशक्तयः ॥ जन्मवर्त्मसु कण्डूतिं जनयन्ति तथाविधाम् ॥ १ ॥

अर्थ—स्त्रीचा उपभोग करणाऱ्या मनुष्याच्या अंतःकरणांत प्रेम व द्वेष हे दोन्ही विकार उत्पन्न होतात. तशीच योनीच्या ठिकाणीं उत्पन्न होणाऱ्या पुष्कळ सूक्ष्म जीवांची हिंसा त्यांच्याकडून घडते; ह्मणून, तो हिंसा करणाराच ठरतो. अंतःकरणांत स्वस्त्रीविषयीं जें प्रेम असतें व तिच्यासंबंधानेंच दुसरा कोणी इच्छा करील ह्मणून जो द्वेष असतो त्यास ‘भावहिंसा’ असें ह्मणतात. योनिजजंतूंचा जो उपभोगकालीं नाश होतो, ती ‘द्रव्यहिंसा’ असें समजावें. तात्पर्य, स्त्रीसंभोगापासून दोनही प्रकारची हिंसा होते, ह्मणून

स्वस्त्री व परस्त्री ह्या दोघींचाही उपभोग करूं नये.

ब्रह्मचर्यमहिमानमभिष्टौति—

आतां; ब्रह्मचर्याच्या महत्वाची स्तुति करितात.

स्वस्त्रीमात्रेऽपि सन्तुष्टो ।
नेच्छेद्योऽन्याः स्त्रियः सदा ॥
सोऽप्यद्भुतप्रभावः स्यात् ।
किं वर्ण्यं वर्णिनः पुनः ॥ ५६ ॥

टीका— यो नेच्छेत् नाभिलषेत् । काः स्त्रियः नारीः । किंविशिष्टाः अन्याः स्वस्त्रीतो व्यतिरिक्ताः । किंविशिष्टः सन् सन्तुष्टः सन्तोषं गतः । केन स्वस्त्रीमात्रेण निजनार्यैव । स्यात् कोऽसौ सोऽपि स्वदारसन्तुष्टोऽपि । किंविशिष्टः अद्भुतप्रभावो लोकविस्मयनीयमाहात्म्यः । किं वर्ण्यं किं माहात्म्यं स्तुत्यं । कस्य वर्णिनः सर्वस्त्रीनिवृत्तस्य कथं पुनः प्राग्वर्णितप्रायत्वादित्यर्थः ॥

अर्थ—जो पुरुष केवळ विवाहित स्त्रीच्या योगानेंच तुष्ट होऊन केव्हांही दुसऱ्या स्त्रीची इच्छा करीत नाहीं तो पुरुष देखील विलक्षण प्रभावशाली होतो. तर (ह्याप्रमाणें स्वदारसंतोषरूपी एकदेशी ब्रह्मचर्याचें जर इतकें सामर्थ्य आहे तर) मग जे मुळींच स्त्रीसमागम न करणारे असे असतील, त्यांचें वर्णन काय करावें; अर्थात् त्यांचें वर्णन करणें अगदींच शक्य नाहीं.

इदानीं स्वभर्तृमात्रसेवनव्रतायाः स्त्रिया बहुमान्यतां दृष्टान्तेन स्पष्टयति—

आतां; केवळ स्वपतीचीच सेवा करणाऱ्या स्त्रीची योग्यता उदाहरणानें स्पष्ट दाखवितात.

रूपैश्वर्यकलावर्य- ।
मपि सीतेव रावणम् ॥
परपूरुषमुज्झन्ती ।
स्त्री सुरैरपि पूज्यते ॥ ५७ ॥

टीका— पूज्यते सत्क्रियते। काऽसौ स्त्री। कैः सुरैर्देवैः किं पुनर्मनुष्यादिभिरित्यपिशब्दार्थः। किं कुर्वती उज्झन्ती व्रतयन्ती। कं परपूरुषं स्वभर्तुरन्यं पूरुषं। अत्र हेतौ शतृङ् परपुरुषोज्झनेन सुरपूजाया जन्यत्वात्। किंविशिष्टमपि रूपेत्यादि— रूपमाकारसौन्दर्यं। ऐश्वर्यं पूजार्थाज्ञाधिपत्यं, कला गीतनृत्यादिकाः रूपं चैश्वर्यं च कलाश्च ताभिर्वर्यमुत्कृष्टमसाधारणरूपादिमन्तमित्यर्थः। अपिर्विस्मये। केव कमित्याह— सीतेव रावणं जानकी यथा लंकेश्वरम् ॥

अर्थ—रावणाचा ज्याप्रमाणें सीतेनें त्याग केला त्याप्रमाणें आपल्या पतीपेक्षां दिसण्यांत सुंदर, संपत्तिमान् व अनेक कलांनीं युक्त असलेल्या अशा देखील परपुरुषाचा जी स्त्री त्याग करिते, तिची देवसुद्धां पूजा करितात. ( त्या स्त्रीला देव देखील मान देतात. )

ब्रह्माणुव्रतातिचारानाह—

आतां; ब्रह्मचर्याणुव्रताचे अतीचार सांगतात.

इत्वरिकागमनं पर- ।
विवाहकरणं विटत्वमतिचाराः ॥
स्मरतीव्राभिनिवेशोऽ ।
नङ्गक्रीडा च पञ्च तुर्ययमे ॥ ५८ ॥

**टीका—** इत्वरिकागमनादयः पञ्चातिचारास्तुर्ययमे सार्वकालिकब्रह्मचर्याणुव्रते भवन्तीति सम्बन्धः। तत्रेत्वरिकागमनं अस्वामिका असती गणिकात्वेन पुंश्चलित्वेन वा पुरुषानेति गच्छतीत्येवंशीला इत्वरी। तथा प्रतिपुरुषमेतीत्येवंशीलेति व्युत्पत्त्या वेश्यापीत्वरी। ततः कुत्सायां के इत्वरिका तस्यां गमनमासेवनं। इयं चात्र भावना– भाटिप्रदानान्नियतकालस्वीकारेण स्वकलत्रीकृत्य वेश्यां वेत्वरिकां सेवमानस्य स्वबुद्धिकल्पनया स्वदारत्वेन व्रतसापेक्षचित्तत्वादल्पकालपरिग्रहाच्च न भंगो वस्तुतोऽस्वदारत्वाच्च भंग इति भंगाभंगरूपत्वादित्वरिकाया वेश्यात्वेनान्यस्यास्त्वनाथतयैव परदारत्वात्। किं चास्य भाट्यादिना परेण किञ्चित्कालं परिगृहीतां वेश्यां गच्छतो भंगः कथञ्चित्परदारत्वात्तस्याः। लोके तु परदारत्वारूढेर्न भंग इति भंगाभंगरूपोऽतिचारः। अन्ये त्वपरिगृहीतकुलांगनामप्यन्यदारवर्जिनोऽतिचारमाहुः। तत्कल्पनया परस्य भर्तुरभावेनापरदारत्वादभङ्गो लोके च परदारतया रूढेर्भङ्ग इति भङ्गाभङ्गरूपत्वात्तस्य। एतेनेत्वरिकापरिगृहीतापरिगृहीतागमनलक्षणमतिचारद्वयं तत्त्वार्थशास्त्रोद्दिष्टमपि संगृहीतं भवति। परविवाहकरणादयस्तु चत्वारो द्वयोरपि स्फुरन्तीति प्रथमोऽतिचारः ॥१॥

परविवाहकरणं— स्वापत्यव्यतिरिक्तानां कन्याफललिप्सया स्नेहसम्बन्धादिना वा परिणयनविधानं। एतच्च स्वदारसन्तोषवता स्वकलत्रेतरदारवर्जकेन च स्वकलत्रवेश्याभ्यामन्यत्र मनोवाक्कायैर्मैथुनं न कार्यं न च कारणीयमिति व्रतं यदा गृहीतं भवति तदाऽन्यविवाहकरणं मैथुनकरणमित्यर्थतः प्रतिषिद्धमेव च भवति। तद्व्रती तु मन्यते विवाह एवायं मया क्रियते न मैथुनं कार्यत इति व्रतसापेक्षत्वादतिचारः। कन्याफललिप्सा च सम्यग्दृष्टेरप्युत्पन्नावस्थायां सम्भवति। मिथ्यादृष्टेस्तु भद्रकावस्थायामनुग्रहार्थं व्रतादाने

सा सम्भवति। ननु परविवाहनवत् स्वापत्यविवाहनेऽपि समान एव दोष इति चेत् सत्यं। किं तर्हि यदि स्वकन्याविवाहो न कार्यते तदा स्वच्छन्दचारिणी स्यात्। ततश्च कुलसमयलोकविरोधः स्यात्। विहितविवाहात्तु पतिनियतस्त्रीत्वेन न तथा स्यात्। एष न्यायः पुत्रेऽपि विकल्पनीयः। यदि पुनः कुटुम्बचिन्ताकारकः कोऽपि स्वभ्रात्रादिर्भवेत्तदा स्वापत्यविवाहनेऽपि नियम एव श्रेयान्। यदा तु स्वदारसन्तुष्टो विशिष्टसन्तोषाभावात् अन्यत्कलत्रं परिणयति तदाऽप्यस्यायमतिचारः स्यात्। परस्य कलत्रान्तरस्य विवाहकरणमात्मना विवाहनमिति व्याख्यानादिति द्वितीयोऽतिचारः॥ २॥

विटत्वं भाण्डिमा तत्प्रधानवाक्प्रयोगः ॥ ३ ॥ स्मरतीव्राभिनिवेशः– कामेऽतिमात्रमाग्रहः। परित्यक्तान्यसकलव्यापारस्य तद्व्यवसायितेत्यर्थः। यथा मुखकक्षोपस्थान्तरेष्ववितृप्ततया लिङ्गं प्रक्षिप्य महतीं वेलां निश्चलो मृत इवास्ते। चटक इव चटकां मुहुर्मुहुः स्त्रियमारोहति। जातबलक्षयश्च वाजीकरणान्युपयुङ्क्ते। अनेन खल्वौषधादिप्रयोगेण गजप्रसेकी तुरगावमर्दी च पुरुषो भवतीति बुध्द्या इति चतुर्थः॥ ४॥

अनङ्गक्रीडा अङ्गं साधनं देहावयवो वा तच्चेह मैथुनापेक्षया योनिर्मेहनं च ततोऽन्यत्र मुखादिप्रदेशे रतिः। यतश्च चर्मादिमयैर्लिङ्गैः स्वलिङ्गेन कृतार्थोऽपि स्त्रीणामवाच्यदेशं पुनःपुनः कुद्राति। केशाकर्षणादिना वा क्रीडन् प्रबलरागमुत्पादयति साऽप्यनङ्गक्रीडोच्यते। इह च श्रावकोऽत्यन्तपापभीरुतया ब्रह्मचर्यं चिकीर्षुरपि यदा वेदोदयासहिष्णुतया तत्कर्तुं न शक्नोति तदा यापनामात्रार्थं स्वदारसन्तोषादि प्रतिपद्यते। मैथुनमात्रेण च यापनायां सम्भवत्यां विटत्वादित्रयमर्थतः प्रतिषिद्धमेव। तत्प्रयोगे हि न कश्चिद्गुणः।

प्रत्युत सद्योऽतिरागोद्दीपनं बलक्षयस्तात्कालिकी च्छिदा राजयक्ष्मादिरोगाश्च स्युः । तदुक्तं— ऐदम्पर्यमतो मुक्त्वा भोगानाहारवद्भजेत् ॥ देहदाहोपशान्त्यर्थमभिध्यानविहानये ॥ १ ॥ एवं प्रतिषिद्धाचरणाद्भङ्गो नियमाबाधनाच्चाभङ्ग इत्येतेऽपि विटत्वादयस्त्रयोऽतिचाराः । यद्वा स्वदारसन्तोषी मैथुनमेव मया वेश्यादौ प्रत्याख्यातमिति स्वकल्पनया तत्र तदेव वर्जयति न विटत्वादिकं । परदारविवर्जकोऽपि परदारेषु मैथुनमेव वर्जयति नाशिष्टवाक्प्रयोगालिङ्गनादीनीति तयोः कथञ्चिद्व्रतसापेक्षत्वाद्विटत्वादयोऽतिचाराः । स्त्रियास्तु पूर्ववत्परविवाहकरणादयः । प्रथमस्तु यदा स्वकीयपतिर्वारकादिने सपत्न्या परिगृहीतो भवति तदा सपत्नीवारकं विलुप्य तं परिभुञ्जानाया अतिचारोऽतिक्रमादिना च परपुरुषं ( इव ) स्वपतिं वा ब्रह्मचारिणमभिसरन्त्याः स्यात् ॥

अर्थ—ब्रह्मचर्याणुव्रताचे "इत्वरिकागमन, परविवाहकरण, विटत्व, स्मरतीव्राभिनिवेश आणि अनंगक्रीडा" असे पांच अतीचार आहेत. ह्यांतील प्रत्येकांचे अर्थ पुढें दिल्याप्रमाणें—

जी स्त्री पती किंवा पिता वगैरे दुसरे कोणीच नसल्यानें स्वतंत्र झाल्यामुळें प्रसिद्धपणें अथवा गुप्तरीतीनें परपुरुषाशीं समागम करीत असेल तिला 'इत्वरी' असें ह्मणतात. त्याचप्रमाणें प्रत्येक पुरुषाबरोबर समागम करणारी असल्यानें वेश्येलाही 'इत्वरी' ह्मणतात. अशाप्रकारच्या स्त्रीचें सेवन करणें हा ब्रह्मचर्याणुव्रताचा अतीचार आहे. हा भंग व अभंग उभयस्वरूप आहे. कारण, जर एखादा परस्त्रीत्यागाणुव्रत पाळणारा श्रावक कांहीं द्रव्य देऊन नियमितकालपर्यंत एखाद्या वेश्येला आपल्या स्त्रीप्रमाणें

ताब्यांत ठेऊन तिचा उपभोग करीत असेल, तर त्याची " आपण परस्त्रीत्यागाणुव्रत स्वीकारिलेलें आहे व ही वेश्या जरी आहे, तरी द्रव्य देऊन हिला कांहीं कालपर्यंत आपली स्त्रीच केली असल्यानें हिच्या उपभोगानें व्रतभंग होत नाहीं " अशी कल्पना असल्यानें त्याच्या बुद्धीनें व्रतभंग होत नाहीं. आणि वास्तवीक विचार केला असतां, त्या वेश्येशीं यथाविधि विवाह झाला नसल्यानें ती स्वस्त्री होत नाहीं. ह्मणून परस्त्रीचा उपभोग केल्यासारखेंच होतें, येवढ्याकारितां व्रतभंग होतो.

तसेंच; पती, पिता किंवा ज्यांच्या आज्ञेचें अतिक्रमण करतां येत नाहीं असे दुसरे कोणीं नसल्यानें जी स्त्री स्वतंत्र झालेली असते, तिचेंही 'इत्वरिका' शब्दानें ग्रहण होत असल्यानें तिच्याशीं समागम करणें हाही भंगाभंगरूपच अतिचार होतो. कारण, कोणाचेंच स्वत्व नसल्यानें तिला परस्त्री ह्मणतां येत नाहीं. ह्मणून तिच्या उपभोगानें व्रतभंग न होतां केवळ अतिचार मात्र होतो. व लोकव्यवहारांत तिला परस्त्री समजण्याची रूढी असल्यानें व्रतभंग होतो. तात्पर्य, इत्वरिकागमनापासून भंगाभंगरूप अतिचार घडतो हें युक्तीनें सिद्ध आहे. वेश्यागमनापासून जो अतिचार घडतो त्याचा एक प्रकार वर दाखविला.

आतां दुसराही एक प्रकार त्याविषयींचाच आहे तो असा– दुसऱ्या एखाद्या मनुष्यानें द्रव्य देऊन आपल्या ताब्यांत जर एखादी वेश्या ठेवलेली असेल, तर ती– जितका कालपर्यंत त्याच्या स्वत्वांत असेल तितका

कालपर्यंत– परस्त्री असल्यानें तिच्या समागमानें परस्त्री-समागम होऊन व्रतभंग होतो; व लोकांत तशा प्रकारच्या वेश्येलाहि परस्त्री ह्मणण्याची रूढी नसल्यानें व्रतभंग न होतां केवल अतीचार होतो. अशा प्रकारेंही इत्वरिकागमनरूपी अतिचाराला भंगाभंगरूपता येते.

दुसरे कितीएक पंडित “अस्वामिक अशा कुलस्त्रीशीं गमन करणें, हा, ज्यानें परस्त्रीसंभोग वर्ज्य केला आहे अशा श्रावकाचा अतीचार होतो” असें ह्मणतात. हा अतिचारही भंगाभंगस्वरूपच होतो. कारण, जी स्त्री अनाथ असते तिच्यावर पतीचें स्वत्व नसल्यानें ती परस्त्री होत नाहीं ह्मणून तिच्या संभोगानें व्रतभंग केला असें होत नाहीं. आणि लोकव्यवहारांत तिलाही ‘परस्त्री’ असें समजण्याचा संप्रदाय असल्यानें व्रतभंग होतो. तत्वार्थसूत्रांत ब्रह्मचर्यव्रताचे जे पांच अतीचार सांगितले आहेत त्यांत विवाहित असून व्यभिचार करणाऱ्या स्त्रीचा संभोग करणें व अविवाहित असून व्यभिचार करणाऱ्या स्त्रीचा संभोग करणें हे दोन अतीचार मानिले आहेत, त्यांचाही ह्या मतांत संग्रह होतो. बाकीचे अतिचार दोघांच्याही मतानें सारखेच आहेत. ह्मणून, त्याबद्दल विवेचन करण्याचें कारण नाहीं.

दुसऱ्या अतिचाराचें नांव ‘परविवाहकरण’ असें आहे. ह्याचा अर्थ— आपल्या मुलींवांचून दुसऱ्या कोणाच्याही मुलीचें, आपल्याला कन्यादानाचें फळ मिळावें ह्या बुद्धीनें अथवा प्रेमानें लग्न करणें असा होतो. हें स्वदारसंतोषव्रताचा ज्यानें स्वीकार केला आहे, त्यानें

देखील करूं नये. कारण, स्वदारसंतोषव्रती श्रावकानें मनानें वाणीनें व शरीरानें स्वस्त्रीवांचून इतर स्त्रीशीं समागम करणें अथवा करविणें हें वर्ज्य केलेलें असतें; ह्मणून दुसऱ्याचा विवाह करणें ह्मणजे परंपरेनें त्या स्त्रीपुरुषांचा समागम केल्याप्रमाणेंच होत असल्यानें परविवाहकरण हें कर्म निषिद्ध ठरतें. आतां, हा अतिचार पूर्वींच्या अतिचाराप्रमाणें व्रतभंग करणारा नाहीं. कारण, व्रती श्रावक "मी केवळ दुसऱ्याचा विवाहच करीत आहे, दुसऱ्याकडून स्त्रीसंभोग करवीत नाहीं; तसें केलें असतां माझ्या व्रताचा भंग होईल, असें समजत असून" व्रतभंग न होऊं देण्याची इच्छा करीत असल्यानें व्रतभंग न होतां फक्त व्रताचा अतिक्रम केल्यासारखें होतें ह्मणून परविवाह केला असतां अतिचार होतो, व्रतभंग होत नाहीं.

येथें अशी एक शंका उत्पन्न होते कीं- "दुसऱ्याच्या कन्येचा विवाह केल्यानें जसा अतीचार होतो, त्याप्रमाणेंच आपल्या मुलीचाहि विवाह केला असतां अतिचार कां होऊं नये?" ह्यावर समाधान असें कीं- जर आपल्या मुलीचा विवाह केला नाहीं तर ती स्वच्छंद वागणारी होईल व त्यायोगानें कुलाचार व लोकाचार ह्या दोन्हींच्या विरुद्ध असें वर्तन तिच्याकडून होऊन ती भ्रष्ट होईल. तसें होऊं नये, ह्मणून तिचा विवाह केला पाहिजे. कारण, विवाह केला असतां, ती परतंत्र झाल्यामुळें तिच्या हातून तसें विरुद्ध वर्तन होणें शक्य नाहीं. [पुत्राचे ठिकाणींही अशीच कल्पना समजावी] त्यांतूनही कुटुंबाची काळजी घेणारा आपला बंधू किंवा

दुसरा कोणी असेल तर त्याच्याकडून आपल्या मुलाचा व मुलीचा विवाह करवावा. आपण करूं नये हेंच योग्य आहे. स्वदारसंतोष व्रत करणारा श्रावक जर ह्या स्त्रीपासून व्हावा तितका संतोष होत नाहीं म्हणून दुसरी स्त्री करील; तर, तसें करणें हेंही 'परविवाहकरणच' असल्यानें अतीचार होतो.

'विटत्व' हा तिसरा अतीचार आहे. ह्याचा 'स्त्रियांबरोबर थट्टा करणें' असा अर्थ होतो. हा अतिचार वाणीनेंच होतो,.

'स्मरतीव्राभिनिवेश' हा चवथा अतीचार आहे. ह्याचा "स्त्रीसंभोगाविषयीं अत्यंत आसक्ती, म्हणजे दुसरीं सर्वकामें सोडून केवळ स्त्रीसंभोगाचेंच चिंतन करणें" असा अर्थ होतो. ह्याच्या योगानें मनुष्य पक्ष्याप्रमाणें सर्वदा स्त्रीसमागम करण्यास प्रवृत्त होतो; आणि त्या योगानें शक्तीचा ऱ्हास झाला म्हणजे, पुनः शक्ती यावी ह्या बुद्धीनें वाजीकरण वगैरे औषधोपचार करतो.

'अनंगक्रीडा' हा पांचवा अतीचार आहे. ह्याचा अर्थ "मैथुनास अयोग्य अशा अवयवांचे ठिकाणीं मैथुनक्रीडा करणें" असा आहे. ह्या सर्व अतीचारांचा त्याग करावा. कारण, पापभीरु असा जो श्रावक ब्रह्मचर्यव्रत चालविण्याविषयीं नियम करूनही फार प्रबळ झालेल्या मनोविकाराला सहन करण्यास असमर्थ झाला असेल, त्यानें केवल ते प्रबलमनोविकार घालविण्याकरितांच स्वस्त्रीसंतोषव्रताचा स्वीकार करावयाचा आहे. मग अशा रीतीनें जर त्या मनोविकारापासून होणाऱ्या वेदनेची शांती होणें

शक्य आहे; तर अर्थातच बाकींच्या व्यवहारांची आवश्यकता नाहीं, हें सिद्ध आहे व ह्या हेतूनेंच त्यांचा निषेध केला आहे. दुसरें असें कीं; वेदनांच्या शांतीकारितां ह्मणून दुसरे व्यापार करण्याची जरूरहि पडत नाहीं. व त्यांत कांहीं गुणही नसून उलट त्यापासून बलक्षय होतो, अथवा राजयक्ष्मा ( क्षय ) रोग उत्पन्न होतो. आणि ह्मणूनच वैद्यशास्त्रांत—स्त्रीसंभोगाविषयीं अत्यंत आसक्त न होतां फक्त वेदनाशांतीकारितां—जसें क्षुधेच्या शांतीकरितांच आपण भोजन करितों, त्याप्रमाणें स्त्रीसंभोग करावा, त्याचें सर्वदा चिंतन मुळींच करूं नये, असें सांगितलें आहे. ह्मणून शास्त्रानें त्याचा निषेध केलेला आहे. ह्या अतिचारांचा त्याग जसा पुरुषानें केला पाहिजे त्याप्रमाणें ब्रह्मचर्याणुव्रत स्वीकार केलेल्या स्त्रीनेंही अवश्य केलाच पाहिजे.

अथ परिग्रहपरिमाणाणुव्रतं व्याचष्टे—

आतां, परिग्रह परिमाणाचें स्वरूप सांगतात.

ममेदमिति सङ्कल्प- ।
श्चिदचिन्मिश्रवस्तुषु ॥
ग्रन्थस्तत्कर्शनात्तेषां ।
कर्शनं तत्प्रमाव्रतम् ॥ ५९ ॥

टीका—भवति । कोऽसौ ग्रन्थः परिग्रहः । किंलक्षणो ममेदमिति सङ्कल्पः इदं चेतनमचेतनं मिश्रं वा वस्तु मम सम्बन्धि मदीयं मत्स्वामिकमिति सङ्कल्पो मानसोऽध्यवसायो ममत्वपरिणामो मूर्च्छेति यावत् । केषु चिद्वस्तुषु कलत्रपुत्रादिषु, अचिद्वस्तुषु

गृहसुवर्णादिषु। मिश्रवस्तुषु चेतनाचेतनेषु। बहिः पुष्पवाटिकादिषु। अन्ततश्च मिथ्यात्वादिषु। भवति। किं तत् तत्प्रमाव्रतं परिग्रहपरिमाणाख्यमणुव्रतं। किं कर्शनमल्पीकरणं। केषां तेषां चितामचितां चिदचितां च वस्तूनां। कस्मात् तत्कर्शनात् यथोक्तमूर्च्छालक्षणपरिग्रहाल्पीकरणात् ॥

**अर्थ**—चेतन (स्त्री, पुत्र वगैरे) अचेतन (गृह, सुवर्ण वगैरे) आणि मिश्र (चेतन व अचेतन ह्यांचें मिश्रण ज्यांत आहे अशीं बागबगीचे शेतें वगैरे) ह्या पदार्थांविषयीं 'हे माझे आहेत' असा जो निश्चय त्याला 'परिग्रह' असें ह्मणतात. आणि त्या चेतन अचेतन आणि मिश्र अशा प्रकारच्या पदार्थांच्या कमी करण्यानें जें 'हें माझें आहे' अशा प्रकारचा निश्चय शिथिल करणें ह्यास परिग्रहपरिमाण असें ह्मणतात.

अन्तरङ्गसङ्गनिग्रहोपायमाह—

आतां, अंतरंगपरिग्रहत्यागाचा उपाय सांगतात.

उद्यत्क्रोधादिहास्यादि-
षट्कवेदत्रयात्मकम् ॥
अन्तरङ्गं जयेत्सङ्गं।
प्रत्यनीकप्रयोगतः ॥ ६० ॥

**टीका**—जयेत् निगृह्णीयात्। कोऽसौ पञ्चमाणुव्रतार्थी। कं सङ्गं ग्रन्थं। किंविशिष्टं अन्तरङ्गं आध्यात्मिकं किमात्मकं उद्यदित्यादि उद्यन्ति उच्चलन्ति विपच्यमानानि, उदितानां दुर्जयत्वात्, क्रोधादयोऽनन्तानुबन्ध्यप्रत्याख्यानावरणवर्जिताः, तान्मिथ्यात्वसहितान्निगृह्यैव देशसंयमस्य प्रवृत्तत्वात्, अष्टौ प्रत्याख्यानावरणसँज्वलनाख्या

इह गृह्यन्ते, हास्यादिषट्कं हास्यरत्यरतिशोकभयजुगुप्साः, वेदाः स्त्रीपुन्नपुंसकवेदा रागाख्यास्तेषां त्रयं वेदत्रयं, क्रोधादयश्च हास्यादिषट्कं च वेदत्रयं च क्रोधादिहास्यादिषट्कवेदत्रयाणि, उद्यन्ति च तानि क्रोधादिहास्यादिषट्कवेदत्रयाणि च तान्येव आत्मा स्वरूपं यस्यासौ तदात्मकस्तं । केन जयेत् प्रत्यनीकप्रयोगतः यथास्वमुत्तमक्षमादिभावनया ॥

**अर्थ—उत्पन्न होणारे क्रोध, मान, माया व लोभ हे ४ कषाय; हास्य, रति, अरति शोक, भय व जुगुप्सा हे सहा विकार; पुंवेद, नपुंसकवेद व स्त्रीवेद हे तीन वेद आणि मिथ्यात्व अशा भेदानें चौदा प्रकारचे अंतरंगपरिग्रह उत्तम क्षमा वगैरे दहा प्रकारच्या धर्माच्या भावनेनें जिंकावे.**

बहिरङ्गसङ्गत्यागविधिमाह—

**आतां, बाह्यपरिग्रहांचा अवश्य त्याग करावा, असें सांगतात.**

**अयोग्यासँयमस्याङ्गं ।**
**सङ्गं बाह्यमपि त्यजेत् ॥**
**मूर्च्छाङ्गत्वादपि त्यक्तु- ।**
**मशक्यं कृशयेच्छनैः ॥ ६१ ॥**

**टीका**—त्यजेत् । कोऽसौ पञ्चमाणुव्रती । कं सङ्गं किंविशिष्टं बाह्यं वास्तुक्षेत्रादिकं । अन्तरङ्गसङ्गत्यागापेक्षयाऽपिशब्दः समुच्चये । किंविशिष्टमङ्गं साधनं । कस्य अयोग्यासँयमस्य अयोग्यः श्रावकस्य कर्तुमनुचितोऽसंयमः स चेहानारम्भजत्रसवधो व्यर्थः स्थावरवधः परदारगमनादिश्च, अयोग्यश्चासावसँयमश्चायोग्यासँयमस्तस्य । कुतो हेतोः मूर्च्छाङ्गत्वात् मोहोदयनिमित्तत्वात् । यस्त्वसौ त्यक्तुमशक्य-

स्तत्त्यागविधिमाह– कृशयेत् स्वल्पीकुर्यात् । कं तं बाह्यसङ्गं । किंविशिष्टमपि त्यक्तुमशक्यमपि अशक्यवर्जनमपि । कथं शनैः मनाक् समयपरिपाट्या कालक्रमेण परिग्रहसञ्ज्ञाया अनादिसन्तत्या प्रवर्तमानत्वेन सहसा तत्त्यागस्य कर्तुमशक्यत्वात् कृतस्यापि तद्वासनावशाद्भङ्गसम्भावनाच्चैतदुच्यते ॥

**अर्थ**—श्रावकाच्या ठिकाणीं असण्यास अयोग्य अशा इंद्रियांच्या उच्छृंखलपणाला उत्पन्न करणारा बाह्यपरिग्रह (घर, शेत, स्त्री, पुत्र वगैरे) देखील मोह उत्पन्न करणारा आहे, ह्मणून अवश्य टाकावा. आणि जरी त्या परिग्रहाचा त्याग करणें अशक्य असलें तथापि तो हळू हळू कमी करावा. कारण परिग्रह हा एक जीवधर्म असल्यानें जीवाचे ठिकाणीं त्याचा अनादिकालापासून संबंध आहे, ह्मणून एकदम त्याग करणें फारच अशक्य आहे. आणि जरी तसा एकदम त्याग केला तथापि त्याची वासना दृढ असल्यानें कदाचित् व्रतभंग होण्याचा संभव आहे.

एतदेव प्रपञ्चयन्नाह—

आतां, हेंच किंचित् स्पष्टपणानें सांगतात.

देशसमयात्मजात्या- ।
द्यपेक्षयेच्छां नियम्य परिमायात् ॥
वास्त्वादिकमामरणा- ।
त्परिमितमपि शक्तितः पुनः कृशयेत् ॥६२॥

**टीका**—परिमायात् परिमितं कुर्यात् । किं तत् वास्त्वादिकं वास्तुक्षेत्रधनधान्यद्विपदचतुष्पदशयनासनयानकुप्यभाण्डलक्षणं दशभेदं बाह्यग्रन्थं । किं कृत्वा नियम्य सन्तोषभावनया निगृह्य । कां

इच्छां परिग्रहे तृष्णां । कया देशेत्यादि देशो वास्यमानो जनपदः, समयः कालः, आत्मा स्वात्मा, जातिः वणिक्त्वादिः, देशश्च संयमश्च आत्मा च जातिश्च ताः आदयो येषां स्वान्वयवयःपदव्यादीनां ते देशादयस्तेषामपेक्षया तानाश्रित्येत्यर्थः । कथं पारिमायात् आमरणात् मरणावधि यावज्जीवमित्यर्थः । तथा कृशयेच्छ्रावकः । किं तत्परिमितमपि वास्त्वादिकं । कथं पुनः । कस्मात् शक्तितः नैस्सङ्ग्यभावनया समुत्पन्नां स्वशक्तिमपेक्ष्येत्यर्थः ॥

अर्थ—श्रावकानें आपल्या इच्छेचें नियमन करून देश, काल, शरीरशक्ती, आपली जाती, वंश, कुल, वय आणि आपली योग्यता इतक्यांच्या अनुरोधानें ( ह्या सर्वांना निभावेल अशा रीतीनें ) गृहादि (१ घर, २ शेत, ३ धन, ४ धान्य, ५ द्विपद, ६ चतुष्पद, ७ शयन, ८ आसन, ९ यान, १० तांबें वगैरे धातूंचे पदार्थ ) दहा प्रकारचाही परिग्रह–मरणपर्यंत परिमित करावा. ह्मणजे इतका परिग्रह ठेवीन अधिक ठेवणार नाहीं अशी प्रतिज्ञा करून तितकाच परिग्रह ठेवावा. आणि अशाप्रकारें परिमित झालेला परिग्रहदेखील आपल्या शक्तीप्रमाणें आणखी कमीच करावा.

परिग्रहं वक्रभणित्या दूषयन्नाह—

आतां, वक्रोक्तीनें परिग्रहाविषयीं दोषोद्भावन करितात.

अविश्वासतमोनक्तं ।
लोभानलघृताहुतिः ॥
आरम्भमकराम्भोधि- ।
रहो श्रेयः परिग्रहः ॥ ६३ ॥

**टीका**—अहो आश्चर्यं । श्रेयः सेव्यः पुंसां कल्याणं वा । कोऽसौ परिग्रहः । किंविशिष्टः अविश्वासतमोनक्तं अविश्वास एव तमो ध्वान्तं दुःखहेतुत्वात् तत्र नक्तं रात्रिस्तद्धेतुत्वादिति अविश्वासतमोनक्तं । तथा लोभ एवानलोऽग्निश्चित्तसन्तापकत्वात् तत्र घृताहुतिः सर्पिःप्रक्षेपः प्रदीपकत्वादिति लोभानलघृताहुतिः । तथा आरम्भमकराम्भोधिः आरम्भाः कृष्यादयस्त एव मकरास्त्रासातङ्कनिमित्तत्वात् तत्र अम्भोधिः समुद्रः उत्पत्तिनित्यप्रवृत्तिनिमित्तत्वादित्यारम्भमकराम्भोधिः ॥

**अर्थ**— हा परिग्रह अविश्वासरूपी अंधकारानें भरलेली रात्र, लोभरूपी अग्नीला प्रज्वलित करणारी तुपाची आहुती, किंवा उदरपोषणाच्या उद्योगाचा (कृषि वगैरे हिंसाजनक कर्मांचा) समुद्र- असा असूनही, 'हा कल्याणकर आहे' असें ह्मणणें, हें मोठेंच आश्चर्य आहे.

पञ्चमाणुव्रतातिचारपञ्चकनिषेधविधिमाह—

**आतां त्याचे पांच अतीचार सांगतात.**

वास्तुक्षेत्रे योगा- ।
द्धनधान्ये बन्धनात्कनकरूप्ये ॥
दानात्कुप्ये भावा- ।
न्न गवादौ गर्भतो मितिमतीयात् ॥६४॥

**टीका**—नातीयान्नातिक्रमेत् । कोऽसौ परिग्रहपरिमाणाणुव्रती । कां मितिं व्रतविषयीकृतं परिमाणं । क्व वास्तुक्षेत्रे वास्तुनि च क्षेत्रे च । कस्मात् योगात् वास्त्वन्तरसंयोजनं क्षेत्रान्तरसंयोजनं चाश्रित्य । तथा धनधान्ये धने च धान्ये च न मितिमतीयात् । कस्मात् बन्धनात् बन्धनं रज्ज्वादिनियन्त्रणं सत्यङ्कारदानादि

चाश्रित्य । तथा कनकरूप्ये सुवर्णे च रूप्ये च न मितिमतीयात् । कस्माद्दानात् दानमाश्रित्य । तथा कुप्ये सुवर्णरूप्याभ्यामन्यत्र काँस्यरथादिद्रव्ये न मितिमतीयात् । कस्मात् भावात् भावं परिमाणान्तरं अभिप्रायं वाऽऽश्रित्य । तथा गवादौ गोमहिषीवडवादिचतुष्पदपत्तिशुकादिद्विपदवर्गे न मितिमतीयात् । कस्मात् गर्भतो गर्भमाश्रित्येति समन्वयः ॥

इतस्तदर्थो विस्तरतः कथ्यते– तत्र वास्तु गृहादि ग्रामनगरादि च । तत्र गृहादि त्रेधा खातोच्छ्रिततदुभयभेदात् । तत्र खातं भूमिगृहादिकं, उच्छ्रितं प्रासादादिकं, खातोच्छ्रितं च भूमिगृहोपरिगृहादिसन्निवेशः । क्षेत्रं सस्योत्पत्तिभूमिः । तत् त्रेधा सेतुकेतूभयभेदात् । तत्र सेतुक्षेत्रं यदरघट्टादिजलेन सिच्यते । केतुक्षेत्रं आकाशोदकपातान्निष्पाद्यसस्यं । उभयमुभयजलनिष्पाद्यसस्यं । वास्तु च क्षेत्रं च वास्तुक्षेत्रमिति समाहारनिर्देशोऽत्रोत्तरत्र च बाह्यग्रन्थस्य पञ्चविधत्वकल्पनयाऽतीचारपञ्चकस्य सुखप्रयोजनार्थं । तत्र वास्तुक्षेत्रे योगाद्भित्तिवृत्याद्यपनयेन वास्तुक्षेत्रान्तरमीलनान्तरमाश्रित्य परिमितपरिग्रहः श्रावको न मितिमतीयात् देवगुरुसाक्षिकव्रतग्रहणकाले यावज्जीवं चतुर्मासादिकालावधि वा प्रतिपन्नां संख्यां नातिक्रमेत् । वास्त्वादिकमेव मया विपुलीक्रियते न प्रतिपन्ना तत्संख्याऽतिक्रम्यत इति बुध्द्या तद्विषयं वा हस्तादिपरिमाणं सहसाकारादिना नातिक्रमेत् । अन्यथा वास्तुक्षेत्रप्रमाणातिक्रमो नाम प्रथमोऽतिचारः स्यात् । व्रतसापेक्षस्यैव स्वबुध्द्या व्रतभङ्गमकुर्वतोऽतिचारत्वव्यवस्थापनात् ॥ १ ॥

धनं गणिमादिभेदात् चतुर्विधं । तत्र गणिमं पूगफलजातिफलादि । धरिमं कुंकुमकर्पूरादि । मेयं स्नेहलवणादि । परीक्ष्यं रत्नवस्त्रादि । धान्यं व्रीह्यादिभेदात्पञ्चदशधा । उक्तं च– व्रीहिर्यवो

मसूरो गोधूमो मुद्गमाषतिलचणकाः । अणवः प्रियंगुकोद्रवमयुष्ठिकाशालिराढक्यः ॥ १ ॥ किं च कलायकुलित्थौ पञ्चदशधान्यानीति च। धनं च धान्यं च धनधान्यं । तत्र स्वगृहगतधनादेर्विक्रये व्यये वा कृते गृहिष्यामीति भावनया बन्धनात् रज्ज्वादिनियन्त्रणलक्षणात् सत्यङ्कारदानादिरूपाद्वा स्वीकृत्य धनधान्यं विक्रेतृगृहे एव स्थापयन्न मितिमतीयात् । अन्यथा द्वितीयोऽतिचारः स्यात् ॥ २ ॥

कनकं सुवर्णं घटितमघटितं वाऽनेकप्रकारमेवं रूप्यमपि, कनकं च रूप्यं च कनकरूप्यं तत्र। दानात् स्वव्रतकालावधौ पूर्णे गृहिष्यामीति अभिप्रायेण तुष्टराजादितः स्वप्रतिपन्नसंख्यां ततोऽधिके लब्धेऽन्यस्मै वितरणान्न मितिमतीयात् अन्यथा तृतीयोऽतिचारः स्यात् ॥ ३ ॥

कुप्ये रूप्यसुवर्णव्यतिरिक्ते कांस्यलोहताम्रसीसकत्रपुमृद्भाण्डवंशविकारोदङ्किकाकाष्ठमञ्चकमञ्चिकामसूरकरथशकटहलप्रभृतिद्रव्ये—भावात् द्वयोर्द्वयोर्मेलनेनैकीकरणरूपात् पर्यायान्तराद्व्रतावधौ पूर्णे गृहिष्यामीति अन्यप्रदेयतया व्यवस्थापनेनार्थित्वरूपाभिप्रायाद्वा न मितिमतीयादन्यथा चतुर्थोऽतिचारः स्यात्। कुप्यस्य हि या संख्या कृता तस्याः कथञ्चित् द्विगुणत्वे सति व्रतभङ्गभयात् भावतो द्वयोर्द्वयोर्मीलनेनैकीकरणरूपात्पर्यायान्तरात्स्वाभाविकसंख्याबाधनात् संख्यामात्रपूरणाच्चातीचारः । अथवा भावतोऽभिप्रायादर्थित्वलक्षणाद्विवक्षितकालावधेः परतो गृहिष्याम्यतो नान्यस्मै प्रदेयतया व्यवस्थापयतोऽसौ स्यात् ॥ ४ ॥

गवादौ गौरादिर्यस्य द्विपदचतुष्पदवर्गस्यासौ गवादिः । आदिशब्देन हस्त्यश्वमहिष्यादिचतुष्पदानां शुकसारिकादिद्विपदानां पत्न्युपरुद्धदासपदात्यादीनां संग्रहः । तत्र गर्भतो न मितिमतीयात् ।

गवादीनां गर्भग्रहणादुपलक्षणादन्येषां यथास्वमनाभोगादिनाऽतिक्रमादिना वा संख्यां नातिक्रमेत् । गोमहिषीवडवादेर्हि विवक्षितसंवत्सराद्यवधिमध्ये एव प्रसवे अधिकगवादिभावाद्व्रतभङ्गः स्यादिति तद्भयात्कियत्यपि काले गते गर्भग्रहणाद्गर्भस्थगवादिभावेन बहिस्तदभावेन च कथञ्चिद्व्रतभङ्गात्पञ्चमोऽतिचारः स्यात् ॥ ५ ॥

एते च क्षेत्रवास्तुहिरण्यरूप्यधनधान्यदासीदासकुप्यप्रमाणातिक्रमा इति तत्त्वार्थमतेन पञ्चातिचाराः प्रपञ्चिताः । स्वामिमतेन त्विमे– अतिवाहनातिसंग्रहविस्मयलोभातिभारवहनानि । परिमितपरिग्रहस्य च विक्षेपाः पञ्च वक्ष्यन्ते ॥ १ ॥ अत्रातिवाहनं लोभावेशवशात् वृषभादीनां शक्त्यतिक्रमेण हटान्मार्गे नयनं। अतिसंग्रहः इदं धान्यादिकमग्रे विशिष्टं लाभं दास्यतीति लोभावेशादतिशयेन संग्रहणं । अतिविस्मयो धान्यादौ प्रपन्नलाभेन विक्रीते मूलतोऽप्यसंगृहीते वा तत्क्रयाणकेनाधिकेऽर्घे लब्धे लोभावेशादतिविषादः । अतिलोभो विशिष्टेऽर्घे लब्धेऽपि अधिकलाभाकांक्षा । अतिभारवहनं लोभावेशादधिकभारारोपणं ॥ सोमदेवपण्डितास्त्विदमाह– कृतप्रमाणो लोभेन धनाद्यधिकसंग्रहः ॥ पञ्चमाणुव्रतज्यानीं करोति गृहमेधिनाम् ॥ १ ॥ तच्चैतच्च परेऽप्यूह्यास्तदत्यया इत्यनेन संगृहीतम् ॥

**अर्थ— १ घर व शेत ह्यांत दुसऱ्याची जागा मिसळून, परिमाणाचा अतिक्रम करूं नये. २ धन व धान्यें ह्यांच्या संबंधानें विकण्यास प्रतिबंध करून ( संचकार देऊन घेतलीं असें समजून तशींच ठेवण्यानें ) परिमाणाचा अतिक्रम करूं नये. ३ सोनें व रुपें ह्यांविषयीं दुसऱ्यास देऊन परिमाणाचा अतिक्रम करूं नये. ४ धातुमय अथवा काष्ठपाषाणमय अशा दुसऱ्या कोणत्याही पदार्थासंबधानें, आपल्या संख्येपेक्षां अधिक वाढूं न देण्याच्या**

समजुतीनें परिमाणाचा अतिक्रम करूं नये. ५ आणि पक्षी, पशु, ह्यांत गर्भानें परिमाणाचा अतिक्रम करूं नये. प्रत्येक अतिक्रम केला असतां अतीचार होतो. ह्या पांचही अतीचारांचें स्पष्टीकरण खालील विवेचनावरून कळेल.

वास्तु ह्मणजे ज्यांना तळघर आहे अशीं व ज्यांना दुमजला आहे अशीं व ज्यांना तळघर व दुमजला हे दोन्ही आहेत अशीं मिळून तीन प्रकारचीं घरें. क्षेत्र ह्मणजे विहिरीच्याच पाण्यानें पिकणारीं, पावसाच्या पाण्यानें पिकणारीं व दोन्हीं प्रकारांनीं पिकणारीं अशीं तीन प्रकारचीं शेतें. ह्या दोहोंत दुसऱ्याची जागा मिसळल्यानें, ह्मणजे आपली भिंत दुसऱ्याच्या जाग्यांत बांधून त्याची जागा आपल्या घरांत सामील केल्यानें व आपल्या शेतांचें कुंपण काढून दुसऱ्याच्या जाग्यांत घालून ती जागा आपल्या शेतांत सामील केल्यानें— यावज्जीव किंवा चातुर्मास्यादि कांहीं नियमित कालपर्यंत ज्या श्रावकानें परिमितपरिग्रहव्रत स्वीकारलें असेल त्याचा अतिचार होतो. हा 'वास्तुक्षेत्रप्रमाणातिक्रम' नांवाचा पहिला अतीचार होय.

गणिम ( सुपारी, जायफळ वगैरे ) धरिम ( केशर, कापूर वगैरे ) मेय ( तेल, तूप, मीठ वगैरे ) आणि परीक्ष्य ( रत्न, वस्त्र वगैरे ), अशा चार प्रकारच्या पदार्थांस 'धन' असें नांव आहे. आणि, भात, जव, मसूर, गहूं, मूग, उडीद, तीळ, हरभरा, जिरगे भात, राळे, हरीक, मटक्या, साळीचें भात, वाटाणा, कुळथ्या

अशा पंधरा प्रकारच्या पदार्थांस 'धान्य' असें ह्मणतात. हें धनधान्य— ज्यानें 'अमुक इतकेंच संग्रह करावयाचें' असा संकल्प केला असेल त्या श्रावकानें— आपल्या घरांत असलेलें विकलें असतां अथवा कांहीं कारणानें संपविलें असतां, पुढें ह्मणजे व्रताचा काल संपल्यावर— घेतां येईल अशा समजुतीनें, आजच संचकार देऊन— (त्या धनधान्याचा परिग्रहपरिमाणव्रत संपेपर्यंत घरांत संग्रह करावयाचा नसल्यामुळें) 'हें विकूं नको' असें सांगून विकणाऱ्याच्याच घरीं तें ठेवणें हा परिग्रहपरिमाणाणुव्रत ज्यानें स्वीकारलें आहे अशा श्रावकाचा अतीचार होतो. हा धनधान्य–प्रमाणातिक्रम या नांवाचा दुसरा अतीचार होय.

संतुष्ट झालेला राजा अथवा दुसरा कोणीही ह्याच्यापासून आपल्यास मिळत असलेलें सोनें किंवा रुपें, व्रताचा काल संपेपर्यंत आपल्यास घ्यावयाचें नाहीं ह्मणून 'व्रतकाल संपल्यावर मी घेईन' अशा बोलीनें दुसऱ्यास देणें. ह्यायोगानें परिग्रहपरिमाणाणुव्रत करणाऱ्या श्रावकाचा अतिचार होतो. ह्मणून तेंही करूं नये. हा कनकरूप्य–प्रमाणातिक्रम नांवाचा तिसरा अतीचार होय.

इतर धातूंचीं (कांसें, लोखंड, तांबें, शिसें, कथील वगैरेंची व मातीचीं) भांडीं व लांकडाचे रथ, गाडी वगैरे पदार्थ, हे अमुक इतकेच असावयाचे असा निश्चय करूनही, कांहीं कारणानें ते अधिक झाले असतां आपल्या पूर्वीच्या संख्येंतच त्या सर्वांचा समावेश करण्याच्या बुद्धीनें, थोरल्या भांड्यांत धाकटें भांडें घालून दोनीं

एकच मानून मोजणें, अथवा दोन भांड्यांची जोडी ठरवून मोजणें, किंवा आपला व्रतकाल संपेपर्यंत दुसऱ्या कोणाजवळ 'पुढें आह्मी घेऊं' अशा बोलीनें ठेवणें, असें केलें असतां परिग्रहपरिमाणाचा अतिक्रम होतो. ह्मणून तेंही करूं नये. हा कुप्यप्रमाणातिक्रम नांवाचा चवथा अतीचार होय.

गाई, ह्मशी वगैरे पशू, पक्षी, किंवा दास दासी वगैरे मनुष्यें, ह्यांत गर्भ उत्पन्न करविला असतां त्या गर्भाच्या योगानें ठरलेल्या परिमाणाचा अतिक्रम होतो. कारण गर्भयुक्त असलेली गाय, ह्मैस, घोडी किंवा पक्ष्यांच्या स्त्रिया अथवा मनुष्यास्त्रिया ह्या दिसण्यांत जरी एकव्यक्तिस्वरूपच दिसतात, तरी उदरांतील गर्भामुळें ते दोन जीव असल्यानें व्रतग्रहणकालीं ठरलेल्या संख्येचा अतिक्रम होतो. ह्मणून व्रताचा काल संपेपर्यंत कोणासही गर्भ धारण होऊं देऊं नये. हा संख्यातिक्रम नांवाचा पांचवा अतीचार होय.

हे अतीचार तत्त्वार्थसूत्राच्या अभिप्रायाप्रमाणें सांगितले. श्रीस्वामी समंतभद्राचार्य ह्यांच्या मताप्रमाणें जे अतीचार मानिले आहेत, ते वर दाखविलेल्या अतीचारांपेक्षां अगदींच भिन्न आहेत. ते येणेंप्रमाणें—

१ 'अतिवाहन' ह्मणजे लोभामुळें बैल वगैरे पशूस अथवा मनुष्यास त्याच्या शक्तीच्या बाहेरची मजल करविणें. २ 'अतिसंग्रह' ह्मणजे ह्या धान्यादिकांपासून पुढें आपल्यास अधिकद्रव्यलाभ होईल अशा लोभानें त्या धान्यादिकांचा अधिक संग्रह करणें. ३ 'विस्मय' ह्मणजे

जें धान्य अथवा दुसरा कोणताही पदार्थ आपण थोड्याशा नफ्यानें पूर्वी विकलें असेल, अथवा मुळींच त्याचा आपण संग्रह केला नसेल, अशा प्रसंगीं दुसऱ्यानें तेंच धान्य अथवा दुसरा पदार्थ विकल्यामुळें त्याला पुष्कळ नफा झालेला पाहिला असतां त्याबद्दल फार खेद होणें. ४ 'अतिलोभ' आपल्याला योग्य नफा झाला असतांही अधिक नफा मिळावा अशी इच्छा. ५ 'अतिभारवहन' ह्मणजे, लोभाच्या अधीन होऊन आपल्याला न जाईल इतकें ओझें घेणें. तसेंच सोमदेवपंडितांनीं 'पूर्वी जें परिमाण स्वीकारलें असेल, त्यापेक्षां अधिक संग्रह लोभामुळें केला असतां व्रताचा अतिचार होतो' असें सांगितलें आहे; ह्या सर्वांचाहि समावेश करणें आवश्यक आहे; ह्मणून 'दुसरेही कित्येक अतीचार होतात, ते तर्कानें जाणावेत' असें ग्रंथकारांनीं सांगितलें आहे. त्यायोगानें त्यांचाही संग्रह प्रकृत ग्रंथांत होतो, असें समजावें.

एवं निर्मलीकृतपरिग्रहव्रतपालकस्य फलं दृष्टान्तेन स्फुटयन्नाह—

आतां, ह्याप्रमाणें वर सांगितलेले दोष ज्यांत नाहींत अशा प्रकारच्या परिग्रहव्रताचें पालन करणारांस फल काय प्राप्त होतें, तें, उदाहरणानें स्पष्ट करून सांगतात.

यः परिग्रहसंख्यान- ।
व्रतं पालयतेऽमलम् ॥
जयवज्जितलोभोऽसौ ।
पूजातिशयमश्नुते ॥ ६५ ॥

टीका— यः पालयते रक्षयति । किं तत्परिग्रहसंख्यानव्रतं ।

कथं कृत्वा अमलं यथोक्तातिचाररहितं । असौ श्रावकः पूजातिशयं शक्रादिकृतामर्चनामश्नुते लभते । किंविशिष्टः यतो जितलोभः जितलोभत्वादित्यर्थः । किंवत् जयवत् मेघस्वराख्यकुरुराजो यथा ॥

अर्थ—जो मनुष्य परिग्रहाचें प्रमाण करण्याचें व्रत निरतिचार पाळतो तो हा निर्लोभ मनुष्य जयकुमाराप्रमाणें पूजातिशयाला पावतो.... इंद्रादिक देव त्याला मान देतात.

इत्थं निरतिचाराणुव्रतपरिणत्यनुपालनाय निर्मलशीलसप्तकपालनायामुपासकमुत्थापयितुं तदनुभावमाह—

ह्याप्रमाणें वर्णन केलेल्या पांचही प्रकारच्या व अतीचारवर्जित अशा अणुव्रतांच्या रक्षणाकरितां पुढें सांगितलेल्या निर्मलशीलसप्तकाच्या पालनाविषयीं उपासकाची प्रवृत्ती व्हावी ह्मणून त्या अणुव्रती जीवांचा प्रभाव कसा असतो; हें सांगतात.

पञ्चाप्येवमणुव्रतानि समतापीयूषपानोन्मुखे ।
सामन्येतरभावनाभिरमलीकृत्यार्पितान्यात्मनि ॥
त्रातुं निर्मलशीलसप्तकमिदं ये पालयन्त्यादरात् ।
ते सन्यासविधिप्रमुक्ततनवःसौवीःश्रियो भुंजते ॥६६॥

टीका—भुञ्जते अनुभवन्ति । के ते निर्मलाणुव्रतशीलपालिनो भव्याः । काः श्रियः सम्पदः । किंविशिष्टाः सौवीः स्वर्भवाः यथास्वं सौधर्माद्यच्युतान्तकल्पसम्बान्धिनीः । किंविशिष्टाः सन्तः सन्न्यासेत्यादि सन्न्यासविधिना सप्तदशाध्यायोक्तेन प्रकर्षेण सकलसङ्गसमक्षतालक्षणेन मुक्ता त्यक्ता तनुः शरीरं यैस्ते यथोक्ताः । सति

साधने निस्तरणभणितिरियं । ये के ये पालयन्ति । किं तत् इद-मनन्तराध्याये वक्ष्यमाणं । निर्मलशीलसप्तकं । कस्मात् आदरात् तत्परतया । किं कर्तुं त्रातुं पालयितुं । निर्वहणार्थमिदं । कानि अणुव्रतानि । कति पञ्च अपिशब्दादेकं द्वे त्रीणि चत्वारि वा । कथं एवं उक्तप्रकारेण । किंविशिष्टानि सन्ति अर्पितानि परिणमितानि । क्व आत्मनि अन्तस्तत्त्वे । उद्यपनप्रकाशनेयं । किंविशिष्टे समतापीयूषपानोन्मुखे साम्यामृतपानाद्यभिमुखे । किं कृत्वा अमलीकृत्य तत्तदतीचारेभ्यः प्रच्याव्य । उद्द्योतनोक्तिरियं । काभिः सामान्येतरभावनाभिः सामान्यभावनाभिर्मैत्र्यादिभिर्विशेषभावनाभिः प्रतिव्रतं पञ्चशो नियमिताभिर्महाव्रताधिकारोक्ताभिरिति भद्रम् ॥

अर्थ—ह्याप्रमाणें सामान्यभावना व विशेषभावना ह्या दोहोंच्या योगानें अतिचारांचें निवारण करून, सर्वत्र समबुद्धि असणें हेंच जें अमृत त्याच्या पानाविषयीं ( सर्वत्र समान दृष्टि ठेवण्याविषयीं ) उद्युक्त असलेल्या आत्म्याचे ठिकाणीं ज्यांचा संस्कार घडविला आहे अशीं पांचही अणुव्रतें रक्षण करण्याकरितां; जे भव्य जीव, पुढें ( पुढल्या अध्यायांत ) सांगितलेल्या शीलसप्तकाचें परमादरानें पालन करितात, ते भव्यजीव ज्यांनीं सर्वांसमक्ष संन्यासविधीनें आपल्या देहाचा त्याग केला आहे असे होत्साते—स्वर्गांतील संपत्तीचा अनुभव करितात.

इत्याशाधरविरचितायां स्वोपज्ञधर्मामृतसागारधर्मदीपिकायां
भव्यकुमुदचन्द्रिकासञ्ज्ञायामादितस्त्रयोदशः
प्रक्रमाच्च चतुर्थोऽध्यायः समाप्तः ॥

**अध्याय चवथा समाप्त.**

## ॥ अथ पञ्चमोऽध्यायः ॥

अथ शीलसप्तकं व्याकर्तुकामस्तद्विकल्पभूतानि गुणव्रतानि तावल्लक्षयति—

आतां; शीलसप्तकाचें स्पष्टीकरण करण्याकरितां तदंगभूत असलेल्या गुणव्रतांचें स्वरूप सांगतात.

यद्गुणायोपकाराया- ।
णुव्रतानां व्रतानि तत् ॥
गुणव्रतानि त्रीण्याहु- ।
र्दिग्विरत्यादिकान्यपि ॥ १ ॥

टीका—तत्तस्मादाहुर्ब्रुवन्ति । स्वामिमतानुसारिणः । कानि गुणव्रतानि कति त्रीणि । कानि तानि दिग्विरत्यादिकानि दिग्विरतिमनर्थदण्डविरतिं भोगोपभोगपरिमाणं । अपिशब्दः सितपटोक्तखरकर्मज्ञापनार्थः । यद्यस्मात् भवन्त्यमूनि व्रतानि । कस्मै गुणाय। कोऽर्थः उपकाराय । केषामणुव्रतानाम् ॥

अर्थ— ज्याकरितां—दिग्विरति वगैरे हीं तीन व्रतें, अणुव्रतांचीच पूर्णता करणारीं आहेत— त्याकरितां ह्या दिग्विरत्यादि तीन व्रतांस जैनमतानुयायी पंडित गुणव्रतें असें ह्मणतात.

किं तद्दिग्व्रतमित्याह —

आतां त्यांतील दिग्व्रत कोणतें तें सांगतात.

यत्प्रसिद्धैरभिज्ञानैः ।
कृत्वा दिक्षु दशस्वपि ॥

नात्येत्यणुव्रती सीमां ।
तत्स्याद्दिग्विरतिर्व्रतम् ॥ २ ॥

टीका— स्यात् । किं तत् व्रतं गुणव्रतमित्यर्थः । नामैकदेशो हि व्रतशब्दो नाम्न्यपि वर्तते भीमादिवत् । किं नाम दिग्विरतिः दिक्षु विरतिर्नियमितसीम्नो बहिर्यातायातानिवृत्तिः । यत्किं यन्नात्येति नातिक्रम्य गच्छति । कोऽसावणुव्रती न तु महाव्रती तस्य सर्वारम्भपरिग्रहविरतत्वेन समितिपरत्वेन च नृलोके यथाकामं सञ्चाराद्दिग्विरत्यनुपपत्तेः । कां नात्येति सीमां मर्यादां । किं कृत्वा प्रतिपद्य । कां सीमां । कासु दिक्षु । कतिषु दशसु । अपिशब्दादेकद्वित्र्यादिष्वपियावज्जीवमल्पकालं चापि । कैरभिज्ञानैः समुद्रनद्यादिभिश्चिन्हैः । किंविशिष्टैः प्रसिद्धैः दिग्विरतिमर्यादाया दातुर्गृहीतुश्च प्रतीतैः ॥

अर्थ— जें, अणुव्रती श्रावक प्रसिद्ध अशा नदी पर्वत वगैरे खुणांनीं दशदिशांचे ठिकाणीं एक मर्यादा ठरवून, यावज्जीवपर्यंत किंवा कांहीं कालपर्यंत, त्या मर्यादेचें उल्लंघन करीत नाहीं, तें 'दिग्विरतिव्रत' होय!

दिग्व्रतेनाणुव्रतिनोऽपि महाव्रतित्वमुपपादयति—

आतां; ह्या दिग्विरतिव्रतानें अणुव्रतीदेखील महाव्रती होतो, असें उपपादन करितात.

दिग्विरत्या बहिः सीम्नः ।
सर्वपापनिवर्तनात् ॥
तप्तायोगोलकल्पोऽपि ।
जायते यतिवद्गृही ॥ ३ ॥

**टीका**— जायते भवति । गृही । किंवत् यतिवत् महाव्रती यथा । कस्मात्सर्वपापनिवर्तनात् सर्वपापानि स्थूलेतरहिंसादीनि भोगोपभोगादीनि च तेभ्यो निवर्तनात् विरमणात् तेषां निवारणाद्वा । क बहिः परतः । कस्याः सीम्नः प्रतिपन्नमर्यादायाः । कया दिग्विरत्या दिग्विरतिगुणव्रतेन । किंविशिष्टोऽपि गृही तप्तायोगोलकल्पोऽपि सन्तप्तलोहपिण्ड इव आरम्भपरिग्रहपरत्वेन सर्वत्र गमनभोजनशयनादिक्रियासु जीवोपमर्दकरत्वात् ॥

**अर्थ**— दिग्विरतिव्रताच्या योगानें, तें व्रत करणाऱ्या श्रावकाचीं सर्वप्रकारचीं पापें, आपण केलेल्या मर्यादेच्या बाहेर करणेचीं बंद झाल्यामुळें, तो श्रावक, लोखंडाच्या तापलेल्या गोळयासारखा जरी असला ( ज्याप्रमाणें तापलेला लोखंडाचा गोळा उगीच हलला तरी सहज हिंसा होते त्याप्रमाणें ज्याच्या हातून इच्छा नसतांही गमन, शयन, भोजन इत्यादि व्यवहारांत सहज हिंसा होते असा असला ) तथापि एकाद्या यतीप्रमाणें होतो.

एतदेव दृढयन्नाह—

हेंच ह्मणणें बरोबर आहे असें निश्चित होण्याकरितां सांगतात.

दिग्व्रतोद्रिक्तवृत्तघ्न- ।
कषायोदयमान्द्यतः ॥
महाव्रतायतेऽलक्ष्य- ।
मोहे गेहिन्यणुव्रतम् ॥ ४ ॥

**टीका**— महाव्रतायते महाव्रतमिवाचरति नियमितदिग्विभागाद्बहिः सर्वसावद्यनिवर्तकत्वात् । न तु महाव्रतं भवति तत्प्रति-

बन्धकोदयसद्भावात् । किं तत् अणुव्रतं । क गेहिनि गृहस्थे । किंविशिष्टेऽलक्ष्यमोहे निश्चेतुमशक्यभावे प्रत्याख्यानावरणाख्यचारित्रमोहपरिणामे । कस्मात् दिग्व्रतेत्यादि दिग्व्रतेनोद्रिक्तमुत्कर्षं नीतं व्रतघ्नकषायाणां प्रत्याख्यानावरणाख्यद्रव्यक्रोधादीनामुदयस्य विपाकस्य मान्द्यमनौत्कट्यं यत्तस्मात् दिग्विरतिमन्दतरीकृतप्रत्याख्यानावरणविपाकादित्यर्थः ॥

**अर्थ—व्रतविघातक अशा क्रोधादि कषायांस दिग्विरतिव्रताच्या उत्कर्षानें जो मंदपणा येतो त्यामुळें-ज्याचे ठिकाणीं चारित्रमोह अवश्य असलाच पाहिजे असें ह्मणतां येत नाहीं अशा गृही श्रावकाचेठायीं कोणतेंही व्रत-महाव्रताप्रमाणेंच होतें.**

दिग्विरत्यतिचारानाह—

**आतां; दिग्विरतिव्रताचे अतीचार सांगतात.**

> सीमाविस्मृतिरूर्ध्वाध- ।
> स्तिर्यग्भागव्यतिक्रमाः ॥
> अज्ञानतः प्रमादाद्वा ।
> क्षेत्रवृद्धिश्च तन्मलाः ॥ ५ ॥

टीका—भवन्ति । के ते तन्मलाः दिग्व्रतातिचाराः । कति पञ्च । कथं सीमविस्मृतिरूर्ध्वभागव्यतिक्रमोऽधोभागव्यतिक्रमस्तिर्यग्भागव्यतिक्रमः क्षेत्रवृद्धिश्चेति । कस्मात् अज्ञानतः प्रमादाद्वेति संक्षेपः । इतो विस्तरः- तत्र सीमविस्मृतिः- नियमितमर्यादाया अज्ञानतो मत्यपाटवसन्देहादिना प्रमादाद्वाऽतिव्याकुलत्वान्यमनस्कत्वादिना स्मृतिभ्रंशः । तथाहि केनचित्पूर्वस्यां दिशि योजनशतरूपं परिमाणं कृतमासीत् । गमनकाले च स्पष्टतया न स्मरति

किं शतं परिमाणं कृतमुत पञ्चाशत् तस्य चैवं पञ्चाशतमतिक्रामतोऽतिचारः। शतमतिक्रामतो भङ्गः सापेक्षत्वनिरपेक्षत्वाच्चेति प्रथमोऽतिचारः। ऊर्ध्वेत्यादि— ऊर्ध्वं गिरितरुशिखरादेः, अधो ग्रामभूमिगृहकूपादेः, तिर्यक्भूर्वादिदिक्षु येऽमी भागा नियमितप्रदेशास्तेषां व्यतिक्रमाः लङ्घनानि। एते च त्रयोऽनाभोगातिक्रमादिभिरेवातिचारा भवन्ति। अन्यथा प्रवृत्तौ तु भङ्गा एव। क्षेत्रवृद्धिः— क्षेत्रस्य पूर्वादिदेशस्य दिग्विरतिविषयस्य ऱ्हस्वस्य सतो वृद्धिः पश्चिमादिक्षेत्रान्तरपरिमाणप्रक्षेपेण दीर्घीकरणं। तथाहि केनचित्पूर्वापरदिशोः प्रत्येकं योजनशतं परिमाणीकृत्यैकत्र क्षेत्रं गमनकाले वर्द्धयतो व्रतसापेक्षत्वादतिचारः। यदि चाप्रणिधानात् क्षेत्रपरिमाणमतिक्रान्तं भवति तदा निवर्तितव्यं ज्ञाते वा न गन्तव्यमन्योऽपि न विसर्जनीयः। अथाज्ञतया कोऽपि गतः स्यात्तदा यत्तेन लब्धं तत्त्याज्यमिति पञ्चमः॥

**अर्थ— १ सीमविस्मृति, २ ऊर्ध्वभागव्यतिक्रम, ३ अधोभागव्यतिक्रम, ४ तिर्यग्भागव्यतिक्रम आणि ५ क्षेत्रवृद्धि हीं पांच कर्में, न समजून अथवा चुकीमुळें ( लक्ष नसून ) झालीं असतां दिग्विरतिव्रताचे अतीचार होतात. ह्यांचें विवरण पुढें लिहिल्याप्रमाणें—**

**१ सीमविस्मृति ह्मणजे अज्ञान, बुद्धीचा अचतुरपणा, संशय, चुकी, मनास सुचेनासें होणें किंवा तें दुसरीकडे गुंतणें, ह्यापैकीं कोणत्याही कारणामुळें पूर्वीं ठरलेली मर्यादा विसरणें होय. ह्यामुळें अतीचार होतो. तो असा कीं, कोणी एका श्रावकानें पूर्वदिशेकडे शंभर योजनें पर्यंत मर्यादा ठरविली असून तो त्या दिशेकडे जाऊं लागला असतां 'आपण पूर्वीं शंभर योजनें ठरविली**

आहे कीं पन्नास योजनें ठरविली आहे? ह्याचें विस्मरण झाल्यामुळें जर पन्नास योजनांहून अधिक जाईल तर वास्तविक मर्यादा पुढेंच असल्यानें अतीचार होतो. व शंभर योजनांहून अधिक जाईल तर वास्तवीक मर्यादेचा अतिक्रम झाल्यामुळें व्रताचा भंग होतो.

२ उर्ध्वभागातिक्रम ह्मणजे पर्वत, वृक्ष वगैरे उंच प्रदेशावर अमूक इतकेंच जाईन अशी मर्यादा ठरवून तिचें उल्लंघन करणें.

३ अधोभागव्यतिक्रम ह्मणजे तळघरें, आड, विहीरी वगैरे ह्यांत उतरण्या संबंधानें केलेल्या मर्यादेचा अतिक्रम करणें.

४ तिर्यग्भागव्यतिक्रम ह्मणजे तिरकस जाण्यासंबंधी केलेल्या मर्यादेचें उल्लंघन करणें. ऊर्ध्वभागव्यतिक्रम वगैरे हे तीनही अतीचार पहिल्या अतिचारांत सांगितल्याप्रमाणें मर्यादेची विस्मृति होऊनही वास्तवीक असलेल्या मर्यादेचें उल्लंघन झालें नसेल तरच समजणेचे आहेत. वास्तवीक ठरलेल्या मर्यादेचा अतिक्रम झाला असतां अतीचार न होतां पूर्वीप्रमाणें व्रतभंगच होतो असें समजावें.

५ क्षेत्रवृद्धि ह्मणजे चारी दिशेस जी मर्यादा ठरविली असेल ती वाढविणें. उदाहरण—पूर्वेकडे व पश्चिमेकडे शंभर शंभर योजनें मर्यादा ठरविली असतां, पूर्वेकडील मर्यादेंत आपल्या सोयीकरितां पश्चिमेकडील कांहीं अंश सामील करून पूर्वेकडील मर्यादा सवाशें योजनें अथवा दीडशें योजनें असें समजून पश्चिमेकडील मर्यादा पाउणशें योजनें अथवा पन्नास योजनें असें समजणें. ह्यांत

पूर्वेकडील मर्यादा जरी वाढविली आहे तथापि पूर्व व पश्चिम दोहोंकडील मिळून जें दोनशें योजनांचें क्षेत्र ठरलें आहे तें वाढविलें असें होत नाहीं. ह्मणून व्रतभंग न होतां ह्या क्रियेनें केवल अतीचारच होतो. जर लक्ष नसल्यामुळें वास्तविक क्षेत्रमर्यादेचें उल्लंघन झालें असेल तर तेथूनच मागें परतावें. आणि जर आपण केलेल्या मर्यादेचें आपल्यास ज्ञान असेल तर पुढें जाऊं नये. आणि अज्ञानानें जर एखाद्यानें क्षेत्रमर्यादेचा अतिक्रम केला असेल तर त्यानें त्या अधिक झालेल्या क्षेत्रांत जें आपल्याला मिळालें असेल त्याचा त्याग करावा.

अथानर्थदण्डव्रतं लक्षयति—

आतां; अनर्थदंडव्रताचें लक्षण सांगतात.

पीडा पापोपदेशाद्यै- ।
देहाद्यर्थाद्विनाऽङ्गिनाम् ॥
अनर्थदण्डस्तत्त्यागो ।
ऽनर्थदण्डव्रतं मतम् ॥ ६ ॥

**टीका—**मतं सम्मतं सूरीणां । किं तत् अनर्थदण्डव्रतं । किं तत्तत्त्यागस्तस्यानर्थदण्डस्य वर्जनं । यः किं योऽनर्थदण्डः । किं पीडा पीडनं । केषां अङ्गिनां त्रसस्थावरजीवानां । कैः पापोपदेशाद्यैः पापोपदेशहिंसादानदुःश्रुत्यपध्यानप्रमादचर्याख्यैर्व्यापारैः । कथं विना । कस्मात् देहाद्यर्थात् स्वस्य स्वकीयजनानां वा शरीरवाङ्मनःप्रयोजनात् ॥

**अर्थ—**आपलें अथवा आत्मीय अशा दुसऱ्या कोणाचें योग्य कार्य व्हावयाचें असल्यावांचून पापोपदेशादि व्यापा-

रांनीं–( पापोपदेश, हिंसादान, दुःश्रुति, अपध्यान व प्रमादचर्या हे पापोपदेशादिव्यापार असें समजावें. ह्यांचा अर्थ पुढें येणार आहे. ) त्रस किंवा स्थावर जीवांस पीडा करणें, ह्यास 'अनर्थदंड' असें ह्मणतात; आणि ह्या अनर्थदंडाचा जो त्याग त्यास 'अनर्थदंडव्रत' असें नांव आहे.

पापोपदेशस्वरूपं तद्विरतिं चाह—

आतां; पापोपदेशाचें स्वरूप सांगून त्याचा त्याग करावा असें सांगतात.

पापोपदेशो यद्वाक्यं ।
हिंसाकृष्यादिसँश्रयम् ॥
तज्जीविभ्यो न तं दद्या- ।
न्नापि गोष्ठ्यां प्रसञ्जयेत् ॥ ७ ॥

टीका—भवति कोऽसौ स पापोपदेशः । यत्किं यद्वाक्यं । किंविशिष्टं हिंसाकृष्यादिसंश्रयं । हिंसा मृषावादादिभिः कृषिवाणिज्यादिभिश्च संश्रयः सम्बन्धो यस्य तत्तथोक्तं तद्विषयमित्यर्थः । हिंसाद्यारम्भेति पाठे तु हिंसादिप्रधाना आरम्भा उपक्रमा इति व्याख्येयं । न दद्यात् मृगास्तोयाशयमायाताः किमुपविष्टास्तिष्ठतेत्यादिरूपेण न सम्पादयेत् । कोऽसावनर्थदण्डव्रतार्थी । कं तं पापोपदेशं । केभ्यः तज्जीविभ्यः व्याधवञ्चकचोरादिभ्यः कृषीवलकिरातादिभ्यश्च । नापि प्रसञ्जयेत् पुनःपुनः प्रवर्तयेत् कथान्तरसम्बन्धे वा नावतारयेत् । कं तं । कस्यां गोष्ठ्यां सङ्कथायाम् ॥

**अर्थ—हिंसा, कृषि इत्यादींसंबंधीं जें बोलणें त्यास 'पापोपदेश' असें ह्मणतात. ह्मणून हिंसा कृषी इत्या-**

दिकांवर उदरनिर्वाह करणाऱ्या मनुष्यांस तो पापोपदेश करूं नये. इतकेंच नव्हे, तर त्यांचीं मनें हिंसादि व्यापारासंबंधीं गोष्टींत सुद्धां आसक्त करूं नयेत. तात्पर्य, एखाद्या पारध्यास ' अरे तळयांत हरीण पाणी पिण्यास आले आहेत, तूं असा स्वस्थ कां बसलास ' असें बोलूं नये. कारण, त्या पारध्यास ह्या भाषणानें आपण हिंसेस प्रवृत्त केल्यासारखें होतें. त्याचप्रमाणें कृषीसंबंधी भाषणही हिंसा करण्यास प्रवृत्त करणारें असल्यामुळें कृषीवलाशीं ह्मणजे शेतकऱ्याशीं तें बोलूं नये.

हिंसोपकरणदानपरिहारमाह—

आतां; हिंसेला साधनीभूत असलेल्या वस्तू न देणें ( हिंसादान ) ह्याविषयीं सांगतात.

हिंसादानं विषास्त्रादि- ।
हिंसाङ्गस्पर्शनं त्यजेत् ॥
पाकाद्यर्थं च नाग्न्यादि ।
दाक्षिण्याविषयेऽर्पयेत् ॥ ८ ॥

टीका—त्यजेन्न कुर्यादनर्थदण्डव्रतार्थी । किं तत् हिंसोपकरणानां दानं हिंसादानं । मयूरव्यंसकत्वात्समासः । तदेव व्याचष्टे विषास्त्रेत्यादिना विषास्त्रादीनां गरलप्रहरणहलशकटकुशिकुद्दालादीनां हिंसांगानां प्राणिवधसाधनानां स्पर्शनं दानं विषास्त्रादिहिंसाङ्गस्पर्शनं । न चार्पयेत् नापि ढौकयेदसौ । किं तत् अग्न्यादि वन्हिघरट्टमुसलोलूखलादि । किमर्थं पाकाद्यर्थं पचनपेषणकुट्टनादिनिमित्तं । क्व दाक्षिण्याविषये परस्परव्यवहारविषयादन्यत्र ॥

**अर्थ—** अनर्थदंडव्रत करणाऱ्या श्रावकानें हिंसादान

ह्मणजे विष, शस्त्र वगैरे हिंसेचीं साधनें दुसऱ्यानें मागितलीं असतां देणें हें करूं नये. तसेंच अन्नसिद्धि करण्याकरितां लागणारे अग्नि, उखळ, मुसळ वगैरे पदार्थ, ज्याविषयीं आपल्यास भरंवसा नाहीं अशा मनुष्यास देऊं नयेत.

दुःश्रुत्यपध्यानयोः स्वरूपं परिहारं चाह—

आतां; दुःश्रुति व अपध्यान ह्यांचें स्वरूप व त्यांचा त्याग हें सांगतात.

चित्तकालुष्यकृत्काम- ।
हिंसाद्यर्थश्रुतश्रुतिम् ॥
न दुःश्रुतिमपध्यानं ।
नार्तरौद्रात्म चान्वियात् ॥ ९ ॥

टीका—नान्वियात् नानुवर्तयेत् प्रसङ्गवशादायातमपि तत्क्षणान्निवर्तयेदित्यर्थः । कोऽसावनर्थदण्डव्रतार्थी । कां दुःश्रुतिं । कीदृशीं चित्तेत्यादि । कामश्च मन्मथो हिंसा च प्राणातिपातः कामहिंसे ते आदी येषां आरम्भादीनां ते कामहिंसादयोऽर्था अभिधेया येषां तानि कामहिंसाद्यर्थानि तानि श्रुतानि शास्त्राणि । तत्र कामशास्त्रं वात्स्यायनादि । हिंसाशास्त्रं लटकादिमतं । आरम्भपरिग्रहशास्त्रं वार्तानीतिः । साहसशास्त्रं वीरकथा । मिथ्यात्वशास्त्रं ब्रह्माद्वैतादि मतं । मदशास्त्रं वर्णानां ब्राह्मणो गुरुरित्यादिग्रन्थः । रागशास्त्रं वशीकरणादितन्त्रं । तेषा श्रुतिराकर्णनं उपलक्षणादर्जनाद्यपि । चित्तस्य मनसः कालुष्यं रागद्वेषाद्यावेशश्चित्तकालुष्यं तत्करोतीति चित्तकालुष्यकृत् । सा चासौ कामहिंसाद्यर्थश्रुतश्रुतिश्च ताम् । न चान्वियादसौ । किं तत् अपध्यानं अपकृष्टं ध्यानमेकाग्रचिंतानिरोधं । किंरूपं आर्तरौद्रात्म आर्तं ऋते दुःखे भवं । यदि

वा अर्तिः पीडा यातना च तत्र भवं। रौद्रं रोधयति अपरानिति रुद्रो दुःखहेतुस्तेन कृतं तस्य वा कर्म। आर्तं च रौद्रं च आर्तरौद्रे ते आत्मानौ स्वभावौ यस्य तदार्तरौद्रात्म आर्तरौद्रविकल्पमित्यर्थः। न दुःश्रुतिमपध्यानमार्तरौद्रात्म चान्वियादिति पाठे तु– दुःश्रुतिं कामादिशास्त्रश्रवणलक्षणां, अपध्यानं च नरेन्द्रत्वखचरत्वाप्सरोविद्याधरीपरिभोगादिविषयं, आर्तं वैरिघाताग्निघातादिविषयं, रौद्रं वा नान्वियादिति व्याख्येयम् ॥

अर्थ—अनर्थदंडव्रताची इच्छा करणाऱ्या श्रावकानें दुःश्रुति ( अंतःकरणास बिघडविणारें कामशास्त्र हिंसाशास्त्र वगैरे शास्त्रांचें श्रवण ) करूं नये. ( कामशास्त्र ह्मणजे वात्स्यायनानें केलेलें अनंगशास्त्र. हिंसाशास्त्र ह्मणजे चरकादिकांनीं सांगितलेली शस्त्रक्रिया (फाडण्याची क्रिया). आरंभशास्त्र ह्मणजे परिग्रहाविषयींचें शास्त्र. वार्ता ह्मणजे दंडनीति. साहसशास्त्र ह्मणजे वीरांच्या गोष्टी. मिथ्यात्वशास्त्र ह्मणजे ब्रह्माद्वैतमत वगैरे. मदशास्त्र ह्मणजे 'ब्राह्मण सर्व वर्णांचा गुरु आहे' अशा प्रकारचीं वाक्यें. रागशास्त्र ह्मणजे वशीकरण वगैरे तंत्र. तसेंच, अपध्यान ह्मणजे आर्तध्यान व रौद्रध्यान हीं दोन्हीं टाकावींत.

प्रमादचर्यालक्षणं तत्त्यागं च श्लोकद्वयेनाह—

आतां; दोन श्लोकांनीं प्रमादचर्येचें स्वरूप व तिचा त्याग हें सांगतात.

प्रमादचर्यां विफल- ।
क्ष्मानिलाग्न्यम्बुभूरुहाम् ॥
खातव्याघातविध्याप-

सेकच्छेदादि नाचरेत् ॥ १० ॥

टीका—नाचरेत् न कुर्यादनर्थदण्डविरतः। कां प्रमादचर्यां। किंरूपां विफलमित्यादि। विफलं निष्प्रयोजनं क्ष्मादीनां खातादि विफलभूखननादिलक्षणमित्यर्थः। तत्र क्ष्मायाः भूमेः खातं खननं विफलं नाचरेत्। अनिलस्य वातस्य व्याघातं स्वयमागच्छतः कवाटादिना प्रतिबन्धं विफलं नाचरेत्। अग्नेर्विध्यापं जलादिना विध्यापनं विफलं नाचरेत्। अम्बुनो जलस्य सेकं सेचनं भूम्यादौ प्रक्षेपं विफलं नाचरेत्। भूरुहां वनस्पतीनां छेदादि छेदनपत्रपुष्पफलत्रोटनादि विफलं नाचरेत् ॥

अर्थ—प्रमादचर्या ह्मणजे कांहीं फल नसतां उगीच जमीन उकरणें, वारा आपल्याकडे येत असतां उगीच त्याला प्रतिबंध करणें, अग्नीवर उगीच पाणी शिंपडून विझाविणें, वाटेल तेथें कारणावाचून जमिनीवर पाणी शिंपडणें, कारणावांचून एखाद्या वृक्षाची फांदी किंवा पानें अगर फळें तोडणें हे व्यापार करूं नयेत.

तद्वच्च न सरेद्व्यर्थं।
न परं सारयेन्महीम् ॥
जीवघ्नजीवान् स्वीकुर्या-।
न्मार्जारशुनकादिकान् ॥ ११ ॥

टीका—न सरेत्करचरणादिव्यापारं न कुर्यात्। किंविशिष्टं व्यर्थं निष्प्रयोजनं। किंवत् तद्वच्च क्ष्माखननादिवदेवं तथा न सारयेत् करचरणादिव्यापारं न कारयेत्। कं परं भृत्यादिकं। कथं व्यर्थं वृथा। न स्वीकुर्यात् न परिगृह्णीयात्। कान् जीवघ्न-

जीवान् प्राणिघातकप्राणिनः। किंविशिष्टान् मार्जारशुनकादिकान् बिडालमण्डलनकुलकुक्कुटप्रभृतीन्। कथं नियमेन फलवतोऽपि नात्मसात्कुर्यादित्यर्थः ॥

अर्थ—तसेंच आपण उगीच हातपाय वगैरे हालवूं नयेत व दुसऱ्यासही हालवावयास लावूं नयेत; आणि दुसऱ्या जीवांस मारणारे असे मांजर, कुत्रा, मुंगुस, कोंबडा वगैरे प्राणी बाळगूं नयेत.

अनर्थदण्डव्रतातिचारपरिहारमाह—

आतां; अनर्थदंडव्रताचे अतीचार सांगून त्यांचा त्याग करावा हें सांगतात.

मुञ्चेत्कन्दर्पकौत्कुच्य- ।
मौखर्याणि तदत्ययान् ॥
असमीक्ष्याधिकरणं ।
सेव्यार्थाधिकतामपि ॥ १२ ॥

टीका—मुञ्चेद्वर्जयेदनर्थदण्डविरतः। कान् तदत्ययान् तद्व्रतातिचारान्। किंविशिष्टान् कन्दर्पादीन् पञ्च। तत्र कन्दर्पः कामस्तद्धेतुस्तत्प्रधानो वाक्प्रयोगोऽपि कन्दर्पो रागोद्रेकात्प्रहासमिश्रोऽशिष्टवाक्प्रयोग इत्यर्थः। कौत्कुच्यं कुदिति कुत्सायां निपातो निपातानामानन्त्यात्। कुत् कुत्सितं कुचति भ्रूनयनौष्ठनासाकरचरणमुखविकारैः संकुचतीति कुत्कुचः सङ्कोचादिक्रियाभाक् तद्भावः कौत्कुच्यं। प्रहासो भण्डिमावचनं च भण्डिमोपेतकायव्यापारप्रयुक्तमित्यर्थः। एषः पूर्वश्च द्वावपि प्रमादचर्याविरतेरतिचारौ। मौखर्यं मुखमस्यास्तीति मुखरोऽनालोचितभाषी वाचाटस्तस्य भावो धाष्टर्यप्रायमसत्यासंबद्धबहुप्रलापित्वं। अयं च पापो-

पदेशविरतेरतीचारो मौखर्ये सति पापोपदेशसम्भवादिति तृतीयः । असमीक्ष्याधिकरणं प्रयोजनमनालोच्य कार्यस्याधिक्येन करणं। यथा बहुमपि कटमानयत, यावता मे प्रयोजनं तावदहं क्रेष्यामि शेषमन्ये बहवोऽर्थिनः सन्ति तेऽपि क्रेष्यन्ति अहं विक्रापयिष्यामी-त्येवमनालोच्य बह्वारम्भतृणाजीविभिः कारयति । एवं काष्ठच्छेदे-ष्टकापाकादिष्वपि वाच्यं । तथाहि स्वोपकरणं हिंसोपकरणान्तरेण संयुक्तं धारयति यथा संयुक्तमुलूखलेन मुसलं हलेन फालं शक-टेन युगं धनुषा शरान् इत्यादि । तथा सति यः कश्चित् संयु-क्तमुलूखलमुसलादिकमाददीत । वियुक्ते तु तस्मिन् सुखेन परः प्रतिषेद्धुं शक्यते । एतद्धिंसोपकारिदानविरतेरतीचारः । सेव्या-र्थाधिकतां सेव्यस्य भोगोपभोगलक्षणस्य जनको यावानर्थस्ततोऽ धिकस्य तस्य करणं भोगोपभोगानर्थक्यमित्यर्थः । अत्रायं सम्प्र-दायः यदि बहूनि स्नानसाधनानि तैलखल्यामलकादीनि गृह्णाति तदा लौल्येन बहवः स्नानार्थं तडागादौ गच्छन्ति । ततश्च पूरकायाप्कायिकादिवधोऽधिकः स्यात् । न चैवं युज्यते ततो गृह एव स्नातव्यं । तदसम्भवे तु तैलादिभिर्गृह एव शिरो घर्षयित्वा तानि सर्वाणि साधयित्वा तटागादितटे निविष्टो गालितजलेना-ञ्जलिभिः स्नायात् । तथा येषु पुष्पादिषु संसक्तिः सम्भवति तानि परिहरेदिति सर्वत्र वक्तव्यमिति षष्ठोऽपि प्रमादविरतेरतिचारः ॥

अर्थ—अनर्थदंडव्रती श्रावकानें कंदर्प, कौत्कुच्य, मौखर्य, असमीक्ष्याधिकरण व सेव्यार्थाधिकता हे पांचही अतीचार सोडावेत! [ ह्यांचें स्पष्टीकरण असें— १ कंदर्प ह्मणजे ज्यांत स्त्रीसंभोगेच्छा गर्भित आहे असें परिहासयुक्त ग्राम्य भाषण. २ कौत्कुच्य ह्मणजे चावटपणानें केलेला नाक मुरडणें भोवयी चढविणें वगैरे शरीरव्यापार. हे

दोनीही प्रमादचर्याविरतीचे अतीचार आहेत. ३ मौखर्य (उरमटपणानें खोटें व असंबद्ध असें पुष्कळ बोलणें.) हा पापोपदेशविरतीचा अतीचार होतो. ४ असमीक्ष्याधिकरण ह्मणजे उपयोगांचा विचार न करता कोणतेंही कृत्य आवश्यक असल्यापेक्षां अधिक करणें. जसें एखाद्यास 'तूं पुष्कळ गवत काप' मला जेवढें पाहिजे आहे तेवढें मी घेईन!! राहिलेलें गवत दुसरे जरूरी असलेले लोक पुष्कळ आहेत, ते घेतील; नाहींतर मी विकून देईन!!! असें, विचार न करतां बोलून गवत कापण्यासंबंधानें आधिक हिंसा करावयास लावणें. तसेंच हिंसेस साधनीभूत असलेले उखळ, मुसळ, नांगर व फाळ, गाडी व तिचें जू धनुष्य व बाण वगैरे पदार्थ एकमेकांशीं विलग न ठेवितां मुसळ उखळाजवळ ठेवणें, नांगरास फाळ लाऊन ठेवणें. हे पदार्थ संयुक्त असलेले जर कोणीं एखाद्यानें पाहिले तर तो धान्य कांडणें वगैरे त्यापासून होणारें आपलें कार्य करून घेण्यास प्रवृत्त होईल व ह्या योगानें हिंसेला मदत केल्यासारखें होईल. ह्मणून ते पदार्थ विलग असेच ठेवावेत. ह्मणजे त्या पदार्थांची इच्छा करणाऱ्या मनुष्याचा निषेध करता येतो. असमीक्ष्याधिकरण हा हिंसादानविरतीचा अतीचार आहे.

५ सेव्यार्थाधिकता ह्मणजे भोगोपभोगास साधनीभूत असलेले पदार्थ आपल्यास पाहिजे असतील त्यापेक्षां अधिक संपादन करणें. ह्यासंबंधानें प्राचीनांची अशी प्रवृत्ती आहे कीं; स्नानास लागणारें तेल, आवळा वगैरे पदार्थ पुष्कळ घेऊन स्नानाकरितां तळयास अथवा

नदीस जातात. तसें केलें ह्मणजे त्या पदार्थांच्या लोभानें ( स्नानाचे वेळीं आपल्यालाही अंगास ते लावण्यास मिळतील अशा लोभानें ) पुष्कळ मंडळी स्नानाकरितां येतात. मग तितक्या लोकांनीं तें तेल वगैरे पदार्थ आपापल्या डोक्यास लाऊन घांसल्यानें पुष्कळ जीवांची हिंसा होते. ह्मणून तसें न करतां तेल वगैरे पदार्थांनीं आपण आपलें शरीर घरींच मर्दन करावें व स्नानही घरींच करावें. तसें होणें शक्य नसेल तर तळ्यावर वगैरे स्नानास जावें, व वस्त्रपूत केलेल्या उदकानें आपल्या ओंजळीनें स्नान करावें. ह्याप्रमाणें केलें असतां हिंसेस मदत केल्यासारखें होत नसून हिंसाही अधिक होत नाहीं. ह्मणून सेव्यार्थाधिकतेचा त्याग केला पाहिजे. ही ( सेव्यार्थाधिकता ) प्रमादचर्याविरतीचाच अतिचार होतो.

अथ भोगोपभोगपरिमाणाख्यतृतीयगुणव्रतस्वीकरणविधिमाह—

आतां; भोगोपभोगपरिमाण नांवाच्या तिसऱ्या गुणव्रताच्या स्वीकाराचा प्रकार सांगतात.

भोगोऽयमियान् सेव्यः ।
समयमियन्तं सदोपभोगोऽपि ॥
इति परिमायानिच्छँ- ।
स्तावधिकौ तत्प्रमाव्रतं श्रयतु ॥ १३ ॥

**टीका**—श्रयतु स्वीकरोतु । कोऽसौ गुणव्रती । किं तत् तत्प्रमाव्रतं तयोर्भोगोपभोगयोः प्रमा परिमाणं तत्प्रमा तत्प्रमैव व्रतं तत्र वा व्रतं तत्प्रमाव्रतं भोगोपभोगपरिमाणव्रतमित्यर्थः । किं

कुर्वन्ननिच्छन् अनाकांक्षन् । कौ तौ भोगोपभोगौ । किंविशिष्टावधिकौ सेव्यासेव्यतया प्रतिज्ञाताभ्यामतिरिक्तौ । किं कृत्वा परिमाय परिमितीकृत्य । कथमिति किमिति भोग इत्यादि । अत्रैकं प्रतिषेधमुखेन वाक्यमन्यच्च विधिमुखेन । तत्राद्यं भोगोऽयं समयमियन्तं न सेव्यः इति । द्वितीयं भोगोऽयमियान्वा समयमियन्तं सेव्य इति । तत्राद्यं व्याख्यायते– न सेव्यो नोपयोक्तव्यः । कोऽसावयं भोग्यतया प्रसिद्धो भोगो माल्यताम्बूलादिः । केन मया । कं समयं कालं । कियन्तमियन्तं एतावन्मात्रं यावज्जीवं दिवसमासादिपरिच्छिन्नं वा कालमित्यर्थः । द्वितीयव्याख्या त्वियं । वा अथवा । सेव्यः कोऽसावयं भोगः । केन मया । कियान् इयान् एतावान् । कं समयं । किंविशिष्टमियन्तं । तथा उपभोगोऽयं समयमियन्तं न सेव्यो मयेत्येकं उपभोगोऽयमियान्वा समयमियन्तं मया न सेव्य इति द्वितीयं । एतयोरपि पूर्ववद्व्याख्या ॥

अर्थ—गुणव्रत करणाऱ्या श्रावकानें 'हे भोग पदार्थ अमुक इतक्या प्रमाणाचे अमुक इतका कालपर्यंत सेवन करीन ! अथवा हे अमुक भोग्य पदार्थ अमुक प्रमाणाचे अमुक कालपर्यंत सेवन करणार नाहीं' असें त्या भोग्य पदार्थांचें व त्यांच्या सेवनाच्या कालाचें प्रमाण कल्पून, त्या प्रमाणापेक्षां अधिकाची इच्छा न करणें ह्यास भोगपरिमाण व्रत ह्मणतात. आणि ह्याप्रमाणेंच उपभोगपदार्थांविषयीं कालाची व पदार्थाची ईयत्ता ठरवून, त्याप्रमाणें सेव्य उपभोगपदार्थांच्या ईयत्तेचा अतिक्रम न होऊं देतां, ठरविलेल्या कालापर्यंत त्यांचें सेवन करणें, अथवा त्याग करणें, ह्यास उपभोगपरिमाण असें ह्मणतात. आणि हे दोन्ही (भोगपरिमाण व उपभोग-

परिमाण ) एकत्र करून, भोगोपभोगपरिमाण नांवाचें गुणव्रत समजावें.

भोगोपभोगयोर्लक्षणं तत्त्यागस्य च यावज्जीविकस्य नियतकालस्य च सञ्ज्ञाविशेषावाचष्टे—

आतां; भोग व उपभोग ह्यांचें लक्षण आणि त्यांच्या त्यागाच्या मर्यादेचीं नांवें सांगतात.

भोगः सेव्यः सकृदुप- ।
भोगस्तु पुनःपुनः स्रगम्बरवत् ॥
तत्परिहारः परिमित- ।
कालो नियमो यमश्च कालान्तः ॥ १४ ॥

टीका—स भोगो भण्यते । यः सकृदेकवारं सेव्यः सेव्यते भुक्त्वा पुनर्न भुज्यते इत्यर्थः । किंवत् स्रग्वत् उपलक्षणान्माल्यचन्दनताम्बूलादिर्यथा । स उपभोगो भण्यते तुर्विशेषे । यः पुनः पुनः सेव्यो भूयोभूयः सेव्यते सेवित्वाऽपि पुनः सेव्यते इत्यर्थः । किंवत् अम्बरवत् अत्राप्युपलक्षणाद्वस्त्राभरणकामिन्यादिर्यथा । अथवा स्रगम्बरवच्चेति भोगोपभोगलक्षणयोर्यथासंख्यमुदाहरणे उदाहरणस्य दिङ्मात्रप्रदर्शकत्वात् । एवं तयोर्लक्षणमुक्त्वा तत्त्यागविशेषयोः सञ्ज्ञाविशेषप्रकाशनार्थमाह तदित्यादि– व्यपदिश्यते । कोऽसौ तत्परिहारः किं नियमः । नियम इति सञ्ज्ञया व्यवह्रियते इत्यर्थः । किंविशिष्टः परिमितकालः एकद्वित्र्यादिसंख्यापरिच्छिन्नदिवसमासादिसमयः । तथा व्यपदिश्यते । कोऽसौ तत्परिहारः । किं यमः यम इति नाम्ना व्यवह्रियत इत्यर्थः । किंविशिष्टः कालान्तः कालो मरणमन्तोऽवसानं यस्य स कालान्तो मरणपर्यन्त इत्यर्थः ॥

अर्थ—एकवार सेवन करण्यास योग्य अशा वस्तूस ‘ भोग ’ ह्मणतात. उदाहरण– अन्न, उदक वगैरे. आणि ज्या वस्तूंचें अनेकवार सेवन करतां येते, त्यास ‘ उपभोग ’ असें ह्मणतात. उदाहरण-- माळा, वस्त्र, चंदन, स्त्री, गृह वगैरे. त्या भोगोपभोगवस्तूंचा महिना, वर्ष, दोन वर्षे वगैरे परिमित काळापर्यंत जो त्याग त्याला नियम ह्मणतात. आणि मरणपर्यंत जो त्याग त्याला यम असें ह्मणतात.

त्रसघातबहुवधप्रमादविषयानिष्टानुपसेव्यार्थत्यागव्रतपञ्चकमप्यत्रैवान्तर्भावयितुमाह—

आतां; त्रसवध ( द्वींदियजीववध ) बहुवध ( स्थावरजीववध ) प्रमादविषय ( ज्याच्या सेवनापासून मनुष्य धर्मभ्रष्ट होईल असे पदार्थ, भांग अफू वगैरे ) अनिष्ट ( न आवडणारे पदार्थ ) व अनुपसेव्य ( ज्यांच्या सेवनाविषयीं शिष्टांचा आचार नाहीं असे पदार्थ ) ह्या सर्वांचा त्यागही भोगोपभोगपरिमाणव्रतांतच अंतर्भूत होतो, असें सांगतात.

पलमधुमद्यवदखिल- ।
स्त्रसबहुघातप्रमादविषयोऽर्थः ॥
त्याज्योऽन्यथाऽप्यनिष्टो ।
ऽनुपसेव्यश्च व्रताद्धि फलमिष्टम् ॥ १५ ॥

टीका—त्याज्यः प्रत्याख्यातव्यः । कोऽसावर्थ इन्द्रियोपभोग्यो रसश्च । केन भोगोपभोगपरिसंख्यानव्रतिना । किंविशिष्टः त्रसेत्यादि– त्रसा द्वीन्द्रियादिजीवाः बहवः प्रचुरास्त्रसस्थावरजीवाः

त्रसाश्च बहवश्च त्रसबहवस्तेषां घातौ त्रसबहुघातौ त्रसघातो बहुघातश्चेत्यर्थः । प्रमादो धर्मभ्रंशनोपायः । त्रसबहुघातौ च प्रमादश्च त्रसबहुघातप्रमादाः ते विषया यस्य स त्रसबहुघातप्रमादविषयः । किंविशिष्टोऽखिलः सर्वः । किंवत् पलमधुमद्यवत् । यथा त्रसघाताश्रयत्वात्पिशितं त्यज्यते, यथा च बहुवधाश्रयत्वान्माक्षिकं त्यज्यते, यथा च प्रमादाश्रयत्वान्मद्यं त्यज्यते तथा यथासंख्यं त्रसघाताद्याश्रयोऽर्थस्त्याज्य इत्यर्थः । तत्र त्रसघातविषयोऽन्तः सुषिरप्रायं नालीनलपलक्यामृणालनालप्रमुखमागन्तुजन्तूनां सम्मूर्च्छिमजन्तूनां च योग्यमध्यावकाशं तथा बहुजन्तुयोग्यस्थानं केतकीनिम्बार्जुनारणिशिग्रुपुष्पमधूकाबिल्वादिफलादि च वस्तु । बहुघातविषयो गुडूचीमूलकलशुनार्द्रशृङ्गबेरादिकं । प्रमादविषयो दूषिविषभाङ्गिकाधत्तूरकादि वस्तु । एतेन धनार्थं क्रूरव्यापाराणामपि त्याज्यत्वमुक्तं प्रतिपत्तव्यं । तथा त्याज्यो धर्मार्थिना । कोऽसावखिलोऽर्थः । किंविशिष्टोऽनिष्टः । कथमन्यथाऽपि त्रसघाताद्यविषयोऽप्यर्थो योऽनिष्टो यदा स्वस्याप्यनभिमतः प्रकृतिसात्मको न भवति सोऽपि तदा प्रत्याख्येय इत्यर्थः । तथा त्याज्यः कोऽसावखिलोऽर्थः । किंविशिष्टोऽनुपसेव्यः इष्टोऽपि शिष्टानां शीलनायोग्यः चित्रवस्त्रविकृतवेषाभरणादिरुद्गारलालामूत्रपुरीषश्लेष्मादिश्च । एतत्प्रत्याख्यानस्याप्यभिमतार्थहेतुत्वमुखेन करणीयत्वं समर्थयते व्रताद्धि फलमिष्टमिति— हि यस्माद्भवति किं तत् फलं साध्यं । किंविशिष्टमिष्टमभिप्रेतमभ्युदयादिकं । कस्माद्व्रतात् योग्याद्विषयादभिसन्धिकृताया विरतेः ॥

**अर्थ—ज्याप्रमाणें त्रसघात होतो ह्मणून मांस, अनेक स्थावरजीवांचा वध होतो ह्मणून मध व धर्मभ्रष्टता येते ह्मणून मद्य, हे पदार्थ त्याज्य आहेत, त्याप्रमाणेंच देवनळ,**

कमलाचें देंठ, आंत पोकळ असल्यामुळें ज्यांत अनेक सूक्ष्म जीव राहण्यास जागा आहे असे पदार्थ व शेत्र-ग्याच्या शेंगा, ज्येष्ठमध, बेलफळ, उंबर वगैरे फळें हे पदार्थ टाकावेत. तसेंच स्थावरजीवहिंसा होते ह्मणून मुळा, लशून, आलें वगैरे पदार्थ सोडावेत. आणि बेसावध करणारे ह्मणून भांग, अफू, वगैरे पदार्थ सोडावेत.

द्रव्यप्राप्तीकरितां क्रूरव्यापारही करूं नयेत, असें ह्यावरूच सिद्ध होतें. कारण भांग, अफू वगैरे मादक पदार्थ, ज्याप्रमाणें मनुष्यास विस्मृति उत्पन्न करितात, त्याचप्रमाणें क्रूरकर्मास प्रवृत्त होण्यानेंही सद्विचाराची विस्मृति होते. तसेंच ज्यापदार्थांच्या भक्षणानें त्रसघात वगैरे होत नाहीं असे पदार्थ देखील आपल्यास प्रिय नसल्यास अगर सोसत नसल्यास सोडावेत. तसेंच जे पदार्थ आपल्यास इष्ट असूनही शिष्टसंप्रदायास अगदी विरुध्ध असतील, तसले पदार्थ ह्मणजे चित्रवस्त्र, भाड्याचे दागिने वगैरे पदार्थही स्वीकारूं नयेत. ह्याप्रमाणें केलें असतां व्रतापासून इष्टफलप्राप्ती होते.

उक्तमेवार्थं संव्यवहारप्रसिध्यर्थं श्लोकत्रयेण दर्शयति—

आतां; सदाचार सर्वांस नीट समजावा ह्मणून, पुढल्या तीन श्लोकांत मागील श्लोकांत सांगितलेला विषयच पुनः सांगतात.

नालीसूरणकालिन्द- ।
द्रोणपुष्पादि वर्जयेत् ॥
आजन्म तद्भुजां ह्यल्पं ।

फलं घातश्च भूयसाम् ॥ १६ ॥

**टीका**—वर्जयेत् धर्मार्थी त्यजेत् । किं तत् नालीत्यादि–आदिशब्देन मूलकार्द्रकनिम्बकुसुमकेतकादि । कथं आजन्म यावज्जीवं । कुत इत्याह– हि यस्मात् भवति । किं तत् फलं जिव्हेन्द्रियप्रीणनमात्रं । किंविशिष्टमल्पं स्तोकं भक्ष्यमाणक्षणमात्रभावि । केषां तद्भुजां नालीसूरणादिभक्षकाणां । भवति च कोऽसौ घातः तद्भक्षणे वधः । केषां भूयसां बहुतराणां तदाश्रितजीवानाम् ॥

**अर्थ**— नाली, ( पालाभाजी ) सूरण, कालिंद ( तरबूज ), द्रोणपुष्प (?) वगैरे पदार्थ, यावज्जीव वर्ज करावेत. कारण, हे पदार्थ सेवन करणाऱ्यांस जरी थोडा वेळपर्यंत ( तोंडांत घातल्यापासून चावून गिळेपर्यंत सुख ) होतें, तरी त्यांच्या भक्षणांत अनेक जीवांची हिंसाही होते !

उक्तमेवार्थं व्रतदार्ढ्यार्थं पुनर्विशेषतोऽभिधत्ते—

हाच व्यवहार व्रताच्या दृढतेकरितां पुनः स्पष्ट विवेचन करून सांगतात.

अनन्तकायाः सर्वेऽपि ।
सदा हेया दयापरैः ॥
यदेकमपि तं हन्तुं ।
प्रवृत्तो हन्त्यनन्तकान् ॥ १७ ॥

**टीका**—हेयाः प्रत्याख्येयाः । सदा नित्यं । के अनन्तकायाः । कति सर्वेऽपि । कैः दयापरैः अनुकम्पाप्रधानैः श्रावकैः । कुत इत्याह– यद्यस्मात् । हन्ति हिनस्ति । कोऽसौ पुरुषः । कान् अनन्तकान् अनन्तप्रमितान् जीवान् कशब्देनात्र जीवार्थस्य विव-

क्षितत्वादनन्ताश्च ते कायाश्च जीवाश्चेति विग्रहः। किंविशिष्टः प्रवृत्तः। किं कर्तुं हन्तुं भक्षणादिद्वारेण मारयितुं। कं तमनन्तकायं। किंविशिष्टमेकं व्यवहारेणैकसंख्यमपि किं पुनर्द्व्यादीन्। एते चानन्तैर्जीवैरुपलक्षितः कायो येषां तेऽनन्तकाया मूलादिप्रभवा वनस्पतिकायिकाः। तथा हि मूलजा आर्द्रकहरिद्राप्रभृतयः। अग्रजा आर्यकोदिश्च (?) प्रभृतयः। पर्वजा देवनालेक्षुवेत्रादयः। कन्दजाः पलाण्डुसूरणादयः। स्कन्धजाः सल्लकीकण्टकपलाशादयः। बीजजाः शालिगोधूमादयः। सम्मूर्च्छिमाः नियतबीजाभावे स्वयोग्यपुद्गलैर्निष्पन्नशरीराः। उक्तं च— मूलंगपोरबीजा कंदा तह खंडबीजबीजरुहा। सम्मुच्छिमा य भणिया पत्तेया णंतकाया य ॥ १ ॥

अर्थ— दयाळु स्वभावाच्या श्रावकांनीं सर्वप्रकारचे अनंतकाय जीव, सर्वदा वर्ज करावेत. कारण त्या अनंतकाय जीवांपैकीं एकालाही मारण्याविषयीं प्रवृत्त झालेला श्रावक [ त्या एका जीवासंबंधानें ] अनंत जीवांस मारतो. [ ह्या श्लोकांतील अनंतकाय जीव ह्मणजे वनस्पतिकाय जीव असें समजावें. ते वनस्पतिकायजीव 'मूलज, अग्रज, सर्वज, कंदज, स्कंधज, बीजज आणि संमूर्च्छिम' असे सात प्रकारचे आहेत. त्यांत मूलज ह्मणजे मूळालाच फुटणारे आलें, हळद वगैरे. अग्रज ह्मणजे शेंड्यास फुटणारे वाळा वगैरे. सर्वज ह्मणजे सर्व अवयवापासून फुटणारे देवनळ, ऊंस वेत वगैरे. कंदज ह्मणजे गड्ड्यास फुटणारे कांदा, सुरण वगैरे. स्कंधज ( ढापीपासून फुटणारे ) सलई, वड वगैरे. बीजज ह्मणजे केवल बीजापासून उत्पन्न होणारे भात, गहूं, वगैरे. आणि संमूर्च्छिम ह्मणजे ज्यांच्या उत्पत्तीला साधनीभूत बीज वगैरे कांहीं नसून जे

एक प्रकारचे विजातीय परमाणू एकत्र झाल्यामुळें उत्पन्न झाले आहेत अशीं माळावरील लहान झुडपें वगैरे. हे पदार्थ भक्षण केले असतां अनेक जीवांची हिंसा होते.

आमगोरससम्पृक्तं ।
द्विदलं प्रायशोऽनवम् ॥
वर्षास्वदलितं चात्र ।
पत्रशाकं च नाहरेत् ॥ १८ ॥

टीका—नाहरेत् न भक्षयेद्दयापरः । किं तत् द्विदलं मुद्गमाषादिधान्यं । किंविशिष्टं आमेत्यादि– आमेनानग्निपक्केन गोरसेन क्षीरेण दध्ना अक्वथितक्षीरादिसम्भूतेन तक्रेण च सम्पृक्तं मीलितं । तद्धि सूक्ष्मबहुलजन्त्वाश्रितमागमे श्रूयते । तथा नाहरेत् । किं तत् द्विदलं । किंविशिष्टमनवं पुराणं । कथं प्रायशः प्रायोग्रहणात्पुराणस्यापि चिरकालकृष्णीभूतकुलित्थादेरदृष्टजन्तुसम्मूर्च्छनस्याप्रतिषेधः । तथा नाहरेत् । किं तत् द्विदलं । किंविशिष्टमदलितमकृतद्विधाभावं । कदा वर्षासु प्रावृषि हि मुद्गादीनामन्तःप्ररोहस्यायुर्वेदे प्रसिद्धत्वात् त्रससम्मूर्च्छनस्य च दृष्टत्वेन सम्भाव्यमानत्वादभोज्यत्वं । एतेन रूढानामपि तेषां निषेध उक्तः स्यात् । तथा नाहरेत् किं तत् पत्रशाकं पत्ररूपं हरीतकं न तु फलादिरूपं । तत्र तत्परजन्तुभूयिष्ठत्वात् । कदा वर्षासु तदा त्रसस्थावरसंसक्तिबहुलत्वात्पत्रशाकस्याल्पफलत्वाच्च ॥

अर्थ— कच्चें दूध, किंवा कच्च्या दुधाचेंच बनलेलें दही अगर तसल्या दह्याचें केलेलें ताक ह्यांत मिसळलेले द्विदल, (हरभरे, उडीद, तुरी, मूग वगैरे ज्यांची डाळ निघते असे पदार्थ) दयाळू श्रावकानें भक्षण करूं नयेत.

[ कारण त्यांत अनेक सूक्ष्मजीव असतात असें शास्त्रांत सांगितलें आहे. ] तसेंच साधारणपणें जुने वाटणारे असे द्विदल पदार्थही भक्षण करूं नयेत. [ ह्या वाक्यांत ' साधारणपणें जुने वाटणारे ' ह्मटलें आहे, त्या योगानें, पूर्ण जुने झालेले असल्यानें काळसर दिसणारे कुळथ्या वगैरे पदार्थ घेण्यास मुळींच अडचण नाहीं असें सिद्ध होतें. ] त्याचप्रमाणें वर्षाऋतूंत ह्या द्विदल पदार्थांची ( हरभरे वगैरे पदार्थांची ) डाळ केली नसेल तर ते भक्षण करूं नयेत. [ कारण वर्षाऋतूंत त्या धान्यांस आंत अंकूर फुटतात असें वैद्यशास्त्रांत सांगितलें आहे. व ह्यावरून ज्यास अंकूर आले आहेत ते पदार्थ मुळींच खाऊं नयेत असें सिद्ध होतें. ] तसेंच वर्षाऋतूंत पाले भाज्याही खाऊं नयेत. [ कारण त्या दिवसांत पाला भाजीवर अनेक स्थावर जीवांचा समूह असतो त्यामुळें त्यांची हिंसा होण्याचा पुष्कळ संभव आहे. ]

एतद्व्रतस्य विशेषादानृशंस्यसिध्यङ्गत्वमुपदिशति—

आतां; हें व्रत मनुष्याचे ठिकाणीं दयाळुता संपादन करण्यास विशेष साधन आहे, असें सांगतात.—

भोगोपभोगकृशना- ।
त्कृशीकृतधनस्पृहः ॥
धनाय कोट्टपालादि- ।
क्रियाः क्रूराः करोति कः ॥ १९ ॥

टीका—कः करोति न कोऽपि विदधातीत्यर्थः । किंविशिष्टः कृशीकृतधनस्पृहः स्वल्पीकृतद्रविणाभिलाषः । कस्मात् भोगोपभो-

गकशनात् भोगोपभोगयोर्विवेकबलेनाल्पीकरणात् । का: कोट्टपालादिक्रिया: तलारबन्दिपालवीतपालशौल्किकादिव्यापारान् । किंविशिष्टा: क्रूरा: प्राणिघातकर्कशा: । किमर्थं धनाय द्रव्यार्थम् ॥

अर्थ—ह्याप्रमाणें भोगोपभोगपदार्थांच्या अल्पतेमुळें ज्यानें आपली धनेच्छाही कमी केली आहे असा कोणता मनुष्य, द्रव्य मिळविण्याकरितां तटाचें रक्षण करणें, सैनापत्य वगैरे क्रूर व्यापार करील? कोणीही करणार नाहीं. [ कारण भोगोपभोगपरिमाणव्रतामुळें जर भोगोपभोगपदार्थच वर्ज केले, तर, द्रव्याची अपेक्षा असण्याचें कारणच नाहीं, व तसें झाल्यावर ज्यांपासून जीवघात होणें अगदीं संभवनीय आहे असे क्रूर व्यापार करण्याचीही जरूर राहिली नाहीं.

भोगोपभोगव्रतातिचारपञ्चकं लक्षयति—

आतां; भोगोपभोगव्रताचे पांच अतिचार सांगतात.

सचित्तं तेन सम्बद्धं ।
सम्मिश्रं तेन भोजनम् ॥
दुष्पक्वमप्यभिषवं ।
भुञ्जानोऽत्येति तद्व्रतम् ॥ २० ॥

टीका—अत्येति अतिचरति श्रावक: । किं तत् तद्व्रतं भोगोपभोगपरिमाणव्रतं । किं कुर्वाणो भुञ्जानोऽभ्यवहरन् । किं तत् भोजनं भुज्यत इति भोजनमाहारो भोज्यद्रव्यं । किं किं सचित्तं तेन सम्बद्धं । सम्मिश्रं तेन सचित्तेन सम्मिश्रं सम्बद्धं । दुष्पक्वमभिषवं च । अपिश्चार्थे । तत्र सचित्तं चेतनावद्द्रव्यं हरितकायं । अपक्वं कर्कट्यादि । त्रसबहुघातेत्यादिना निषिद्धेऽप्यत्र प्रवृत्तौ

भङ्गसद्भावेऽप्यतिचाराभिधानं व्रतसापेक्षस्याप्रणिधानातिक्रमादिना प्रवृत्तौ द्रष्टव्यमिति प्रथमः ॥ १ ॥

तेन सम्बद्धं सचित्तेनोपश्लिष्टं सचेतनवृक्षादिना संबद्धं गोन्दादिकं पक्कफलादिकं वा सचित्तान्तर्बीजं खर्जूराम्रादि च तद्भक्षणं हि सचित्तभोजनवर्जकस्य प्रमादादिना सावद्याहारप्रवृत्तिरूपत्वादतिचारः । अथवा बीजं त्यक्ष्यामि तस्यैव सचेतनत्वात् कटाहं तु भक्षयिष्यामि तस्याचेतनत्वादिति बुध्या पक्कं खर्जूरादिफलं मुखे प्रक्षिपतः सचित्तवर्जकस्य सचित्तप्रतिबद्धाहारोऽसौ द्वितीयः ॥२॥

सम्मिश्रं तेन सचित्तेन व्यतिकीर्णं विभक्तुमशक्यं सूक्ष्मजन्तुकमित्यर्थः । अथवा सचित्तशबलं तत्संमिश्रं यथा आर्द्रकदाडिमबीजचिर्भटादिमिश्रं पूरणादिकं तिलमिश्रं च यवधानादिकं अयमपि पूर्ववदतिचारस्तृतीयः ॥ ३ ॥

दुष्पक्कं सान्तस्तण्डुलभावेन अतिक्लेदनेन वा दुष्टं पक्कं मन्दपक्कं वा दुष्पक्कं, तच्चार्धस्विन्नं पृथुकतण्डुलयवगोधूमस्थूलमण्डकफलादिकमामदोषावहत्वेनैहिकप्रत्यवायकारणं । तथा यावतांशेन तत्सचेतनं तावता तत्परलोकमप्यपहन्ति । पृथुकादेर्दुष्पक्कतया किञ्चित्सचेतनावयवत्वात्पक्कत्वाच्च चेतनाचेतनमिति भुञ्जानस्यातिचारश्चतुर्थः ॥ ४ ॥

अभिषवं सौवीरादिद्रवं वा वृष्यं वा । अयमप्यतिक्रमादिनाऽतिचारः पञ्चमः ॥ ५ ॥

चारित्रसारे पुनः सचित्ताद्याहाराणामतिचारत्वोपपादनार्थमिदमुक्तं एतेषामभ्यवहरणे सचित्तोपयोग इन्द्रियमदवृद्धिर्वातादिप्रकोपो वा स्यात् । तत्प्रतीकारविधाने पापलेपो भवति । अतिथयश्चैनं परिहरेयुरिति ॥

अत्राह स्वामी यथा— विषयविषतोऽनुपेक्षाऽनुस्मृतिरतिलौल्यमतितृषानुभवौ ॥ भोगोपभोगपरिमा व्यतिक्रमाः पञ्च कथ्यन्ते ॥१॥

विषयविषतो विषकल्पेषु विषयेषु अनुपेक्षा आदरो विषयानुभवात्तद्वेदनाप्रतीकारे जातेऽपि पुनरभीष्टाङ्गनासम्भाषणालिङ्गनाद्यवर्जनरूपः प्रथमः ॥ अनुस्मृतिस्तु तदनुभवात्तत्प्रतीकारे जातेऽपि पुनः पुनर्विषयाणां सौन्दर्यसुखसाधनत्वाद्यनुचिन्तनमत्यासक्तिहेतुत्वादतिचारः ॥ अतिलौल्यं अतिगृद्धिस्तत्परिहारे जातेऽपि पुनःपुनस्तदनुभवाकांक्षेत्यर्थः ॥ अतितृषा कामिनीभोगादेरतिगृध्द्या प्राप्त्याकांक्षा। अत्यनुभवो नियतकालेऽपि यदा भोगोपभोगावनुभवति तदा अत्यासक्त्याऽनुभवति, न पुनर्वेदनाप्रतीकारतयाऽतोऽतिचार इति ॥ एतेऽपि चात्र ग्रन्थे परेऽप्यूह्यास्तदत्यया इति वचनात्संगृहीता एव ॥

तद्वच्चेमेऽपि श्रीसोमदेवबुधाभिमताः— दुष्पक्वस्य निषिद्धस्य जन्तुसम्बद्धमिश्रयोः ॥ अवीक्षितस्य च प्राशस्तत्संख्याक्षतिकारणम् ॥ १ ॥ अत्राह सिताम्बराचार्यः— भोगोपभोगसाधनं यद्द्रव्यं ददुपार्जनाय यत्कर्म व्यापारस्तदपि भोगोपभोगशब्देनोच्यते कारणे कार्योपचारात्। ततः कोट्टपालनादिखरकर्मापि त्याज्यं। तत्र खरकर्मत्यागलक्षणे भोगोपभोगव्रते अङ्गारजीविकादीन् पञ्चदशातिचाराँस्त्यजेदिति। तदचारु। लोके सावद्यकर्मणां परिगणनस्य कर्तुमशक्यत्वात्। अथोच्यते अतिमन्दमतिप्रतिपत्त्यर्थं तदुच्यते तर्हि तान् प्रतीदमप्यस्तु। मन्दमतीन् प्रति पुनस्त्रसबहुघातविषयार्थत्यागोपदेशेनैव तत्परिहारस्य प्रदर्शितत्वादिति ॥

**अर्थ—सचित्तपदार्थ भक्षण करणें, सचित्तपदार्थांशीं संबंध पावलेले पदार्थ भक्षण करणें, सचित्तपदार्थांनीं मिसळलेले पदार्थ भक्षण करणें, ज्यांचें पचन व्हावें तसें झालें नाहीं असे पदार्थ भक्षण करणें व अभिषव भक्षण करणें हे पांच व्यापार करणारा व्रती श्रावक, त्या भोगोपभोगव्रताचा अतीचार करतो ( हे पांच व्यापार**

केले असतां भोगोपभोगव्रताचा अतीचार होतो. ) ह्याचें स्पष्टीकरण असें–

१ ' सचित्तपदार्थ ह्मणजे सजीव पदार्थ हिरव्या रंगाची न पिकलेली कांकडी ( वाळूक ) वगैरे पदार्थ खाऊं नयेत. कारण ते सजीव असल्यानें त्यांच्या भक्षणापासून जीवहिंसा होते. [ हे सजीवपदार्थ न खाण्याविषयीं येथें सांगण्याची मुळींच जरूर नव्हती. कारण, मागील १५ व्या श्लोकांत त्रसघात व बहुघात ह्याबद्दल केलेल्या निषेधानेंच प्रकृत सजीवपदार्थांच्या निषेधाची गती होते. ह्मणून ह्या श्लोकांत तोच निषेध पुनः केला असल्यानें त्यास व्यर्थता येते. आणि दुसरें असें कीं, पूर्वींच हे पदार्थ खाण्याविषयीं स्पष्ट निषेध केला असतांही जर हे पदार्थ भक्षण केले तर व्रताचा भंगच झाला पाहिजे हें योग्य आहे, असें असून अतीचार होतो असें ह्मणणें अगदीं विरुद्ध दिसतें अशी शंका येथें संभवते. हें जरी खरें आहे, तथापि थोडा विचार केल्यानें ह्या शंकेचा सहज निरास होतो. तो असा— वर दाखविल्याप्रमाणें एकच निषेध दोन श्लोकांत आल्यानें दुसऱ्या श्लोकांतील निषेध व्यर्थ होतो हें ह्मणणें जरी संभवनीय आहे; तरी त्यापासून असा एक तर्क होतो कीं, पूर्वींच्या निषेधांत आणि ह्या निषेधांत कांहींतरी तात्पर्याचा फरक अवश्य असलाच पाहिजे. तो असा कीं, पूर्वीं ज्या पदार्थांचा निषेध केला आहे ते पदार्थ बुद्धिपूर्वक भक्षण केले असतां व्रतभंग होतो हें पूर्वींच्या निषेधानें सिद्ध

होतें. आतां असें असून ज्यापेक्षां दुसऱ्या श्लोकांत पुनः निषेध केला आहे, त्यापेक्षां ते निषिद्ध पदार्थ जर न समजतां चुकीनें भक्षण केले, तर व्रतभंग न होतां अतिचार होतो, असेंच ह्मटलें पाहिजे. ह्याप्रमाणें विचार मनांत आला असतां पूर्वीची शंका सहज निघून जाते. आणि ग्रंथकारांचें असेंच तात्पर्य आहे.] हा पहिला अतीचार झाला.

२ सचित्तपदार्थांशीं संबंध पावलेले पदार्थ भक्षण करणें हा दुसरा अतीचार होय. ह्यांतील 'सचित्त, शब्दाचाही अर्थ पूर्वीप्रमाणेंच सजीव असा करावयाचा आहे. ह्यास उदाहरण पक्कफल आंबा, खारीक वगैरे हें होय. कारण ह्या फलांत असलेलें बीज हा सजीवपदार्थ आहे, आणि बाकीचा ह्मणजे त्या बीजाहून निराळा राहिलेला भक्ष्य पदार्थ त्या सजीवपदार्थांशीं संबंध पावलेला पदार्थ आहे. ह्मणून ते पदार्थ, जर एकाद्या व्रती श्रावकानें प्रमादानें भक्षण केले तर निषिद्धपदार्थाच्या भक्षणाविषयीं त्याची प्रवृत्ती झाली असल्यानें तो अतिचार होईल. किंवा 'बीज हें सजीव आहे ह्मणून तें टाकून देतो, व वरील भक्षणयोग्य असलेला पदार्थच भक्षण करितो. कारण तो कांहीं सजीव नव्हे' अशा बुद्धीनें जर कोणी व्रती श्रावकानें एखादा खारीक वगैरे पदार्थ तोंडांत टाकिला तर तें सचित्तपदार्थांशीं संबंध असलेल्या पदार्थांचेंच भक्षण झाल्यामुळें अतिचार झाला.

३ सजीवपदार्थानें व्याप्त असलेले ह्मणजे ज्यांतील सजीव पदार्थांचा व बाकीच्या निर्जीव पदार्थांचा विभाग

करितां येत नाहीं असे पदार्थ भक्षण करणें, किंवा सचित्तपदार्थ ज्यांत मिसळले आहेत असे पदार्थ भक्षण करणें, हा तिसरा अतिचार होय. ह्याचें उदाहरण आलें, डाळिंबाचे दाणे, चिबूड किंवा तीळ ज्यांत मिसळले आहेत अशा लाह्या. हे पदार्थ कांहीं सजीव पदार्थांनीं व्याप्त आहेत; व कांहीं सजीवपदार्थ ज्यांत मिसळले आहेत असे आहेत. ह्मणून हे पदार्थही प्रमादानें भक्षण केले असतां अतीचार होतो. हा तिसरा अतीचार झाला.

४ दुष्पक्व ह्मणजे ज्यांचें पचन व्हावें तसें झालेलें नाहीं असे पदार्थ भक्षण करणें हा चवथा अतीचार होय. ह्याचें उदाहरण, ज्यांत तांदूळ शिजल्यावांचून तसेच राहिले आहेत, किंवा कच्चे शिजले आहेत, किंवा अतिशय शिजले आहेत असें अन्न. ह्यांत, अर्धेकच्चे पक्व झालेले व न पक्व झालेले असे तांदूळ, गहूं वगैरे पदार्थ असल्यानें त्यापासून आमदोष उत्पन्न होतो, हा ऐहिक दोष. व ते तांदूळ वगैरे पदार्थ, जेवढ्या अंशानें पक्व झाले नसतील, तेवढ्या अंशानें, ते सचेतनच असल्यामुळें, तितक्या अंशानें परलोकाचीहि हानी करितात, हा पारलौकिक दोष. ह्याप्रमाणें अपक्व अथवा अर्धपक्व अन्न भक्षण केल्यानें दोन प्रकारचे दोष होत. असल्या अन्नाच्या भक्षणांत प्रमाद असल्यास अतीचार होतो, नाहीं तर व्रतभंग होतो. पोहे, चुरमुरे, हे पदार्थही दुष्पक्व आहेत ह्मणजे अधिक शिजलेले असतात. ह्मणून ह्यांच्या भक्षणानें देखील अतीचार होतो. हा चवथा अतीचार झाला.

५ अभिषव ह्मणजे पातळ पदार्थ, ह्याचें उदाहरण,

आंबत ठेवलेली पेज, किंवा दुसरा एखादा वीर्यवर्धक पातळ पदार्थ ' उडदाच्या डाळीची खीर ' वगैरे हे पदार्थ भक्षण केले असतां अतीचार होतो, हा पांचवा अतीचार होय.

चारित्रसारांत सजीव पदार्थ भक्षण करणें हा अतीचार आहे असें युक्तीनें दाखविण्याकरितां असें लिहिलें आहे कीं- भोजनांत सजीव, अपक्व, अथवा अर्धपक्व अशा पदार्थांचा उपयोग केला असतां इंद्रियें अनावर होतात, व वातप्रकोपादिकही होतात. त्यांच्या उपशमाकरितां कांहीं औषधोपचार करावा तर पुनः वनस्पती वगैरे सजीव पदार्थांची हिंसा होऊन पापसंपादन होतें. ह्मणून व्रती मनुष्यानें अशा प्रकारच्या आहाराचा अवश्य त्याग करावा. श्रीसमंतभद्रस्वामींनीं जे अतीचार लिहिले आहेत, ते पूर्वींपेक्षां निराळे आहेत. ते असे-

विषयाविषतोऽनुपेक्षाऽनुस्मृतिरतिलौल्यमतितृषानुभवौ ॥
भोगोपभोगपरि माव्यतिक्रमाः पञ्च कथ्यन्ते ॥ १ ॥ ह्या कारिकेचा अर्थ— विषाप्रमाणें असलेल्या विषयांची उपेक्षा न करणें, ह्मणजे स्त्रीसंभोगानें वेदनेची निवृत्ती झाली असतांही पुनः आपल्यास अत्यंत प्रिय असलेल्या स्त्रीबरोबर संभाषण करणें, आलिंगन करणें वगैरे व्यापारांचा त्याग न करणें, हा प्रथमातिचार होय. तसेंच विषयसंभोगानें एकदा वेदनेचा परिहार झाला असूनही पुनः त्याच विषयाचें सौंदर्य, सुखसाधनत्व ह्याचें चिंतन करणें, हें अत्यासक्तीचें साधन आहे, ह्मणून, हा दुसरा अतिचार होय. अतिलौल्य ह्मणजे ज्याच्या

अनुभवानें वेदनाशांति झाली त्याच विषयाच्या पुनः-पुनः अनुभवाची इच्छा करणें, हा तिसरा अतीचार. अतितृषा ह्मणजे पुढें सहज प्राप्त होणारा विषय अधाशीपणामुळें ह्यावेळीं मिळावा अशी इच्छा करणें, हा चवथा अतीचार. आणि अत्यनुभव ह्मणजे नियमितकालीं जो विषयानुभव करावयाचा तो केवळ वेदना शांत होण्याकरितांच न करता, अत्यासक्तीनें करणें, हा पांचवा होय. ह्या ग्रंथांत " परेऽप्यूह्यास्तदत्ययाः ॥ ह्मणजे दुसरेही कित्येक व्यापार त्या व्रताचे अतीचार होतात, ते तर्कानें समजावे अशा वाक्यानें ह्या सर्व अतीचारांचा संग्रह केलेला आहे. तसेंच श्रीसोमदेव पंडिताच्या मतानें 'दुष्पक्व, निषिद्ध, जंतुसंबंध, जंतुमिश्र व अवीक्षित' यांचें सेवन हे पांच अतीचार ठरविलेले आहेत. आतां सितांबराचार्यांचें ह्मणणें असें आहे कीं-- भोगोपभोगांस साधनीभूत जें द्रव्य, त्याच्या संपादनाकरितां जो व्यापार, तोही भोगोपभोगशब्दानेंच ग्रहण करावा. ह्मणजे तसा अर्थ मानिल्यानें दुर्गरक्षकाचे व्यापार (किल्ल्याचें रक्षण करण्याकरितां नेमलेल्या पुरुषाचें काम) हें भोगोपभोगास साधनीभूत असलेल्या द्रव्याचें साधक असून क्रूरकर्म आहे, तेंही त्याज्य ठरतें. व ह्यावरून अशाच प्रकारचीं असलेलीं अग्निजीविका वगैरे पंधरा प्रकारचीं क्रूर कर्में, त्याज्य ठरतात. आणि असें केल्यानें तुमच्या ग्रंथांत ज्या त्याज्य कर्मांचा संग्रह झाला नाहीं, त्यांचा संग्रहही केल्यासारखा होतो वगैरे. परंतु ह्या कल्पनेनें मुळींच

